ऐसा. ॥ ५३६ ॥ विना अधिष्ठानादि पंचक । न घडे वेदांत उपनिषच्छ्रवणादिक, । अनुभवज्ञानें सात्त्विक । तेंही न घडे या पांचां साधनांवांचुनी. ॥ ५३७ ॥ कर्मांत वाखाणितां ज्ञान । अनुचित नव्हे व्याख्यान, । येविषयीं आणखी समाधान । याच अष्टादशीं. ॥ ५३८ ॥ "ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च"[1] या श्लोकीं । "कर्माणि प्रविभक्तानि" म्हणूनी, मग म्हणेल कीं । "ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं"[2] इत्यादि या श्लोकीं । ब्रह्मकर्म. ॥ ५३९॥ आतां न्याय्य म्हणावें ज्यास, । सात्त्विक म्हणेल त्यास, । आणि अन्याय्य तें राजस, तामस; । त्यांत तामस, अधमाधम जाणावें. ॥ ५४० ॥ क्रम ऐसा आतां येथुनी । सात्त्विक, राजस, तामस, म्हणोनी; । त्यांत ज्ञान सात्त्विक या श्लोकेंकरूनी । बोलतो श्रीउत्तमश्लोक. ॥ ५४१ ॥

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ २० ॥**

भूतें जडें सकळ, । तीं नश्वरें, त्यांत केवळ । अविनाशी तत्त्व विमळ । देखिजेतें ज्या ज्ञानें; ॥ ५४२ ॥ तें ज्ञान सात्त्विक, । कीं नश्वरें भूतें अनेक, । त्यांत अव्यय अविनाशी भाव एक । देखणें, नाना नगीं एकची हेम जैसें. ॥ ५४३ ॥ कीं घटाकार होती जाती, । त्या अनेकीं एक अविनाश माती, । सर्वभूतीं आत्मा ऐसा पाहती । ज्या ज्ञानें, तें ज्ञानची सात्त्विक. ॥ ५४४ ॥ तरंग उठती नानाकार, । ते दिसती नाशतीही नश्वर, । परी त्यांत अव्यय जळ निरंतर, । तरंगनाशें नासेना जळ. ॥ ५४५ ॥ तैसीं भूतें उपजती, नाशती, सकळ; । त्या कार्यांत जें कारण सबाह्य पुष्कळ, । तें अव्यय अविनाशी केवळ । सात्त्विक म्हणावें ज्ञान ऐसें. ॥ ५४६ ॥ व्यापकास म्हणतां अव्यय, । व्याप्यां भूतांचा बोलिला व्यय, । व्यय जया तया उत्पत्ति, हा निर्णय । सुचविला. ॥ ५४७ ॥ जें उपजलें, नाशलें, । तें नाशपर्यंत राहिलें, । नाश पावतांच नाहींसें जालें, । उरलें तें अव्यय. ॥ ५४८ ॥ ऐसा सर्वदा प्रवाह, । यावरूनी सुचविला ऐसा निर्वाह । कीं, प्रकृतिपुरुषांचा विवाह । अद्वैतपणें सर्वदा. ॥ ५४९ ॥ मध्यान्हीं किरणीं जळाभासाचा उदय, । सायान्हीं किरणींच त्याचा लय, । तोंपर्यंत त्या जळाभासांत एक अव्यय । प्रकाश सूर्याचा. ॥ ५५० ॥ **अव्यय**पदेंकरूनी । स्वरूप कालत्रयीं विद्यमान म्हणोनी । सुचविलें कीं जगदुपादानकारणाचें, यावरूनी । ज्ञान सात्त्विक जाणावें. ॥ ५५१ ॥ ज्ञान ऐसें अव्ययाचें, । भाव म्हणतां नांव त्याचें, । तेंची व्यापकस्वरूप साचें, ।

---

१. अ० १८, श्लो० ४१. २. अ० १८, श्लो० ४२.

मिथ्या भूतें व्याप्यें सुचवी. ॥ ५५२ ॥ अर्थ ऐसा, कीं, ज्याचा सद्भाव, । त्यातेंची असे म्हणावा भाव, । कीं रज्जूचाच दिसतां भाव, मग अभाव । मिथ्या सर्पाचा होतसे. ॥ ५५३ ॥ जें आहे, त्याचाच सद्भाव, । जें नाहीं, त्याचा अभाव; । असणें हा रज्जूचाच भाव, । नसणें अभाव सर्पाचा. ॥५५४॥ एवं स्वरूप एक अव्यय सत्य । भूतें अनेकें असत्य, । असत्यांत सत्य पाहणें हें पांडित्य । सात्त्विक ज्ञानाचें. ॥ ५५५ ॥ एवंच "**सर्वं खल्विदं ब्रह्म**" श्रुती । "**पुरुष एवेदं**" ऐसेंही बोलती, । '**खलु**' शब्दें '**एव**' शब्दें शपथ करिती । कीं ब्रह्मची जड तितकें. ॥ ५५६ ॥ कीं ब्रह्म स्वरूपेंकरूनी आहे जैसें, । जड जग नानाकार न दिसे तैसें, । विलक्षण अन्योन्य ऐसें, । म्हणूनी **खलु**शब्दें **एव**शब्दें शपथ करिती. ॥ ५५७ ॥ परंतु सर्व जें अनेक, । तें एक आणि ब्रह्म एक, । ऐक्य दोंचें सविवेक । करिती ये रीती. ॥ ५५८ ॥ कीं एक सत्य, । एक असत्य, । ऐसें पहावें अगत्य । श्रुत्यर्थ साधावया. ॥ ५५९ ॥ आणि "**मायामात्रमिदं द्वैतं**" म्हणोनी, । "**नेह नानास्ति किंचन**" इत्यादि वेदवचनीं । प्रपंच मिथ्या, नानात्व नाहींच यें रीतीकरूनी । प्रमाणसिद्ध मिथ्यात्व भूतांचें. ॥ ५६० ॥ याकारणें अव्ययभाव । सर्व भूतीं पाहणें ज्ञान सात्त्विक, म्हणे देव, । कीं, भाव अव्यय, तेव्हां भूतांचा अभाव, । रज्जूंत जैसा सर्पाचा. ॥ ५६१ ॥ कनक अव्ययभाव । ज्या नगीं, त्या नगाचा अभाव, । हा अनादि वस्तुस्वभाव, । कीं, ब्रह्मची सर्व ये रीती मायेनें होतसे. ॥ ५६२ ॥ तरी काय सोनें जे रीती । भिन्न होतें, जेव्हां नग भिन्न होती? । या शंकेच्या परिहारार्थ श्रीपती । म्हणतो, 'विभक्तांच्या ठायीं अविभक्त.' ॥ ५६३ ॥ "**अविभक्तं विभक्तेषु**" म्हणोनी । देव बोले, या वचनीं । अर्थ ऐसा, कीं, जे वेगळे दिसती नयनीं, । त्यांत वेगळा न जाला भाव अन्य. ॥ ५६४ ॥ कीं आकाशादि भूतें, । आणि भौतिकें शरीरें बहुतें, । हें ये रीतीं विभक्तपण दिसतें, । त्यांत अव्ययभाव तो अविभक्त. ॥ ५६५ ॥ तत्त्व ऐसें बोले भगवंत, । येथें जे रीती जो साजेल दृष्टांत, । तो साधावा संमत । भगवद्वाक्यास जो पडे. ॥ ५६६ ॥ सुवर्णाचा नग एक, । त्या नगीं कुसरी अनेक, । किंबहुना भूचरजळचरखेचरादिक । आकार असती ज्यावरी; ॥ ५६७ ॥ किंबहुना सुवर्णमंदिर, । भिंतीवरी रचना सुंदर, । भूचर, जळचर, गगनचर, । आणि चतुर्दश भुवनेंही; ॥५६८॥ किंबहुना मातीच भिंती, । चित्रप्रतिमा मातीच्याच दिसती, । त्यांत लोक चौदा असती, । आणि भूचर, जळचर, गगनचर; ॥ ५६९॥ तेथें लोक

आणि भूचरादि नावांनी विभक्त, । परी भिंती ते तों सर्वांमध्यें अविभक्त, । विभक्तां सर्वा भूतीं ये रीती भक्त । पाहती अविभक्ता एका वासुदेवातें. ॥५७०॥ असोत हे दीर्घ दृष्टांत, । तरंग विभक्त समुद्रांत, । परी तो समुद्र अविभक्त त्या तरंगांत, । जडीं चित्स्वरूप सर्वत्र या प्रकारें. ॥ ५७१ ॥ सर्व साम्य दृष्टांतीं नसे, । परी नाना विभक्तीं अविभक्त एक दिसे । दृष्टांत बोलावे ऐसे । वेदवाक्यभगवद्वाक्यबोधार्थ. ॥ ५७२ ॥ नव्हे हें तर्कशास्त्र; । वेद, वेदांत, ब्रह्मसूत्र, । त्याचाही मथितार्थ मात्र । भगवद्वाणी हे गीता. ॥ ५७३ ॥ वेद, वेदांत, सूत्रें, गीता । आणि पुराणें, यांची एकवाक्यता । तो अर्थ अनुभवा यावा तत्त्वता । म्हणूनी हे दृष्टांत. ॥ ५७४॥ तथापि स्वयुक्तिकल्पित । हे नव्हती दृष्टांत, । जे दृष्टांत बोलिले वेदीं आणि पुराणांत । तत्त्व अनुभवावयाकारणें. ॥ ५७५ ॥ कोण दृष्टांत ऐसा असे? । कीं सर्व विषयीं साम्य दिसे. । जे गोष्टीस दृष्टांत तितकेंची गवसे । तरी तितकियानें सिद्ध तो अर्थ. ॥ ५७६ ॥ म्हणतां कमलनयन, । नेत्र मानावे बुबुळींकरूनी हीन? । अथवा नेत्रदृष्टांतीं आणितां मीन । काय दुर्गंध मानावा नेत्रांतें? ॥ ५७७ ॥ मुख म्हणतां चद्र पूर्ण, । तेथें पाहावा काय शुभ्रवर्ण? । गौरपणास उपमा सुवर्ण, । तरी काय कठिणत्व अंगास मानावें? ॥ ५७८ ॥ तथापि हे दृष्टांत वेदीं पुराणीं । वेदव्यासाचीही बोलते वाणी, । त्यावरूनी हे सुजाणीं । दृष्टांत संमत मानावे. ॥ ५७९ ॥ दशमस्कधीं भागवतीं । जेथें मूर्तिमंत श्रुती । करिती जगदीश्वराची स्तुती, । तेथें छद अभिनव हा श्लोक. ॥ ५८० ॥

**न यदिदमग्र आस न भविष्यदतो निधना-**
**दनुमितमंतरा त्वयि विभाति मृषैकरसे ।**
**अत उपमीयते द्रविणजातिविकल्पपथै-**
**र्वितथमनोविलासमृतमित्यवयंत्यबुधाः ॥**

श्रुति म्हणति, देवा! तूं सत्य, । तुजमध्ये प्रपंच हा असत्य, । त्या प्रपंचमिथ्यात्वाचें ऐसें पांडित्य । कीं पूर्वी हें कांहींच नव्हतें. ॥ ५८१ ॥ जें हें आतां प्रत्यक्ष दिसतें, । हें याच्या उत्पत्तीहून पूर्वी कांहींच नव्हतें; । हेंच याउपरी जेव्हां नाश पावतें, । तेव्हां ऐसें होतें कीं नाहींच. ॥ ५८२ ॥ रज्जूवरी सर्प पाहे, । तो द्रष्टा निजतां सर्प कोठें आहे? । नव्हे सत्य, कीं जळोनी राहे । भस्म होउनी. ॥ ५८३ ॥ आणि मध्यें असतां हें अनेक । तुजमाजि भासतें, तो तूं चैतन्यरस एक, । याळागीं द्रव्यें मृत्तिकासुवर्णादिक । यांची उपमा येविषयीं. ॥ ५८४ ॥ तूं चैतन्यरस एक । तुजमाजि भासतें हें अनेक, ।

यास द्रव्यजाति मृत्तिकासुवर्णादिक । उपमेस आणिजेताती. ॥ ५८५ ॥ ज्या आम्ही वेदश्रुती । तुझी करितों आतां स्तुती, । त्याच द्रविणजाति विकल्प-पथरीती । एकीं अनेक यास उपमा देतसों. ॥ ५८६ ॥ द्रविणजाति म्हणिजे द्रव्यजाती, । उदक, अग्नि, सोनें, माती, । यांच्या विकल्पपथरीती । म्हणिजे भेद नाना द्रव्यांचे. ॥ ५८७ ॥ छांदोग्य उपनिषदीं । श्रुति बोलती साम-वेदीं, । कीं, एक मृत्तिका घटादिभेदीं । कीं नाना नगीं हेम एक. ॥ ५८८ ॥ घटादिकीं मातीच सत्य, । घटादिआकार अवघे असत्य, । मातीवांचूनी कांहीं न दिसतां अगत्य । प्रत्यक्ष मिथ्या म्हणावे घटादिक. ॥ ५८९ ॥ भूतें अनेकें ऐसीं । मृषा तुझ्या एकरसीं, । घटादि पात्रें मृषा जैसीं । एके. मृत्तिकेंत. ॥ ५९० ॥ द्रव्यांत ऐसी एक माती, । ऐशाच नाना सुवर्णादि द्रव्यजाती, । त्यांची उपमा, म्हणती श्रुती, । तुज आम्ही देतों म्हणूनी अतिस्पष्ट. ॥ ५९१ ॥ वेदीं दृष्टांत ये रीती, । त्या या टीकेंत मागें वाखाणिल्या श्रुती, । प्रस्तुतीं बोले यदुपती, । कीं, हें ज्ञान सात्त्विक. ॥ ५९२ ॥ हे एकदेशी दृष्टांत, । कोणी वाचाचापल्य करितील यांत । म्हणूनी वेदसिद्ध दृष्टांत हे श्रीभागवतांत । श्रुती बोलती म्हणे वाणी व्यासाची. ॥ ५९३ ॥ याकारणें हा एक । वेद-स्तुतीमधील श्लोक । यांत उपयोगी तितकाच वाखाणिला, कीं वादी लोक । कोणी म्हणतील दृष्टांत स्वयुक्तीचे. ॥ ५९४ ॥ प्रस्तुत "अविभक्त विभक्तेषु" या वचनीं । विभक्तांत अविभक्त तत्त्व इत्यादि दृष्टांतेंकरूनी । ज्या ज्ञानें पाहती, तें सात्त्विक म्हणोनी । वेद म्हणे. ॥ ५९५ ॥ एवंच ज्ञान अद्वैत, । तेंची सात्त्विक निश्चित । म्हणूनी बोले भगवंत, । ज्ञानामध्यें न्याय्य ज्ञान तें ऐसें. ॥ ५९६ ॥ न्याय्य हें ज्ञान अद्वैत, । हें सात्त्विक; यास जें विपरीत, । तें राजस ज्ञान, जेथें अवघें द्वैत । म्हणूनी बोलतो या श्लोकीं. ॥ ५९७ ॥

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥**

पृथक् म्हणजे वेगळेपण, । त्या वेगळेपणेंकरूनी जो प्रवीण, । वेगळेपणेंची जाणे वेगळेपणाची खूण । तें ज्ञान राजस जाण तूं. ॥५९८॥ भूतें आकाशादि पंचविध, । भौतिकें शरीरें विविध, । ऐसें जें नानाविध विविध, । पृथग्विधपणेंची त्यातें जाणतो. ॥ ५९९ ॥ आणि सर्वाभूतीं जो चैतन्यभाव, । ज्याचा कधीं नव्हे अभाव, । चिदंश अंश एकाचेची जीव, । ते नानात्वेंच जाणतो. ॥ ६०० ॥ ऐसे नानाभाव सर्व भूतीं । जाणे जो ज्ञाता ये रीती, । आणि जडा पृथग्विधांतें भेदमती । पृथग्विधची जाणतो, तें ज्ञान राजस. ॥ ६०१ ॥

ऐसें बोले गोविंद, । परंतु भेदमतवाद प्रतिपद, । आणि त्या ज्ञानाचा हेतुही मुकुंद । सुचवी, कीं वाढलें मत तें ज्या बळें. ॥ ६०२ ॥ "**पृथक्त्वेन**" म्हणजे पृथक्पणेंकरूनी, । म्हणजे वेगळेपणाचा हेतु अवलंबूनीं, । वेगळेपण प्रत्यक्ष सिद्ध खरें मानुनी, । पृथग्विधची जाणे पृथग्विधातें. ॥ ६०३ ॥ आणि सर्वभूतीं नानाभाव जाणे, । ते नानाच वेगळेपणाच्या हेतूनें म्हणे, । कीं जें ज्ञान म्हणोनी बोले, तें बाणे । पृथक्त्वेंकरूनी. ॥ ६०४ ॥ कीं पृथक्त्व खरें म्हणोनी, । अनुभवसिद्ध भेदातें मानुनी, । त्या पृथक्त्वेंकरूनी । पृथग्विधांतें नानाभावांतें जाणतो. ॥ ६०५ ॥ ज्या गोष्टीचें धरितां बळ, । मत आपुलें होतें प्रबळ, । तो त्या मतातें हेतु केवळ, । पृथक् म्हणजे भिन्नत्व हेतू. ॥ ६०६ ॥ वेदीं सर्वत्र अद्वैत, । ज्ञानकांडीं न आढळे द्वैत, । तथापि उपदेशवाक्याचा अर्थ विपरीत । वाखाणिती या हेतूकरूनी. ॥ ६०७ ॥ पृथक्त्वें जें प्रत्यक्ष, । तो हेतु मानूनी जाले दक्ष, । त्या हेतूनें सबळ पक्ष । आपला मानिती. ॥ ६०८ ॥ प्रमाण दावितां श्रुती, । श्रुति बोलती हें न घडे म्हणती, । भेद अनुभवसिद्ध अवलंबिती, । आणि न घडे म्हणती अद्वैत. ॥ ६०९ ॥ जें स्वयेंच भलता जाणतसे, । तें द्वैतची वेद उपदेशिती कैसे ? । नवें नसे आणि उपदेशें गवसे । ऐशाच उपदेशातें म्हणावें उपदेश. ॥ ६१० ॥ ऐसी अबाधित उपदेशरीती, । ते विना गुरुकृपा न कळे, म्हणती श्रुती; । हे विवादीं न येतां अद्वैतप्रतीती, । न घडे म्हणती अद्वैत वेदोक्त. ॥ ६११ ॥ यास हेतु पृथक्पण, । कीं भेदांची आयती जे खूण, । त्या पृथक् हेतूनेंच निपुण । वेदोक्त अद्वैत म्हणती घडेना. ॥ ६१२ ॥ "**सर्वं खल्विदं ब्रह्म । पुरुष एवेदं**" म्हणे जें निगम, । हा अर्थ न घडे म्हणती हेतु परम । पृथक्त्वाचा करूनी. ॥ ६१३ ॥ "**तत्वमसि**" म्हणूनी श्रुती । वारंवार उपदेशिती, । ते या अद्वैतास दूषिती । हेतु पृथक्त्वाचा करूनी. ॥ ६१४ ॥ ज्ञानकांडीं तत्त्वोपदेश, । सर्व शाखांत तेथें लेश । द्वैत प्रमाण नसतां, भेदाचा आवेश । पृथक्त्वाच्याच हेतूकरूनी. ॥ ६१५ ॥ नित्यमुक्त सर्वेश्वर । ज्याचा उपाधीच अद्वैतानुभव निरंतर, । तो त्या हेतूनें वेदीं प्रत्यक्षतर । अद्वैतयुक्तींच बोलतो. ॥ ६१६ ॥ त्याचा उपाधि विद्या, । अद्वैतची बोलणें त्या आद्या; । उपाधि जीवांचा अविद्या, । त्यांस द्वैतानुभव अखंड. ॥ ६१७ ॥ त्यांस पृथक्त्वाची प्रतीती, । तें मोडावया जगत्पती । स्वानुभव बोले; तो घडेना, म्हणती, । हेतु अवलंबूनी आपल्या अनुभवाचा. ॥ ६१८ ॥ स्वानुभव स्वयमेव । वेदीं बोले देवाधिदेव; । तो अर्थ मोडिती, आपला अविद्यानुभव । तो पृथ-

कृत्वें हेतु अवलंबुनी. ॥ ६१९ ॥ एवं पृथक्त्व हेतूकरूनी[1], । पृथग्विधत्वच तत्त्व मानुनी, । सर्वभूतीं वेगळे नानाभावच म्हणोनी । जाणें तें अविवेकरूनी जाणे, हा भाव. ॥ ६२० ॥ एवंच भेदमत जितकें, । अविद्याहेतुकची तितकें, । ऐसें बोलिलें शेषपर्यंकें, । राजसज्ञानप्रसंगेंकरूनी. ॥ ६२१ ॥ सात्त्विकज्ञान तें न्याय्य, । राजसज्ञान तें अन्याय्य, । ऐसें बोलोनी यदुवर्य । तामसज्ञानही अन्याय्यची बोलतो या श्लोकीं. ॥ ६२२ ॥

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।**
**अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥**

जें एक होऊनी सकळ, । तें कारण ज्ञेय केवळ, । त्याचें ज्ञान तें सात्त्विक निर्मळ, । तद्विपरीत तामस हें बोलिलों. ॥ ६२३ ॥ एक होऊनी सर्व झालें, । तें कारण कृत्स्न म्हणूनी बोलिलें, । त्यापासूनी नानारूपें जें सर्व उपजलें, । तें कार्य ऐसें वेदसिद्ध ज्ञान सात्त्विक. ॥ ६२४ ॥ त्या कृत्स्ना कारणासारिखेंची मानिलें । एक त्याचें कार्य, जें त्यापासूनी उपजलें, । ऐसें जें ज्ञान, तें आसक्त जालें । त्या कार्याच्याच ठायीं कारण म्हणोनी. ॥ ६२५ ॥ तें तामस अहैतुक ज्ञान, । म्हणिजे मुक्तीचें हेतु तें नव्हे, ऐसें व्याख्यान; । कीं, तामस तथापि मुक्तिहेतु, ऐसें समाधान । मानूं नये या ज्ञानेंकरूनी. ॥ ६२६ ॥ आणि **'अतत्त्वार्थवत्'** म्हणे भगवंत, । कीं, तत्त्वरूप अर्थ नाहीं त्यांत, । जें नव्हे तत्त्वार्थवंत, । तें अतत्त्वार्थवत् बोलावें. ॥ ६२७ ॥ आणि अल्प तें ज्ञान, । म्हणिजे युक्तीचें अल्प गमन, । दूरदर्शीनें समाधान । त्या ज्ञानाविषयीं होईना. ॥ ६२८ ॥ तें बोलिलें ज्ञान तामस । म्हणूनी बोले श्रीनिवास; । परंतु विशद बोलिल्यावीण श्रोतयांस । उकल याचा होईना. ॥ ६२९ ॥ आतां विशद अर्थ याचा ये रीती, । कीं, ब्रह्म जाणावें म्हणती श्रुती, । आणि **"सर्वं खल्विदं ब्रह्म"** ऐसें म्हणती, । कीं, जाणावें तें ब्रह्म सर्व हें. ॥ ६३० ॥ जें स्थावरजंगम, । त्यातेंची म्हणावें ब्रह्म; । तेव्हां सर्व म्हणूनी नाम । ब्रह्माचें, जें सर्व कळे एकत्वें. ॥ ६३१ ॥ एवं सर्वशब्दाचें प्रतिपद । कृत्स्न म्हणे गोविंद, । कीं ज्ञान त्याचेंची नांव, म्हणतो मुकुंद, । जें सर्व कळे एकत्वें. ॥ ६३२ ॥ आतां येथें प्रस्तुत । तामस ज्ञान बोले अच्युत, । तें ज्ञान ऐसें कीं कोणी भ्रांत । ब्रह्म म्हणती गगनातें. ॥ ६३३ ॥ कोणी ऐसें म्हणती, । कीं, ब्रह्म शुद्ध ज्योती; । कोणी प्राणची ब्रह्म मानिती, । परी सर्व ब्रह्म, तेव्हां यांत ब्रह्म नव्हे तें काय? ॥ ६३४ ॥ कीं सर्वही ब्रह्म, । म्हणूनी बोलती निगम, । "सर्वं

१. समानार्थक शब्द.

खल्विदं ब्रह्म". । प्रसिद्ध वेदीं इत्यादि. ॥ ६३५ ॥ याकारणें तेंही ज्ञान, । परी त्या ज्ञानीं असे अज्ञान, । कीं, कार्यास कारण म्हणतां समाधान । कोण पावला? ॥ ६३६ ॥ कीं कारण कनक, । अलंकार कार्य अनेक, । त्यामध्यें मुकुट, कुंडल, कटक, । कनकची अवघे. ॥ ६३७ ॥ कुंडलास म्हणतां सुवर्ण, । नव्हे सुवर्ण ऐसें म्हणेल कवण? । परंतु कुंडलास सुवर्णपण । कैसें घडे? ॥ ६३८ ॥ कार्य कुंडलांची आकृती, । त्या आकृतीस कारण म्हणती;। तैसें तामसज्ञान बोले श्रीपती । कीं कृत्स्नासारिखें कार्य मानिलें. ॥ ६३९ ॥ कृत्स्न कारण ब्रह्म, । त्याच्या ठायीं आसक्त जैसें सात्त्विकज्ञान परम, । तैसें एक कार्य मानूनी, संभ्रम । त्याच्याच ठायीं मनाचा. ॥ ६४० ॥ कारण कृत्स्नासारिखें कार्य त्याचें, । कीं, मानिलें कारणची तें साचें, । आणि सक्त त्याच्या ठायीं म्हणूनी देवाचें । वचन ऐसें. ॥ ६४१ ॥ कृत्स्न म्हणिजे सकळ । जें सर्व कार्यरूप कारण केवळ, । त्याच्या कार्याच्या ठायीं अचळ । ज्ञान तामस तेंची कारण म्हणोनी. ॥ ६४२ ॥ सर्वगत देखिली हे पोकळी, । तों हेंची ब्रह्म म्हणोनी आली उकळी. । तेथेंची उगवली ज्ञानाची कळी, । ब्रह्म मानिलें गगन. ॥ ६४३ ॥ जें कृत्स्न सर्वकारण ब्रह्म, । त्यासारिखें मानिलें व्योम, । आणि गगनींच आसक्त जालें परम । ज्ञान तें. ॥ ६४४ ॥ ब्रह्मची हें गगन,। ऐसें आरभिलें निदिध्यासन, । या अर्थीं हें भगवद्वचन । 'कृत्स्नवदेकस्मिन् कार्ये सक्तं' म्हणोनी. ॥ ६४५ ॥ जें सर्व कार्यरूप कारण जालें, । त्यांत एक कार्य त्या कारणासारिखें लेखिलें । आणि तेंची तत्त्व म्हणूनी ऐसें आसक्त देखिलें । तामस ज्ञान. ॥ ६४६ ॥ ऐसेंच कोणी ज्योतिरूप । मानिलें, ज्योतीचेंही प्रकाशक स्वरूप, । ज्योति आणि अधकारही जें अरूप । प्रकाशी सर्वां रूपांतें. ॥ ६४७ ॥ गगनीं पोकळीचें ज्ञान । ज्या स्वरूपें, तें गगनाचेंही निदान, । अलंकाराचें कारण उपादान । कनक अलंकारीं जे रीती. ॥६४८॥ ऐसीच दृष्टिगोचर ज्योती, । ते अतींद्रिय ब्रह्म म्हणूनी म्हणती, । हेही असो; कारणत्वरीती । कार्य कैसें सिद्ध होतें? ॥ ६४९ ॥ जें जालें सकळ, । आणि जैशाचें तैसेंची केवळ, । तें कृत्स्न म्हणावें. निष्कल; । कार्यास कैंचा हा महिमा?' ॥ ६५० ॥ कृत्स्नासारिखें कार्य मानुनी, । त्यांत तें ज्ञान आसक्त जालें म्हणोनी, । ऐसें बोलतां कृत्स्नशब्देंकरूनी । कार्य तत्त्व नव्हे, ऐसें सुचवी देव. ॥ ६५१ ॥ कीं जरी कृत्स्नपण । त्या कार्यास साधे, तरी ते निपुण । बोलोनी तरी विचक्षण । ते ज्ञाते म्हणूनी मग मानावे. ॥ ६५२ ॥ अतएव तें ज्ञान अल्प म्हणोनी । भगवंत म्हणे याचवरूनी, । कीं, पुसतां दीर्घ दृष्टीकरूनी ।

कुंठित होय तेंच अल्पत्व. ॥ ६५३ ॥ दीर्घदृष्टी कारणपण । साधे, तें म्हणावें कृत्स्न कारण, । हें एकदेशी बोलणें, जाण, । म्हणूनी ज्ञानं म्हणावें हें अल्प. ॥ ६५४ ॥ कीं आकाश सर्वगत, । तथापि सर्व नव्हे हें निश्चित, । कारणाचें सर्वपण वेदविहित । गमनास न घडे. ॥ ६५५ ॥ तैसें ज्योतीसही । सर्वपण सर्वथा नाहीं; । जरी सर्वपण असे कांहीं, । तरी नगीं हेम तैसी जगीं ज्योति दिसे. ॥ ६५६ ॥ कीं ज्योति दृष्टीस दिसे, । जगही दृष्टीस गवसे, । हेम आणि नग नाना जैसे । दोन्हीही दृष्टिगोचर. ॥ ६५७ ॥ जें कृत्स्न, तें अतींद्रिय, । तें नव्हे दृष्टीचा विषय; । तें बुद्धिगम्य, ऐसा वेदांचा निर्णय, । बुद्धीस रूपीं अरूपीं तेंची दिसे. ॥ ६५८ ॥ दृष्टीस जेव्हां रज्जु दिसे, । तेव्हांच सर्प कार्य त्या कारणा रज्जूचें गवसे, । अज्ञानियाच्याही बुद्धीस सर्वत्र ब्रह्म दिसतसे, । तेंच उमजे गुरुमुखेंकरूनी. ॥ ६५९ ॥ किंबहुना नव्हे रूपमय, । तो वायु त्वगिंद्रियाचा विषय, । त्यासही बुद्धि देखे चिन्मय, । कनकमय नग देखे दृष्टी जैसी. ॥ ६६० ॥ तें ज्योतिस्वरूप जेव्हां जालें, । तेव्हां दृष्टिगोचरत्व आलें; । वायूंत तेजोरूप कैसें म्हणतां, उडालें । ज्योतिस्वरूपाचें कृत्स्नपण. ॥ ६६१ ॥ ऐसेच प्राणादि, वाय्वादि, । कार्यच सर्व इत्यादि; । कारणास कृत्स्नपण जैसें वेदीं । तैसें न साधे तें ब्रह्म. ॥ ६६२ ॥ श्लोकार्थ एतत्प्रकार, । परंतु येथें कोणी टीकाकार । म्हणती तामसज्ञान गीताकार । प्रतिमादिउपासनेस बोलतो. ॥ ६६३ ॥ हेही गोष्टी खरी, । परंतु ढांसळोनी बोलती वैखरी, । कीं, ज्यां कार्यरूपां देवांची प्रतिमा कुसरी, । ते देव तों कृत्स्न नव्हती, कार्य ते. ॥ ६६४ ॥ ऐसा अर्थ घडे । तरी अबाधित अर्थ कैसा सांपडे ? । प्रतिमाच देव ऐसें तो कोणाहीकडे । नलगे ज्ञान. ॥ ६६५ ॥ कीं प्रतिमा पाषाण, । किंवा कारण मृत्तिका, सुवर्ण, । जो पूजी तो जाणतची असे आपण, । कीं, आकृति अमुकिया देवाची. ॥ ६६६ ॥ पाषाणातेंची देव म्हणते, । तरी कां प्रतिमा करविते ? । तेच आकृती देव मानिते, । तरी आवाहन विसर्जन न करिते ते पूजक. ॥ ६६७ ॥ आतां पशूंसारिखे जे पाहती, । ते म्हणावे, तरी येथें यदुपती । ज्ञान तामस म्हणे, तो तेव्हां विचाराचे रीती । पूजिती तें लेखावें. ॥ ६६८ ॥ त्यांत ज्ञानाचें तामसपण जना । ऐसें कीं कारणत्वें कार्यरूपाची उपासना, । क्षुद्र देवतांचे ठायीं भावना । सर्वेश्वर हेची म्हणोनी ऐसा अर्थ. ॥ ६६९ ॥ त्यास प्रमाण अद्वैत, । कीं, जें तें ब्रह्म ऐसें वेदविहित, । तेव्हां जें आपणास इष्ट वाटलें दैवत, । तेंची कारण सगुणब्रह्म मानिती. ॥ ६७० ॥ तेंही ज्ञान तामस अत्यंत, । कीं, जगत्कारण एकची भग-

वंत, । 'जो पिता ब्रह्मयाचा लक्ष्मीकांत, । तोची कारण देवांऋषींसहित विश्वाचा. ॥ ६७१ ॥ ऐसा पूर्वी निर्णय । या गीतेंत जाला, कीं, जगत्कारण अद्वय । एक श्रीकृष्ण, वरकड कार्य । ब्रह्मादि देव आणि ऋषी. '॥ ६७२ ॥ 'माझिया ईश्वरत्वाचा प्रादुर्भाव । न जाणती ऋषि, न जाणती देव, । कीं, मी त्यांचा आदि', देवाधिदेव । बोलिला म्हणूनी या श्लोकीं. ॥ ६७३ ॥

न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।
अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥

टीका याची विशद । मागें जाली प्रतिपद, । तें असो; अर्जुन म्हणे व्यासादि मुनिवृंद, । ऐसेंची बोलती म्हणूनी या तीं श्लोकीं. ॥ ६७४ ॥

परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।
पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १ ॥
आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।
असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ २ ॥
सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।
न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ ३ ॥

टीका यांची पूर्वीच जाली, । प्रस्तुत गोष्टी ऐसी निघाली, । कीं, व्यासादि मुनिवाणी श्रवणासी आली । ऐसी अर्जुनाच्या; ॥ ६७५ ॥ कीं, परब्रह्म आदिदेव जगत्कारण । तो हाची एक नारायण, । ब्रह्म निर्गुण आणि सगुण । हाची श्रीकृष्ण जगदात्मा. ॥ ६७६ ॥ म्हणजे व्यासादि मुनिजन । अनधिकारियास क्षुद्रां देवांचें भजन । बोलतां, तें तें देवच थोर ऐसें वचन । स्थळस्थळीं पुराणीं बोलिलें, ऐसी श्रुती. ॥ ६७७ ॥

एकं सद्विप्रा बहुधा वदंत्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥

श्रुति म्हणे सद्वस्तु एक, । त्या वस्तूतेंची विप्र व्यासादिक । बहुधा बोलती, जे उपास्यदैवतें अनेक । अग्नि, यम, वायु, इत्यादि. ॥ ६७८ ॥ ऐसें बोले व्यास । पुराणांतरीं थोर भलतियास; । परंतु कृष्णरूपी जगन्निवास, । ऐसें बोले स्वमुखें सिद्धांत बोलतां. ॥ ६७९ ॥ देवऋषि नारद, । तत्त्ववक्ता विशारद, । असित, देवल, हेही म्हणती, कीं, हाच वरद । परब्रह्म

१. अ० १०, श्लो० २. २. अ० १०, श्लो० १२, १३ व १४.

**मज आदिदेव** म्हणोनी. ॥ ६८० ॥ **द्वापारीं** ऐसें मुनिजन', रहस्य बोलती, **करूनी वेदार्थमथन**; । तीं सिद्धांतवचनें स्वकर्णी **अर्जुन** । त्यांच्या मुखें ऐकोनी बोले हा श्लोक. ॥ ६८१ ॥ **"आहुस्त्वामृषयः सर्वे"** या श्लोकेंकरूनी । म्हणे, म्हणती ऋषि सर्वही मिळोनी, । आणि **नारद, असित, देवल, व्यास**-मुनी, । हेही म्हणती, कीं, पर ब्रह्म आदिदेव एक हा. ॥ ६८२ ॥ आणि तूंही मज सांगसी स्वयें, । हें सर्व सत्यची मी मानितों निश्चयें, । ऐसें बोलोनी **धनंजयें** । सिद्धांत केला ये रीती; ॥ ६८३ ॥ कीं ऋषि इतर देवतांचा बडिवार । बोलती, कीं, जयांचा मंद अधिकार । ते त्या देवांचा श्रेष्ठत्वप्रकार । साचे मानूनियां भजोत त्यानें. ॥ ६८४ ॥ कीं जरी ते नव्हती जगत्कारण, । तथापि जो तो नग म्हणों ये सुवर्ण, । सुवर्णाच्या ऐक्यें सर्वां नगीं पूर्ण । कुंडल म्हणों ये. ॥ ६८५ ॥ ऐसीं कार्यरूपें देवतें, । कारणत्वें **पुराणींच** वर्णिलें तयांतें, । परी **गीतेंत** जें उपदेशिलें **भगवंतें**, । हें सिद्धांतरूपें **व्यासनारद** स्वमुखें बोलती. ॥ ६८६ ॥ व्यास यास एकवाक्यता । वाटली **अर्जुनातें** तत्त्वता, । म्हणूनी जाला बोलता, । **'सर्वमेतदृतं मन्ये'** म्हणोनी. ॥६८७॥ ऐसें जगत्कारणत्व, । इतर देवांस नसे हें महत्त्व, । तें सर्व कार्य कारण हाच, ऐसें तत्त्व । **उपनिषद्वार्गी** आणि **गीतेंत** सिद्ध जालें. ॥ ६८८ ॥ ज्याचा उपाधि शुद्धसत्त्व, । सात्त्विक ज्ञान कळणें त्याचें कारणत्व, । इतरांचे ठायीं स्थापिती हें महत्त्व । ते तामस ज्ञानी जाणावे. ॥ ६८९ ॥ ऋषीही तामसांकारणें उपासना । इतरां देवतांच्या बोलती नाना, । कीं, कांहीं काम्यफळ तरी त्या जना । जन्मांतरीं होणार. ॥ ६९० ॥ अमृत मानूनी कांजी प्याला, । तोही क्षुधेनें मरावा, तो तत्काळ जिता जाला: । **व्यासादि** मुनिजन जनांला । क्षुद्रउपासना मुख्यत्वें बोलती यास्तव. ॥ ६९१ ॥ त्या वचनाचा आश्रय । करूनी, ते उपासक करिती निश्चय, । कीं, जगत्कारण हेंची, परी निर्णय । त्या ज्ञानाचा तामस म्हणोनी. ॥६९२॥ कीं, कृत्स्ना जगत्कारणा । जैसें जाणावें **श्रीनारायणा**, । तैसें जाणती क्षुद्र देवतगणा, । याकारणें तेंही ज्ञानची, परी तामस. ॥ ६९३ ॥ बरें तामस जरी जालें, । तरी ज्ञानपण तों त्यास आलें, । ज्ञानाचें फळ कैवल्य बोलिलें, । म्हणूनी मानील **अर्जुन**. ॥ ६९४ ॥ म्हणूनी म्हणतो श्रीवत्सांक, । कीं तें ज्ञान अगा! अहैतुक, । कीं, ज्ञान ज्याचा हेतु तो मोक्षची एक, । तरी मोक्ष नव्हे या ज्ञानें. ॥ ६९५ ॥ त्यांत आकाशादि ब्रह्म म्हणती, । त्यांची पशूंचमध्यें गणती, । जे देवतांतर जगत्कारणत्वें जाणती, । त्यांस कांहीं काम्यफळ. ॥ ६९६ ॥ परी तें काम्यफळ । लेखावें उपा-

सनामूळे, । तें जगत्कारण म्हणूनी ज्ञान निष्फळ, । कीं कैवल्यफळ ज्ञानाचें तें नव्हे. ॥ ६९७ ॥ म्हणूनी म्हणे भगवंत, । कीं, अतत्त्वार्थवत् म्हणजे नव्हे तत्त्वार्थवत, । तत्त्वरूप अर्थ जो जाणती संत, । तो नसे ज्यामध्यें. ॥ ६९८ ॥ जें कृत्स्न होऊनी एकची कारणतत्त्व, । घडे त्या एकासची तत्त्वार्थत्व, । तोची अर्थ; आणि अनर्थत्व । त्यास जे सर्व कार्य त्याचें. ॥ ६९९ ॥ कीं सुवर्ण कारण तें अर्थ, । अर्थ तोची जें आहे यथार्थ, । सर्व अलकार मिथ्या अनर्थ, । कीं, अर्थ नसोनी दिसती. ॥ ७०० ॥ एवं तत्त्वरूप अर्थ ज्या ज्ञानांत नसे, । तत्त्वार्थ ज्या ज्ञानीं न दिसे, । ज्ञेय सर्व ते सर्वी न गवसे, । तें ज्ञान जाणावें अतत्त्वार्थवत्. ॥ ७०१ ॥ अतएव ते अल्प बोलिजेतें, । कीं, युक्ति चढतांच कुंठित होते; । जे अल्प, ते मागे राहतें, । बुद्धि पुढें चढे ज्याला निषेधूनी. ॥ ७०२ ॥ बुद्धीची पुरे धाव, । तर्काची पुरे हाव, । संदेहाचे नाढळे नांव, । ते ज्ञेय अनत सात्त्विका ज्ञानाचे. ॥ ७०३ ॥ तरग शब्दाचा नुरे, । चित्त चित्स्वरूपीं मुरे, । अनतत्वे आत्मा स्फुरे, । शुद्धज्ञान सात्त्विक तयाचे. ॥७०४॥ जे ज्ञेय तामस तयाचा अंत, । की गगनही पचमावरणपर्यंत, । एवंच ज्ञेय जेव्हा नव्हे अनत, । तेव्हा ज्ञान अल्प सहजची त्याचे. ॥ ७०५ ॥ दृष्टीस अवकाश दिसे. । अत याचा वाटतो की नसे, । परंतु वेदीं पुराणीं अत गवसे । पचमावरणीं. ॥ ७०६ ॥ चतुर्दशलोक पुरुषाकार, । त्यांस सात आवरणे बोलती शास्त्रकार; । पृथ्वी, उदक, तेज, वायु, नभ, अहकार, । महत्तत्व सातवे. ॥७०७॥ यात आवरण पहिले, । तें दुसरियात नाहीं बोलिले, । आवरण दुसरे राहिले । तिसरे लागता. ॥ ७०८ ॥ तसे आवरण पाचवें, । ते हे गगन जाणावे, । त्यापुढे आवरण ते म्हणावे । अहप्रत्ययस्फूर्तीचे. ॥७०९॥ ज्या अहकारापासुनी । आकाश उत्पन्न जाले म्हणोनी, । शास्त्रे बोलती, पुढें त्याहुनी । महत्तत्व ज्यापासूनी तो अहकार. ॥ ७१० ॥ अहकाराच्या आवरणीं । आकाश नाहीं, ऐसे वेदीं पुराणी; । तोही महदावरणीं नसे, तेथें काहणी । आकाशाची या कोठें? ॥ ७११ ॥ आतां हे शास्त्ररीती । न मानूनी, प्रत्यक्षाचवरी येती, । कीं, आकाशास अत न दिसे म्हणती, । तरी जेथवरी आकाश तेथवरी वायु. ॥ ७१२ ॥ तेव्हा गगन म्हणतां अनंत, । वायूचाही नसे अत, । कीं गगन जेथपर्यंत तेथपर्यंत अनत वायूही. ॥ ७१३ ॥ ज्या गृहांत वाटे निवारा, । तेथेंही असेच वारा, । कीं हालतांच विंजणा एकसरा । वारा प्रगटतो. ॥ ७१४ ॥ अनंतपणें गगन । ब्रह्म होय, तरी अनंतची पवन, । पवन ब्रह्म म्हणती जे जन, । ते गगनही अनंतत्वें कां न मानिती?

॥ ७१५ ॥ तेव्हां अनंतत्वें करूनी । ब्रह्में मानावीं दोनी, । अनंतत्व प्रत्यक्षा-चवरूनी । साधु म्हणती जेधवां. ॥ ७१६ ॥ आतां अमरकोशीं गगनाचें । अनंत म्हणूनी अभिधान, तरी हें साचें; । परंतु बहुकाळ वांचती म्हणूनी देवाचें । जैसें अमर, म्हणूनी अभिधान. ॥ ७१७ ॥ शास्त्रींच अमर नांव, । शास्त्रींच त्याचा अभाव, । ऐसाच गगनासी नाहीं ठाव, । आवरण सरतां पांचवें. ॥ ७१८ ॥ एवंच जरी शास्त्रप्रमाण, । तरी गगन अहंकारापासूनी निर्माण, । आणि प्रलयकाळाचें होतां उठाण । लय गगनाचा अहंकारीं. ॥ ७१९ ॥ शास्त्रीं याच कारणें । आकाशपर्यंत पांच आवरणें । एकापुढें एकाचीं कारणें, । गगनापुढें त्याचें कारण अहंकार. ॥ ७२० ॥ पृथ्वीचें नसे जळीं, । जळाचें आवरण नसे अनळीं, । अनळाचें नाहीं अनिळीं, । नभीं नसे अनिळाचें. ॥ ७२१ ॥ नभ नाहीं अहंकारीं, । अहंकार आपल्या कारणीं नाहीं, यापरी । प्रलयकाळीं कार्य कारणाच्या उदरीं । लय पावतां नाहींसेंच होणार. ॥ ७२२ ॥ आवरण दुसरिया आवरणपर्यंत, । हा देशेंकरूनियां कार्याचा देखिला अंत, । काळेंकरूनी अंत वदती वेदवेदांत । आपलाल्या कारणीं. ॥ ७२३ ॥ अंत ऐसें प्रतिकल्प; । ज्यास अंत, तें अल्प; । जें कृत्स्न कारण, तें अनल्प, । ज्ञेय अद्वय अनंत सात्त्विका ज्ञानाचें. ॥ ७२४ ॥ ज्ञेय ज्याचें अनंत, । त्याच्या ज्ञानासही नाहीं अंत; । तामस ज्ञानास अल्प म्हणतां, भगवंत । ज्ञेयही अल्प सुचतसे ऐसें. ॥ ७२५ ॥ तामसज्ञान ऐसें बोलिलें । कोठें तरी गुणसंख्येनें म्हणूनी पहिलें, । देवाधिदेवें निरूपिलें. । कीं त्रिविध बोलिलें सांख्यशास्त्रीं. ॥ ७२६ ॥ कपिलमुनि[1] भगवदवतार, । तो स्वयें सांख्यशास्त्रकार, । परंतु जे जाले भाष्यकार, । विरुद्ध कांहीं बोलणें तयांचें. ॥ ७२७ ॥ यालागीं तत्त्वसंख्या श्रुती । स्थळस्थळीं बोलती, । गीतेंत कांहीं बोलिला श्रीपती, । उरलें बोलणें त्यांतील हें सांख्य. ॥ ७२८ ॥ एवंच सा-त्त्विकज्ञानची न्याय्य, । राजसतामस अन्याय्य, । या प्रसंगसंगतीनें वृष्णिधुर्य । श्रीकृष्ण ज्ञान त्रिविध बोलिला. ॥ ७२९ ॥ न्याय्य अन्याय्य प्रसंगें । ज्ञान त्रिविध बोलिले श्रीरंगें, । परंतु 'ज्ञानकर्मकर्त्तेही त्रिविध मागें । सांगतों' म्ह-णूनी केली प्रतिज्ञा. ॥ ७३० ॥ त्यांत ज्ञान त्रिविध सांगितलें, आतां कर्म बोलों आरंभिलें, । त्यांत सात्त्विक कर्म पहिलें । बोलतसे या श्लोकीं. ॥७३१ ॥

---

१. कपिल हा भगवंताचा तिसरा अवतार वर्णिलेला आहे. 'मातेस आत्मविद्या शिकवुनि दे मुक्ति कपिल हा तिसरा । अवतार श्रवण करुनि, गाउनि, हरिभक्त हो! भवा विसरा '—मोरोपंत-कृत अवतारमाला, २२. २. यादवश्रेष्ठ.

**नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥**

नियत जें वर्णाश्रमोचित । नित्यकर्म वेदविहित, । जें न आचरतां बंध निश्चित । प्रत्यवायपातकेंकरूनी होतसे. ॥ ७३२ ॥ जें केलिया . चुकती । प्रत्यवायपातकफळें दुर्गती, । आणि उत्तमलोक कर्ते पावती । "**कर्मणा पितृलोक**" श्रुति म्हणे. ॥ ७३३ ॥ त्यांत मुमुक्षु कर्ते सात्त्विक । भगवदर्पण करिती, न होती बद्ध ते एक, । याचाच निर्णय मागें बोलिला उत्तमश्लोक । "**यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र लोकोयं कर्मबंधनः**" म्हणोनी. ॥ ७३४ ॥ ऐसें जें भगवदर्पित, । नित्यकर्म जें नियत, । तें सात्त्विक, म्हणे भगवंत । अर्जुनाप्रती. ॥ ७३५ ॥ यालागीं संगरहित । जें निष्कामकर्म नियत, । तेंच आचरावें निश्चित, । परी नसावा संग काम्यकर्माचा. ॥७३६॥ अतां संगशब्दें काम्य । तें टाकूनी यज्ञार्थ जें नित्यकर्म रम्य, । तें केलें तरी रजोगुणवैषम्य । कांहीं उरतें, तें नसे, तरी सात्त्विक कर्म तें. ॥ ७३७ ॥ कीं कर्म केलें नियत, । आणि काम्यकर्माविरहित, । तथापि चित्तीं रागद्वेषाचें संचित, । तरी तेंही कर्म सात्त्विक म्हणवेना. ॥ ७३८ ॥ कीं निर्मळा कर्माचिया जळें । भरिलें शुद्ध सत्त्वाचे तळें, । परी रजोगुणाच्या वायुबळें । रागद्वेष सोंडी फुटलिया. ॥ ७३९ ॥ किंबहुना कर्माचा । सहज अनादि गुण हा साचा, । कीं, भाव जैसा कर्तयाच्या मानमाचा, । तैसें फल द्यावें त्या कर्में. ॥ ७४० ॥ कीं मन म्हणजे द्रुम, । त्यास जळरूप कर्म; । जैसा वृक्ष, तैसा फलागम, । आंबियास आंबे, निंबास निंबोळिया. ॥ ७४१ ॥ तैसें मन स्वयें सत्त्व, । परी रजोगुणें राजसत्व, । तमोगुणें तामसत्व, । सात्त्विक दोहींवेगळें. ॥ ७४२ ॥ शुद्ध, पवित्र, निर्मळ, । निंबास घातलें गंगाजळ, । तरी निंबोळीच येईल फळ, । आंबा न ये. ॥ ७४३ ॥ कर्म सात्त्विक, मन राजस, । राजस फलच येणार त्यास, । म्हणोनी बोले जगन्निवास, । कीं, सात्त्विक तें, जें रागद्वेषविरहित केलें. ॥ ७४४ ॥ सात्त्विका मनोवृक्षाचें फल । ब्रह्मानंदानुभव केवळ, । त्यास सात्त्विक कर्मची जळ, । कर्म राजस तामस अनिल त्याला. ॥ ७४५ ॥ योग दोहींचा घडे, । तरीच फल मोक्षाचें सांपडे, । तें जळ जातां राजसतामसाकडे । मोक्षफळ मग कैंचें? ॥ ७४६ ॥ यालागीं रागद्वेषांवांचुनी केलें । तरीच सात्त्विककर्म बोलिलें, । आणि रागद्वेषरहित जालें । तेंच मनही सात्त्विक.

---

१. अ० ३, श्लो० ९. २. पाट, लोंढे.

॥ ७४७ ॥ कर्म, मन, आणि कर्ता, मिळोनी, । कर्म होतें, म्हणोनी । तिन्ही सात्त्विकें असावीं, त्यांत दोनी । बोलिलीं सात्त्विकें. ॥ ७४८ ॥ कीं कर्मी रागद्वेषरहित । मन केलें, तरी बुद्धींत । परलोककामना असिलिया, जें नियत, । तेंही पितृलोकफल देतें, श्रुति म्हणे. ॥ ७४९ ॥ यालागीं जो कर्ता पुढें विशद होणार, । तो याही श्लोकीं बोलतो गीताकार, । कीं ज्यानें कर्म केलें एतत्प्रकार । फलवांच्छारहित तो. ॥ ७५० ॥ जें केलें फलेच्छावर्जितें, । आणि मनोरागद्वेषरहितें, । काम्य टाकोनियां, नियत नुसतें, । तें कर्म सात्त्विक; ऐसा श्लोकार्थ. ॥ ७५१ ॥ सात्त्विककर्म एमें न्याय्य, । राजस तामस अन्याय्य; । त्यांत राजस कर्म आतां यदुवर्य । बोलतसे या श्लोकीं. ॥ ७५२ ॥

**यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥**

जें स्वर्गादि कामनेकरूनी । केलें, अथवा अहंकार मात्र अवलंबुनी, । मज थोर याज्ञिक म्हणावें म्हणोनी, । बहु क्लेशें कर्म करिजेतें. ॥ ७५३ ॥ तेंही राजस जाणावें, । कीं लोकप्रसिद्धि इच्छिती राजसस्वभावें, । स्वर्गादि कामनेसारिखें म्हणावें, । स्वप्रसिद्धीनिमित्त जें केलें. ॥ ७५४ ॥ होऊनी वेदोक्त फळ, । पुष्पतरूचा जैसा परिमळ । वृक्षास इच्छा नसतांही अनिळ । जनाच्या घ्राणांत पाववी. ॥ ७५५ ॥ ऐसें देऊनि फळ, । न इच्छितांही कीर्ति विमळ, । श्रवणें तृप्त करी सकळ । जनचीं त्या कीर्तीनें; ॥ ७५६ ॥ परंतु तो साहंकार, । क्लेश त्याचेच जाणावे फार, । कीं स्वर्गादि कामास फळ आणि विस्तार । कीर्तीचाही. ॥ ७५७ ॥ त्याचे क्लेश सफळ, । साहंकाराचे निष्फळ, । तेव्हां क्लेश फळ क्लेशाचें केवळ, । कीं, प्रसिद्धि तों त्याचीही होतसे. ॥७५८॥ अहंकार आणि क्लेश । त्यासही उणे नसती लेश, । परी त्यास काम्यफळ होतें, म्हणूनी हृषीकेश । साहंकार क्लेशी यालाची बोलिला. ॥ ७५९ ॥ तथापि सात्त्विकचीं कर्म तें न्याय्य, । राजस द्विविधही अन्याय्य, । कीं, मनुष्यजन्मफळ काय ? । काय स्वर्गादि फळें ? ॥ ७६० ॥ परिस देऊनी, घेणें ग्वापर; । देणें कामधेनु, घेणें खर, । तैसें नरदेह वय वेंचूनी, पामर । स्वर्ग नश्वर फळ साधितो. ॥ ७६१ ॥ लक्षचौऱ्यांसी योनी । नाना फेरे फिरोनी, । कल्पकोटी लोटतां नरदेहास येउनी, । स्वर्गादि फळें साधिती, हेंही अन्याय्य. ॥ ७६२ ॥ नाम गातां जेथें मुक्ती, । कथाश्रवणें घडे भक्ती, । स्वर्गादि नश्वर भुक्ती । तेथें साधी, हाही अन्याय्य. ॥ ७६३ ॥ एवच मोक्षसुख अक्षय । सात्त्विक कर्में पा-

विजे, तैंची न्याय्यँ; । राजस कर्मही अन्याय्य; । आतां अत्यंत अन्याय्य तामस या श्लोकीं. ॥ ७६४ ॥

**अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।**
**मोहादारभ्यते कर्म तत्तामसमुदाहृतम् ॥ २५ ॥**

**अर्जुना!** जें तामस कर्म, । तें करितां दिसे जरी धर्म, । तरी कर्म तें अधर्म, । जें पौरुष न इच्छूनी करिजेतें. ॥ ७६५ ॥ **वेदीं** स्वर्गादि कामना, । तें अदृष्ट फळ मिथ्या वाटे मना, । कौतुकार्थ मांडी रचना । यागाची. ॥ ७६६ ॥ **पौरुष** म्हणजे पुरुषार्थ, । पुरुषें साधावा स्वर्गादि अर्थ, । तो **वेदोक्त** मिथ्या वाटे अदृष्ट पदार्थ, । प्रत्यक्षमात्रीं श्रद्धा जयाची. ॥ ७६७ ॥ तथापि देखोनी यागाचा समारंभ, । आपण करी कौतुकार्थ आरंभ, । द्रव्यमदाचा स्तंभ । आवरेना. ॥ ७६८ ॥ कर्म तें म्हणावें **अनुबंध**, । कीं अनंतरच करी बंध; । आतां अनादि बंधाचा संबंध । आहेची, म्हणसी जरी **अर्जुना!** ॥ ७६९ ॥ तरी पायीं सहज शृंखळा, । दुसरीनेंही बांधला गळा, । तैसा मोहेंकरूनी त्या कर्तया खळा । अनुबंध तामसकर्मे हा विशेष. ॥७७०॥ कीं याग कौतुकार्थ जाला, । तेणें गर्व कोटिगुणें आला, । जाणों सोमरूपें करूनी प्याला । मदिरा गर्वाची! ॥ ७७१ ॥ म्हणसी कर्मप्रकार कैसा? । तरी **क्षय** आणि **हिंसा**, । क्षय बोकडाचा आणि वेळसा । हिंसेचा बुकिया मारिता. ॥ ७७२ ॥ दडपूनी नवही द्वारें, । ऋत्विज मारिती बुक्यांच्या मारें, । न मरतां शीघ्र मुष्टिप्रहारें । अधिकाधिक मारिती. ॥ ७७३ ॥ ऐसी परपीडा, हिंसा, । क्षय त्याच्या प्राणापहाराचा वळसा, । तामसा, कर्माचा प्रकार ऐसा । पुरे, **अर्जुना!** किती सांगो? ॥ ७७४ ॥ आतां, त्याची आईक वार्ता, । या भावें **जगदात्मा जगत्कर्ता** । सात्त्विक कर्ता । सांगतो या श्लोकीं. ॥७७५॥

**मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।**
**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥ २६ ॥**

काम्य टाकोनी मुक्तसंग, । आणि कर्ता आपण नव्हे ऐसें अंतरंग, । कीं, पांच कर्महेतु बोलिला **श्रीरंग**, । कर्तृत्व त्या **प्रकृतिभागीं** देखतो. ॥ ७७६ ॥ जरी अपरोक्ष आत्मा नाहीं समजला, । तरी आत्मा अकर्ता इतकें उमजला, । म्हणूनी कर्ता जें म्हणत होता मजला, । तें बोलणें ज्याचें राहिलें.

---

१ "कर्ता तामस उच्यते" इत्यादि पाठः ।. २. फेरा, प्रसंग.

॥ ७७७ ॥ न म्हणे, 'कर्ता आपण' म्हणोनी, । देखे कर्मसिद्धि पांचां हेतूं-करूनी, । आत्मा न कळे, तरी करी मनीं धरूनी । आप्तवाक्य कीं आत्मा अकर्ता. ॥ ७७८ ॥ 'मी कर्ता,' म्हणूनी अहंप्रत्यय, । आत्मा नव्हे हा कर्ता अहंकार, ऐसा निश्चय; । प्रकृतिभाग कर्ता ऐसा निर्णय; । आयकोनीच जो जाणे. ॥ ७७९ ॥ आयकोन आपण अकर्ता जाणे, । म्हणूनी, 'मी कर्ता,' न म्हणे, । जरी नाहीं पावला स्वात्मसुखें, । तरी 'अहं कर्ता,' ऐसा वादी[1] तो नव्हे. ॥ ७८० ॥ आणि धृति धैर्य जया असे, । उत्साह ज्याच्या चित्तीं वसे, । कीं काम्यफळ नानारीती वेदीं दिसे, । परी धैर्य ऐसें, कीं ज्यास तें तुच्छ. ॥ ७८१ ॥ काम्यफळाची लालसा । न उपजे धीराच्यां मानसा, । धैर्ययुक्त साधक ऐसा, । आणि नियत निष्कामकर्मीं उत्साह. ॥ ७८२ ॥ फळ-वांच्छेवांचुनी । कर्म करितां उत्साह उपजे मनीं, । ऐसें असोनीही काम्य टाकुनी, । निष्कामकर्मयोगीं उत्साह. ॥ ७८३ ॥ आणि कर्म जें आरंभिलें, । तें जरी निर्विघ्न समाप्त झालें, । तरी हर्षाच्या जळें ओलें । चित्त नव्हे. ॥ ७८४ अथवा जें आरंभिलें, । तें कर्म परिसमाप्ति नाहीं पावलें, । तथापि संतप्त नाहीं जालें । चित्त ज्याचें. ॥ ७८५ ॥ ऐसी आरंभिल्या कर्माची सिद्धी, । आणि ऐसी निर्विघ्न समाप्ति नव्हतां असिद्धी, । परंतु सिद्धि असिद्धि दोहीं ठायीं बुद्धी । जयाची निर्विकार. ॥ ७८६ ॥ कीं निष्काम ईश्वरार्पण । करावया कर्म करितों आपण, । त्या ईश्वराचें ऐसें ईश्वरपण, । कीं, कांहीं उणें त्यास नसे. ॥ ७८७ ॥ तो अवाप्तसकळकाम, । आपण भक्त निष्काम, । कर्मसिद्धि होतां कोण काम । सिद्ध होणार दोघांचा? ॥ ७८८ ॥ अथवा होतां असिद्धी । कोण फळाची खुटेल वृद्धी? कांहींच नसतां, कां बुद्धी । हर्षविषाद-युक्त होय? ॥ ७८९ ॥ ज्याची जैसी प्रीती, । प्रीती तैसीच त्यास दावी श्रीपती; । हा म्हणे, 'करावी सेवारीती,' । 'सेवा घ्यावी,' तो म्हणे. ॥७९०॥ कौतुकें लेंकरूं । लागे मातेची सेवा करूं, । सांडी उदक न शके सांवरूं । उदकपात्र. ॥ ७९१ ॥ न पावलें मातेस जळ, । परी ते तृप्त देखोनी खेळ, । भगवत्प्रीति मात्र फळ । ते तों आरंभमात्रें होतसे. ॥ ७९२ ॥ ऐसा सात्त्विका कर्माचा सात्त्विकची कर्ता, । म्हणोनी सांगे ब्रह्मादिकांचा भर्ता; । आतां राजसा कर्तयाची वार्ता । बोलतसे या श्लोकीं. ॥ ७९३ ॥

---

१. बोलणारा.

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।
हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥

विषयांचे ठायीं आवडी, । कर्मांचिया फळावरी उडी, । आणि लुब्ध लोभातें न सोडी, । प्राणासमान धनधान्य; ॥ ७९४ ॥ परपीडेचे ठायीं चित्त, । आणि शौचविरहित, । कांहीं लाभ होतां हर्ष अत्यंत, । हानि होतां शोक बहु; ॥ ७९५ ॥ ऐसा हर्षशोक ज्याला, । तो राजस कर्ता बोलिला. । आतां तामस कर्ता म्हणावें ज्याला, । तो ऐसा म्हणूनी बोलतो या श्लोकीं. ॥ ७९६ ॥

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥

सत्कर्म कांहीं आचरे, । परी त्या कर्मी चित्त न भरे, । मन चहूंकडे वावरे, । आणि दिसे कर्मी बैसला; ॥ ७९७ ॥ ऐसा तो अयुक्त बोलिला, । म्हणजे त्या कर्मी तो नाहीं योजला, । लोकांस करितोसा वाटला, । परी मन त्याचें नसे त्यांत. ॥ ७९८ ॥ आणि तो म्हणावा प्राकृत, । म्हणजे जडबुद्धि अत्यंत, । प्रकृतीतेंची वश होऊनी असे वर्तत, । प्रकृतिधर्म आवरावे, हें नसे. ॥ ७९९ ॥ आणि स्तब्ध म्हणजे गर्वित, । शठ शक्ति असोनीही न वेंचीवित्त, । प्रातःस्नानादि वर्जाया निमित्त । अशक्त म्हणवी शक्ति बरवी असोनी. ॥ ८०० ॥ आणि कोणी एक । कर्ता देखिला सात्त्विक, । अपमान त्याचा करी, कीं, 'हा ठक । दंभ करितो.' ॥ ८०१ ॥ आणि अत्यंत आळसी, । माध्यान्हीं बैसै प्रातःसंध्या करावयासी, । यथाकाळीं न धरी मानसीं । कर्म करणें. ॥ ८०२ ॥ कर्म आचरायाचा वेळसा, । परी विषादी म्हणजे ऐसा । कीं कर्म न करावें ये रीती ठसा । विषादाचा हृदयांत. ॥ ८०३ ॥ विषाद म्हणजे अकर्मण्यता, । कीं कर्म न रुचे चित्ता, । अर्जुनविषादाची वार्ता । 'कर्म न करीं,' म्हणूनी प्रथमाध्यायांत. ॥ ८०४ ॥ विषादशब्द प्राकृतीं । क्रोधादिकांकडे लाविती, । परी निर्णय योगशास्त्रीं ये रीती, । कीं, अकर्मण्यता म्हणजे न आवडे कर्म. ॥ ८०५ ॥ आणि दीर्घसूत्री । दीर्घ[1] संशय कर्ममात्रीं, । म्हणे, 'नृगराजा सर्वस्व सत्पात्रीं । अर्पूनी शेवटीं सरड जाला. ॥ ८०६ ॥ कर्म करावें, परी । सांग न होय जरी, । नरकप्राप्ति होणार तरी,' । ऐसा दीर्घसूत्री. ॥ ८०७ ॥ शास्त्रज्ञ विधि सांगती, । तो घडे ऐसी भ्रांती, । दीर्घसूत्रीपणेंकरूनी मती । संशययुक्त सर्वदा. ॥ ८०८ ॥ तोही

---

१. प्रसंग.

कर्ता तामस । बोलिजेतो, म्हणे श्रीनिवास, । कीं, सात्त्विक होऊनी जयास । दीर्घसूत्र, तोही तामसच बोलावा. ॥ ८०९ ॥ "**दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते**" म्हणूनी, । येथें या चकारेंकरूनी, । दीर्घसूत्रीही तामस म्हणे, यावरूनी । भलताही दीर्घसूत्री वाईट. ॥८१०॥ 'शास्त्रवेत्ते सदाचारी। जे गोष्टी सांगती, तेच वरीं,' । जो ऐसें मनीं न धरी, । तो सात्त्विक कर्ताही तामसच, अर्थ ऐसा. ॥ ८११ ॥ ऐसे कर्ते त्रिप्रकार, । कीं, जैसी बुद्धि तदनुसार । कर्ता, आणि जैसी धारणा तैसा आचार। कर्तयाचा. ॥ ८१२ ॥ तरी त्यांच्या बुद्धि आणि धारणा । कैशा कळाव्या आपणा? । ऐसें वाटेल येथें अंतःकरणा, । तरी तेंही आईक म्हणतो या श्लोकीं. ॥ ७१३ ॥

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥**

धनंजया! भेद बुद्धीचे, । आणि भेद धारणाचे, । आईक जे मी बोलतों स्ववाचे । वेगळे वेगळे अशेषंकरूनी. ॥ ८१४ ॥ म्हणसी, 'भेद कोठोनी आले?' । तरी या गुणाचपासूनी जाले, । ते धनंजया! ऐक, ऐसें बोले. । 'धनंजय' म्हणतां करी श्रवणीं सादर. ॥ ८१५ ॥ कीं राजसूय यागाचीं साधनें । जिंकिलीं सकळां रायांचीं धनें. । म्हणूनी तूं धनंजय अभिधानें । प्रसिद्ध जगीं. ॥ ८१६ ॥ परी तैसीं असंख्यात धनें । क्षणांत हरिलीं दुर्योधनें, । अरे! हीं अक्षय मोक्षसुखाचीं साधनें । सांठवीं धनंजया! ॥ ८१७ ॥ आतां भेद म्हणतां गुणापासुनी, । ते सत्त्व रज तमची, म्हणोनी । त्रिविध भेद सांगतों येथूनी, । त्यांत सात्त्विक बुद्धिभेदविषयीं हा श्लोक. ॥ ८१८ ॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।**
**बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥**

जाणे बंध, जाणे मोक्ष, । जाणे दोहींचे दोन्ही पक्ष, । ते बुद्धि म्हणे सरोरुहाक्ष[1] । सात्त्विकी म्हणोनी. ॥ ८१९ ॥ कीं बंधाचा पक्ष सांडी, । मोक्षाचा पक्ष मांडी, । तेच संसारसिंधु ओलांडी, । सात्त्विकी वास्तव, हा भाव. ॥ ८२० ॥ आतां कोण पक्ष सांडायाचा? । आणि कोण पक्ष मांडायाचा! तरी आईक पार्था! ते वाचा, । या भावें म्हणे, 'प्रवृत्ति ते त्यागार्थ.' ॥ ८२१ ॥ याकारणें प्रवृत्ति सांडी, । आणि

---

१. कमलनयन कृष्ण.

जाणे निवृत्ति, तीस मांडी, । ईश्वरकृपेनें ओलांडी । संसारसिंधू. ॥ ८२२ ॥ नाव पावली पैल तीर, । म्हणजे पावलाच पैल तीरा नर, । जो त्या नावेंत बैसला; ऐसें सर्वेश्वर । सुचवी तरला बुद्धियोगें. ॥ ८२३ ॥ रजतमातीत बुद्धी । पावे ब्रह्मात्वबोधसिद्धी, । ऐक्यानंदाची तेंव्हां समृद्धी । संसारिया चिदंशातें. ॥८२४॥ यालागीं बंधमोक्ष जाणे, । कीं प्रवृत्तीतें बंध म्हणे, । ते सांडी, निवृत्ति मांडी, तेंव्हां बाणे । चिदंशातें बिंबैक्य. ॥ ८२५ ॥ एवंच टाकितां प्रवृत्ती, । अवलंबितां निवृत्ती, । गुरुमुखेंकरूनी सत्त्ववृत्ती । जाणे स्वस्वरूपातें. ॥ ८२६ ॥ तेथें जडचैतन्य भाग, । जाणे दोहींचा विभाग, । कार्यावरूनी सांपडे माग । कारणाचा. ॥ ८२७ ॥ कीं जडमात्रास कार्यपण, । उरलें तें त्या कार्याचें कारण, । तें कार्य नव्हे, ऐसा आत्माच आपण, । जाणे ऐसें. ॥ ८२८ ॥ ऐसें जड कार्य । जाणे, आणि कारण तें अकार्य; । 'कार्या अकार्यातें ', ऐसें यदुवर्य, । 'जाणे,' म्हणे 'बुद्धि सात्त्विकी.' ॥ ८२९ ॥ आणि जाणे भय. । तद्विलक्षण जाणे अभय, । भय कार्य पाहतां, आणि निर्भय । होणें, पाहतां कारण अभय तें. ॥ ८३० ॥ कीं ज्या घडी कार्य जड । जडत्वें पाहे, तेंव्हां संसार अवघड, । 'मी, माझें,' ऐसी तडफड । होय पूर्वसंस्कारेंकरूनी. ॥ ८३१ ॥ तें जड कार्य नानाकार । जैसे सागरीं तरंगाचे प्रकार, । समुद्रदृष्टी निर्विकार । समुद्रची अवघा. ॥ ८३२ ॥ किंबहुना भ्रमदृष्टी सर्पची भय, । रज्जुदृष्टी रज्जूच अभय; । कार्य भय, कारण निर्भय, । सुख कारणदृष्टीच बुद्धीतें. ॥ ८३३ ॥ बुद्धि ऐसी सात्त्विकी । उत्तमश्लोकें वर्णिली या श्लोकीं, । कीं, अभय कारणदृष्टीकरूनची या लोकीं, । कार्यदृष्टी पाहतां अतिभय. ॥ ८३४ ॥ सात्त्विकभेद ये रीती । बुद्धीचा बोलिला श्रीपती; । आतां राजसभेद पार्थाप्रती । सांगतसे या श्लोकीं. ॥ ८३५ ॥

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।**
**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥**

ज्या बुद्धीकरूनी जाणे धर्मातें, । आणि जाणे अधर्मातें, । जाणे कार्यातें, आणि कारणातें, । परंतु जाणणें तें अन्यथा. ॥ ८३६ ॥ यथास्थित तत्त्व इतकियांचें । जाणावें जे रीती धर्मादिकांचें, । तैसें न जाणोनी जाणे, कीं, साचें । हेंच, जें आपण जाणतों. ॥ ८३७ ॥ "अयथावत् प्रजानाति" । या चरणेंकरूनी श्रीपती । म्हणे, धर्मादिकांतें जाणावें जे रीती, । तैसेंही प्रकर्षें तो न जाणे. ॥ ८३८ ॥ कीं जें जाणे, तें अन्यथा, । आणि तो जाणे कीं 'जाणतों तैसेंची आहे सर्वथा,' । ऐसें ज्या बुद्धीनें जाणतो, ते पार्था ! । राजसी बुद्धी. ८३९

आतां जाणावें तैसें । न जाणोनी, जाणेतें कैसें? । तरी अन्यथा धर्मादिकांचें रूप ऐसें, । कीं, धर्म होय आणि नव्हे तत्त्व धर्माचें. ॥ ८४० ॥ कीं वेदविहित धर्म, । म्हणोनी पशुहिंसादि अगत्य आचरे कर्म, । परंतु कां हिंसा बोलिला हें वर्म । न कळतां, हिंसा करी, याचें नांव अयथावत्. ॥ ८४१ ॥ तरी तात्पर्य वेदाचें निवृत्ती, । आणि लोभें आवडे प्रवृत्ती, । विषयांकडे मनोवृत्ती । जनांची अनादिसंस्कारें. ॥ ८४२ ॥ ते प्रवृत्ति अनावर, । अविधि भोग भोगिती नारीनर; । जैसे पशु वानरखर, । तैसे मनुष्यही. ॥ ८४३ ॥ परंतु नरदेहीं पापाचरण, । फळ त्याचें नरक दारुण, । म्हणूनी वेदवक्ता सर्वेश्वर करुण । प्रवृत्ति उणी करी चमत्कारें. ॥ ८४४ ॥ कीं भलती नारी, भलता नर, । रमती, हिंसा करिती स्वैर, । मांस भक्षिती पामर, । मद्य पिती. ॥ ८४५ ॥ तें समूळ वर्जावें जरी, । तरी कोण वेदाज्ञा मस्तकीं धरी? । याकारणें विधि, हें तों करी । श्रीभागवतीं हें स्पष्ट. ॥ ८४६ ॥ नवयोगी आणि जनक भूपती, । यांचा संवाद भागवतीं, । एकादशस्कंधीं जनकाप्रती । नवांत आठवा नामें चमस बोले हा श्लोक. ॥ ८४७ ॥

**लोके व्यवायामिषमद्यसेवा नित्यास्तु जंतोर्नहि तत्र चोदना ॥**
**व्यवस्थितिस्तेषु विवाहयज्ञसुराग्रहैरासु निवृत्तिरिष्टा ॥**

नवयोगियांत नामें चमस, । तो म्हणे जनकास, । कीं, लोकीं सर्वा जनांस । सहज प्रवृत्ति विषयभोगीं. ॥ ८४८ ॥ वेदांच्या आज्ञेविना । स्त्रीसंग मद्यमांस आवडे जना, । सहज प्रीति लोकांच्या मना। येविषयीं नाहीं वेदविधी. ॥ ८४९ ॥ आतां ऋतुकाळीं स्त्रीसंगम । बोलती निगम आगम, । आणि मांस होमशेष भक्षावें उत्तम, । सौत्रामणियागीं मद्य हुंगावें. ॥ ८५० ॥ विधिवचन ये रीती । प्रमाणें वेद बोलती; । परंतु जरी सहज प्रवृत्ति नसती, । तरी हे विधि खरे होते वेदवाचे. ॥ ८५१ ॥ तरी विधिवाक्याची काय गती? । चमसयोगी म्हणे, जनका! म्हणसी ये रीती, । तरी वेदांस इष्ट निवृत्ती, । कीं विषयापासूनी परतावें. ॥ ८५२ ॥ सर्वथा न करावा स्त्रीसंग, । हें वेदतात्पर्य अंतरंग, । परी अनावर अनंग, । तीव्र बळ मदनाचें. ॥ ८५३ ॥ म्हणूनी ऐसा वेदाज्ञाप्रवाह, । कीं सत्कुळ वरवधूंचा विवाह, । संग त्या स्त्रीपुरुषांचाच युक्त, ऐसा निर्वाह । सुरतप्रसंगीं. ॥ ८५४ ॥ सर्वथा मांस न सुटे जना; । केवळ निषेधितां, वेदवचना । कोणी न मानिती, म्हणूनी रचना । यज्ञाची बोलिली. ॥ ८५५ ॥ कीं, पशुमांस होमावें, । हुतशेष मांस भक्षावें; ।

आणि सौत्रामणियागीं हुंगावें । मद्य, म्हणूनी वेदाज्ञा. ॥ ८५६ ॥ जे सदा स्वइच्छेनें सेविती, । विधि ऐसे वेद त्यांतेंच वदती, । कीं, या विधीनें वर्तता होती । वेदविधिकिंकर जैसे तैसे. ॥८५७॥ आणि स्वइच्छेनें जे होती प्रवृत्ती, । समूळ तीपासूनी जाली निवृत्ती, । जरी विषयलालसा न सोडी वृत्ती, । तरी सर्वदा स्वइच्छाविहार राहिला. ॥ ८५८ ॥ उणी व्हावी प्रवृत्ती, । जैसी लागावी निवृत्ती, । निवृत्तीची सोय धरितां मनोवृत्ती, । पुरुष मोक्षमार्गी लागला. ॥ ८५९ ॥ याकारणें हेच धर्म । मानूनी, करणें हिंसा कर्म, । "अयथावत्" प्रकर्षें जाणायाचें वर्म । धर्मविषयीं ये रीती. ॥ ८६० ॥ प्रस्तुतीं इतका प्रसंग, । कीं, धर्म जाणावा तैसा न जाणे, म्हणे श्रीरग, । कीं, वेदोक्त पशुहिंसा वाटे, परी अंतरंग । न जाणे वेदांचे. ॥ ८६१ ॥ वेदोक्त तो धर्म खरा, । परी कळला नाहीं बरा, । कीं, सहज प्रवृत्ति नरां, । तेंची वेद काय सांगेल? ॥ ८६२ ॥ उगीच सध्याउपासना । वेद बोले या विधिवचना, । विचारिलां, वेदांवांचूनी जना । सध्या नाहींच ठाउकी. ॥ ८६३ ॥ सध्या नव्हे विषय कांहीं, । स्वयें सध्याप्रवृत्ति कोणास नाहीं; । ऐसी असती पशुहिंसाही, । तरी वेदोक्त धर्म तो यथावत् बोलावा. ॥ ८६४ ॥ बालक शिसातें चोळिती, । त्याकरितां व्यथा पावती, । म्हणूनी सोन्याची बुली करिती, । बांधिती कडदोरियातें; ॥ ८६५ ॥ कीं तें चोळितां हातें, । मग न चोळिती यातें, । परी तें चोळी तयातें । न म्हणवे आवश्यक. ॥ ८६६ ॥ सर्वथा हिंसा करूं नये म्हणोनी । श्रुति म्हणे, "न हिंस्यात्सर्वभूतानि" । ऐसी हिंसा वर्जिली असोनी, । वाटे हिंसाची धर्म. ॥ ८६७ ॥ पाहतां वेदविहित । धर्म जाणेच निश्चित; । परी किमर्थ हिंसाधर्म प्रवृत्त? । हें यथावत्प्रकारें कळेना. ॥ ८६८ ॥ हिंसा न करावी म्हणती, । तेच हुतशेष मांस खावें म्हणूनी वदती; । त्या मांस भक्षायाची नित्य प्रवृत्ती, । हिंसा न करावी, हें अपूर्व. ॥ ८६९ ॥ तथापि हाच मुख्य धर्म । ऐसें मानूनी, आचरे हिंसाकर्म, । आणि जाणे, कीं, धर्माचें वर्म । हेंच, जें मी जाणतों. ॥ ८७० ॥ म्हणोनी म्हणे श्रीपती, । कीं, "अयथावत्प्रजानाति", । यथावत्प्रकार न कळोनी, स्वमती । प्रकर्षे जाणते, म्हणूनी जाणे. ॥ ८७१ ॥ ज्या बुद्धीकरूनी । अयथावत् तेंची यथावत् म्हणोनी । प्रकर्षे जाणतो, ते बुद्धि त्यावरूनी । राजसी जाण. ॥ ८७२ ॥ आतां ऐसाच जाणे अधर्मातें, । परी अयथावत् प्रकर्षे जाणतो, ऐसें भगवंतें । बोलिलें, कीं, तत्त्वता तयातें । नाहीं कळला अधर्मही. ॥ ८७३ ॥ अधर्म दिसे खरा, ।

म्हणूनी निश्चय राजसी बुद्धीच्या नरा; । परंतु विचार करितां बरा, । न वाटे तो अधर्म सात्त्विकी बुद्धीतें. ॥ ८७४ ॥ कीं पक्वज्ञानी अत्यंत । बाहेरी मूढ, अंतरीं पंडित, । न वर्जी चांडाळादिपर्यंत । मुखीं पडला तो ग्रास गिळी. ॥ ८७५ ॥ वर्ण पाहतां ब्राह्मण, । त्यास पातित्य चांडाळान्नभक्षण, । हें अधर्मलक्षण । नव्हे कैसें ? ॥ ८७६ ॥ ज्यांस ज्ञानकांड अमान्य, । कर्मकांडाचेंची प्राधान्य, । ते त्यास मानूनी सामान्य, । पतितची म्हणती. ॥८७७॥ देखोनी त्याचें आचरण, । करिती पातित्याचें विवरण; । जरि तो विश्ववंद्य-चरण, । कर्मठां वाटे पतित तो. ॥ ८७८ ॥ जे अद्वैत मार्गातें दूषिती, । भक्तिमार्गातें उडविती, । गोष्टी बोलतां बुडविती । वैराग्याची. ॥ ८७९ ॥ त्यांच्या दृष्टी अधर्म । वाटे त्या ज्ञानियाचें कर्म; । ज्यांस ठाउकें त्याचें वर्म, । त्यांस तो अधर्म वाटेना. ॥ ८८० ॥ याकारणें अधर्म जाणें, । तें अयथावत् प्रकर्षे जाणतो, देव म्हणे, । कीं, यथास्थित जाणतो ऐसें त्यास बाणे, । परंतु तें अयथावत्. ॥ ८८१ ॥ धर्माधर्म ये रीती । कर्मकांडीं जाणे राजस मती, । दुसरी वर्णील श्रीपती । ज्ञानकांडीं बुद्धि राजस जयाची. ॥ ८८२ ॥ **"यया धर्ममधर्मं च"** या **च**कारेंकरूनी । धर्म जाणें, तैसा अधर्मही, म्हणोनी, । **"कार्यं चाकार्यमेव च"** म्हणोनी दोनी । **च**कार या चरणीं यास्तव. ॥ ८८३ ॥ कीं, कार्य जाणे जैसें, । अकार्य कारणही जाणे तैसें । एका **च**कारें ऐसें । बोलिला देव. ॥ ८८४ ॥ दुसरिया **च**कारेंकरूनी । हा वेगळा जो ज्ञान अयथावत् प्रकर्षे जाणे म्हणोनी, । भगवत बोलेल आतां येथूनी । बुद्धि ज्ञानकांडीं ज्याची राजस तो ऐसा. ॥ ८८५ ॥ कीं, कार्य जड म्हणूनी जाणे, । तरी हें नव्हे कोण म्हणे ? । परी यथावत्प्रकारें नेणे, । अयथावत् प्रकर्षे जाणतो. ॥ ८८६ ॥ तें कैसें? म्हणोनी । अर्जुन पुसे, तों **एव**शब्दें-करूनी । **'कार्यमेव प्रजानाति'** ऐसा अन्वय सुचवुनी, । म्हणे देव अयथा-वत्. ॥ ८८७ ॥ कीं कार्यातें कार्यची जाणतो, । आणि कारणासी ऐक्य नाहीं म्हणतो. । एवंच, जडैक्य नव्हे, ऐसाच बाणतो । बोध त्यातें अयथावत्. ॥ ८८८ ॥ कीं, पट कार्य, परी तंतूची असे, । जरी पटत्वें स्पष्ट दिसे, । कार्य जाणती ज्ञानी ऐसें, । तें ज्ञान त्यातें आहे म्हणावें यथावत्. ॥ ८८९ ॥ कीं, कार्य दिसे, परी । कारणची जाणे ऐसी बरी । बुद्धि राजसी नव्हे, कीं, जाणते खरी । कार्य म्हणूनी कार्यातेंचि परी अयथावत्. ॥ ८९० ॥ **एव**-शब्दें **"कार्यमेव । अयथावत्प्रजानाति"** म्हणे देव, । अर्थ ऐसा दावी

देवाधिदेव, । कीं, कारणैक्य नेणे, कार्यच म्हणे. ॥ ८९१ ॥ एवंच कार्य प्रपंच सकळ, । स्वोपादान कारणची आहे केवळ, । ऐसें नेणे, त्याच्या बुद्धीस मळ । रजोगुणाचा. ॥ ८९२ ॥ आतां अकार्य म्हणजे कारण, । जें सर्व त्रिगुण कार्य होऊनी निर्गुण, । याची कारणपणाची जाणे खूण । श्रवणद्वारा, परंतु अयथावत्. ॥ ८९३ ॥ येथेंही एवशब्दें "अकार्यमेव । अयथावत्प्रजानाति" ऐसा देव। अन्वय सुचवी देवाधिदेव, । कीं, कारणातेंची जाणे परी अन्यथा. ॥ ८९४ ॥ "अकार्यमेव प्रजानाति" । म्हणिजे कार्य नव्हेच तें कारण म्हणूनी मती । त्याची जाणे, कीं, अधिष्ठानरीती । विवर्त कार्यही हेंच, ऐसें नेणे यथावत्. ॥ ८९५ ॥ कारण नव्हे तें म्हणावें कारण । हें कारण वाचकच व्याकरण । एवशब्दें नव्हेच कार्य ऐसें विवरण, । म्हणजे जडास ब्रह्मत्व न घडेच, ऐसें जाणतो. ॥ ८९६ ॥ कारणच कार्य बोलती श्रुती, । यास अन्यथा जाणे तो "अयथावत्प्रजानाति" । एवशब्दें ऐसें श्रीपती । येथें सुचवी भेदमत. ॥ ८९७ ॥ कीं, कारण ब्रह्म जाणे आयकोनी, । परी भेदशास्त्र पडलें कानीं, । ब्रह्म प्रपंच न घडे म्हणोनी, । ऐसें अयथावत् प्रकर्षे तो जाणे, ॥ ८९८ ॥ प्रपंचाकारें ब्रह्म दिसे, । प्रवाह ऐसा अनादि असे, । म्हणूनी सर्व कार्यही ब्रह्मत्वें गवसे, । त्यातेंची कळलें म्हणावें कारण. ॥ ८९९ ॥ स्वयें ब्रह्म जग नसतें, । तरी परोक्ष अपरोक्ष तें नुसतें । कळतां, कळलेंसें दिसतें । त्या बुद्धिमंतास कारण. ॥ ९०० ॥ प्रपंच तेंच आपण । कार्यरूपें दिसे कारण, । ऐसी कारणाची दिसे खूण, । तोची कारण जाणे म्हणावा यथावत्. ॥ ९०१ ॥ एवंच कार्यावेगळें कारण । जाणे, आणि मानी आपणास निपुण, । त्याच्या बुद्धीची अर्जुना ! खूण । जाण राजसी म्हणोनी. ॥ ९०२ ॥ कोणी जाणोनी अद्वैत, । जडावेगळा आत्माही समजले निश्चित, । परी जड नश्वर अंतवंत, । म्हणूनी मिथ्या म्हणती नश्वरत्वें. ॥ ९०३ ॥ परंतु जड सर्वही ब्रह्म, । याचें न जाणती वर्म, । कीं, जें मिथ्या त्यांत कैसें सत्य परम ? । तें अपरोक्ष त्यातें न जालें. ॥ ९०४ ॥ ओळंखिली जरी दसोडी, । तो तंतूची सर्व पासोडी । ऐसें जाणे, तोची सोडी । भेद कार्यकारणाचा. ॥ ९०५ ॥ दसोडी तंतु जाणे, । पासोडींत त्याचें रूप नेणे, । उगाच आयकोनी मिथ्या म्हणे । पासोडीतें. ॥ ९०६ ॥ भूमंडळीं ऐसे नेणों किती ! । 'जड नव्हे ब्रह्म' म्हणती; । आणि चिदात्मा जडनिषेधें जाणती, । त्यांचीही गणती यांमध्यें. ॥ ९०७ ॥

आतां 'अयथावत्प्रजानाति' । या श्लोकीं म्हणे श्रीपती, । कितीएक येथें ऐसें वाखाणिती । कीं संशययुक्त जाणतो. ॥ ९०८ ॥ जरी म्हणावें अन्यथा, । तरी धर्मास अधर्मत्वें जाणे म्हणावें सर्वथा, । तों उत्तरश्लोकीं तामसबुद्धीची कथा, । तेथें अधर्मास धर्म म्हणे ते तामसी. ॥ ९०९ ॥ येथें तद्विपरीत अर्थ । बोलावयाकारणें तदर्थ । संशययुक्त जाणे ऐसा वाक्यार्थ । कोणी बोलती. ॥ ९१० ॥ परंतु संशययुक्त जो जाणे, । तो 'मी जाणतों' ऐसें न म्हणे; । जों तत्त्व संशयरहित बाणे, । तोंवरी तो नेणताच त्या गोष्टीचा. ॥ ९११ ॥ प्रथम संशययुक्त भलता जाणे, । परी संदेह दूरीं व्हावा म्हणे, । त्यास निःसंशय जेव्हां तें बाणे, । तेव्हां तो त्या प्रकाराचा जाणता. ॥ ९१२ ॥ हेंही असो 'प्रजानाति' । म्हणूनी म्हणतो यदुपती; । अयथावत् प्रकर्षें जाणे, तरीच मती । राजस बोलिली तयाची. ॥ ९१३ ॥ याचा समजला अर्थ । भगवत्सन्निधिप्रतापें पार्थ, । कीं भगवत्सन्निधानेंची जे समर्थ । ते ऐसा श्लोकार्थ समजले. ॥ ९१४ ॥ धर्मरूपेंची जाणे धर्म, । अधर्मरूपें अधर्म, । कार्य कारणही जड आणि ब्रह्म । जाणे प्रकर्षें, परी तें अयथावत्. ॥ ९१५ ॥ प्रकर्षें जाणतो, । म्हणजे 'बरें खरें मी जाणतों,' म्हणतो; । परी सर्वज्ञ भगवंत बोलतो । अयथावत् म्हणोनी. ॥ ९१६ ॥ ऐसा ज्या टीकेंत अर्थ, । तेची टीका यथार्थ; । अर्थास बाध लागे, तो व्यर्थ, । कीं, गीतावचन सर्वज्ञाचें. ॥ ९१७ ॥ बाध लागे वचना, । जो सर्वज्ञ, तो ऐसें वदेना. । जो बाधित अर्थ बोले, त्यास रचना । न कळे वाक्याची, जाणावें. ॥ ९१८ ॥ या दों बुद्धींचे दोन प्रकार, । ऐसे, कीं, राजसी ते सच्छास्त्रानुसार । कर्मकांड-ज्ञानकांडविचार । जाणे कीं 'मज कळतें हेंची सत्य.' ॥ ९१९ ॥ परी सर्वज्ञातें असंमत । जरी सच्छास्त्ररीतींच तें निश्चित, । कीं, दीर्घदृष्टीरहित । अयथावत्प्रकार अल्पदृष्टी. ॥ ९२० ॥ सोडोनी सच्छास्त्ररीती, । असच्छास्त्रें धरूनी तामसी मती, । अधर्मसा दिसोनी त्याप्रती । धर्मची मानी तमोगुणें. ॥ ९२१ ॥ असो हे बुद्धि ऐसी राजसी । सांगोनी, आतां जे तामसी । बुद्धि राहिली, ते ऐसी । सांगतसे या श्लोकें. ॥ ९२२ ॥

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।**
**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥**

अगा ! अर्जुना ! जो अधर्म, । त्यातेंची जे मानिती धर्म; । निषिद्ध जें विकर्म, । सत्कर्म मानी तयातें. ॥ ९२३ ॥ श्रुति आणि स्मृती । जें जें

कर्म निषेधिती, । ऐसें तें मानी धर्मरीती, । शाबरादि मंत्रउपासना धर्म वाटे. ॥ ९२४ ॥ जारण, मारण, मोहन, । वशीकरण, उच्चाटण, स्तंभन, । हें सर्वही नरकाचें साधन । धर्म मानी. ॥ ९२५ ॥ बुद्धिवृत्ति सत्त्वाची । हे गोष्टी शास्त्रसिद्ध साची, । परंतु बुद्धीस तमाची । भ्रांति करी आवरण ऐसें. ॥ ९२६ ॥ याकारणें पांडुसुता ! । बुद्धि ते तमसावृता, । भगवंत म्हणे, कीं, हे वार्ता । जे तमें वेष्टिली तिये बुद्धीची. ॥ ९२७ ॥ आतां तामसी बुद्धि ज्यांची, । प्रवृत्ति वेदीं शास्त्रीं नसेल त्यांची, । ऐसें म्हणावें, तरी कैंची । बुद्धि ऐसी तयांला ? ॥ ९२८ ॥ कीं जो अधर्म, । त्याचें नांव ठेवूनी धर्म, । करूं नये तें कर्म । मग करी. ॥ ९२९ ॥ तरी कल्पित नवे आगम, । ते पुरातन, ऐसें मोहरूप तम । निश्चय उपजवी, तों त्या आगमास निगम । आणि पुराणें सदा विरुद्ध. ॥ ९३० ॥ निष्ठा कल्पित आगमीं, । त्या आगमास विरुद्ध जें निगमीं, । तें कळे, परंतु पांडित्यबळें दुरागमीं । अर्थ वाखाणिती विपरीत. ॥ ९३१ ॥ धर्म मानी अधर्मातें, । येथें सुचविलें कल्पित आगमातें, । कीं, प्रमाणपूर्वक जें कर्म, त्यातें । म्हणावें धर्म. ॥ ९३२ ॥ प्रबळ बुद्धीमध्यें तम, । त्या तमें प्रमाण ते आगम, । तीं त्या धर्मातें निषेधिती निगम, । आणि सदागम पुराणेंही. ॥ ९३३ ॥ म्हणूनी या सर्वांचे अर्थ विपरीत । वाखाणिती स्वमतसंमत, । कीं, श्रद्धा आगमींच त्यां अत्यंत, । बुद्धि तमसावृता त्यास हेतू. ॥ ९३४ ॥ हृदयीं धरोनी भाव ऐसे । "सर्वार्थान्विपरीतांश्च" म्हणतसे, । कीं, अर्थ विपरीत होती, जैसे । सर्व सच्छास्त्रें जाणे ये रीती. ॥ ९३५ ॥ आणि "सर्वार्थान्विपरीतांश्च" म्हणोनी । या चरणीं हें सुचवी, कीं, या चकारेंकरूनी, । च म्हणजे आणखीही ऐसें, म्हणूनी यावरूनी । ज्ञानकांडीं ऐसी बुद्धि ज्यांची ते आणिखी. ॥ ९३६ ॥ "सर्वं खल्विदं ब्रह्म" । जडब्रह्मैक्य बोले निगम, । प्रबल ज्या बुद्धींत तम, । तीस वाटे कीं हें घडेना. ॥ ९३७ ॥ आतां देव बोलतो तरी, । अर्थ योजिती यापरी, । कीं ब्रह्म सर्वांच्या अंतरीं । व्यापक म्हणूनी श्रुति सर्व ब्रह्म म्हणतसे. ॥९३८॥ हा अर्थ विपरीत । कीं आकाशही व्यापक निश्चित, । म्हणूनी "सर्वं खल्विदमाकाशं" ऐसें बोलणें उचित । जरी होय, तरी उचित श्रुत्यर्थ. ॥ ९३९ ॥ वेद म्हणजे ईश्वराचें । सर्वज्ञपणाचें बोलणें साचें, । व्याख्यान अनुचित तयाचें, । तें म्हणावें विपरीत. ॥ ९४० ॥ आतां वापीमध्यें जळची सारें । लोक म्हणती, या प्रकारें । इत्यादि दृष्टांताच्या आधारें । संपादिती उचितत्व. ॥ ९४१ ॥ परी ज्या युक्तींकरूनी । श्रुत्यर्थ साधे, त्या सोडूनी, । न साधे

त्या युक्ती धरूनी, । विपरीत करिती अर्थातें. ॥ ९४२ ॥ कीं, 'वापी जळ' ऐसें कवण । बोलेल ? आणि तें श्रवण । मानील कोण प्रमाण ? । जळची गार निश्चित, ऐसें श्रुति म्हणे. ॥ ९४३ ॥ "सर्वं खल्विदं ब्रह्म" । "पुरुष एवेदं सर्वं" म्हणे निगम, । खलुशब्दें एवशब्दें परम । निश्चय करिती शपथरूपें. ॥ ९४४ ॥ 'ब्रह्म सर्वं खलु' म्हणती निगम, । ते म्हणती सर्वीं व्यापक असे ब्रह्म, । द्वैतप्रमाणाच्या बळावांचूनी श्रम । विपरीतार्थीं ते करिती. ॥ ९४५ ॥ असो त्यांचें दूषण, । मतची त्यांचें बोले जगद्दूषण, । वेद बोलती सर्वपण, । हे सर्वीं व्यापकत्व विपरीत वाखाणिती. ॥ ९४६ ॥ "तत्त्वमसि" म्हणती श्रुती, । 'तो ईश्वरची तूं' ऐसें उपदेशिती, । 'तो तूं न होसी' म्हणती, । इत्यादि सर्व अर्थ विपरीत. ॥ ९४७ ॥ सर्व ब्रह्म म्हणती श्रुती, । गीतेंत 'वासुदेव सर्वं' म्हणे श्रीपती । भागवतीं उद्धवाप्रती । ऐसाच उपदेश. ॥ ९४८ ॥ वेदीं भारतीं ऐसींच प्रमाणें, । ऐसींच अद्वैत बोलती पुराणें, । तें न घडे म्हणोनी गाऱ्हाणें । भेदवादियांचें सर्वत्र. ॥ ९४९ ॥ स्वयुक्तीस युक्त न पडे, । तो अर्थची म्हणती न घडे, । वेद म्हणती हें ठायीं न पडे । गुरुमुखावांचूनी. ॥ ९५० ॥ गुरु उपदेश करी, । शिष्य गुरुभक्ति त्याउपरी, । जैसी ईश्वराची, तैसीच करी, तरी । गुरु बोलिला तें प्रकाशें, श्रुति म्हणे. ॥ ९५१ ॥

**यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥**

श्रुत्यर्थ मार्गे विशद । जाला बहुतां स्थळीं प्रतिपद, । प्रस्तुतीं गुरुभक्तीकरूनी म्हणती वेद । गुरुच बोलिला ते अर्थ प्रकाशती. ॥ ९५२ ॥ उपयोगीं हेंच प्रस्तुत, । कीं, गुरुभक्ति करितां जें कळे अद्वैत, । तें वेद बोलती, त्याचा अर्थ विपरीत । करिती कीं नये स्वानुभवा. ॥ ९५३ ॥ ज्यांची बुद्धी ऐसी, । तेही म्हणावी तामसी; । हें असो; आतां सात्त्विकधृति कैसी ? । तें आईक, या भावें बोलतो हा श्लोक. ॥ ९५४ ॥

**धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ।**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥**

पार्था ! ज्या धारणेंकरूनी । मनप्राणइंद्रियांच्या क्रिया ब्रह्मची म्हणोनी ।

---

१. अ० ७, श्लो० १९.

धरिजेलती, कीं नग न स्फुरती हेमावांचुनी, । तैशा क्रिया विना ब्रह्म. ॥ ९५५ ॥ ते नग सकळ जेंवी हेम, । तैसा क्रिया सर्वही ब्रह्म हा नेम, । परी ज्या धारणेनें धरिजेताती सप्रेम, । ब्रह्मत्वें ते धारणा पार्था ! सात्त्विकी. ॥ ९५६ ॥ प्रवृत्ति अथवा निवृत्ती । जे न विसरे गोष्टी भलती चित्तवृत्ती, । ते धारणा म्हणावी; त्यांत सुप्रवृत्ती । चित्तीं धारे, तेच सात्त्विकी धारणा. ॥ ९५७ ॥ तथापि ज्ञानहीनांची धारणा । ऐसी, कीं, तत्त्व कळलें नाहीं अंतःकरणा, । वृत्ति त्यांची धरी जरी सात्त्विक आचरणा, । तरी जडत्वेंची जडपणा ते धरी. ॥ ९५८ ॥ स्फुरती मनप्राणेंद्रियादिवृत्ती । या जडांची ज्या चिद्वस्तूकरूनी स्फूर्ती, । तोची या वृत्ति, ऐसें जाणणें मती । धारणा जडाचीच ते. ॥ ९५९ ॥ कारणदृष्टी कार्य दिसे, । तेंव्हांच जडपण दृष्टींत नसे, । जडत्व चित्स्वरूपीं वसे । कनकीं जैसा अलंकार. ॥ ९६० ॥ सुवर्णाचें आम्रफळ । कार्यदृष्टी पाहे बाळ; । दिसोनी न दिसे सोनें केवळ, । फळची दिसतें म्हणावें. ॥ ९६१ ॥ तेंव्हां जितका जडविषय आकार, । तो तमाचाच प्रकार; । इंद्रियें रजोगुणविकार, । त्यांची धारणा न म्हणवे सात्त्विकी. ॥ ९६२ ॥ म्हणूनी धारणा शुद्ध सत्त्वाची । तेची, जे सर्वात्मनिष्ठाची, । कीं त्या धारणेंत अवघी सत्ताच साची । स्फुरे सत्त्व चैतन्ययोगेंकरूनी. ॥ ९६३ ॥ तेच अव्यभिचारिणी, । जीकरितां योगेकरूनी मनआदिकांची करणी । स्वरूपची म्हणूनी अंतःकरणीं । धरिजेतसें. ॥ ९६४ ॥ त्यांत मनाची क्रिया कल्पना, । एकची मन होतें आकार नाना, । परंतु लेशही चित्स्फूर्तिविना । स्मरेना मनातें. ॥ ९६५ ॥ पृथ्वीवरी उभी सेना, । सेनाच पाहतां पृथ्वी दिसेना; । सेना जातां, पृथ्वीविना । कांहींच न दिसे दृष्टीतें. ॥ ९६६ ॥ कल्पूनी कल्पनाच पाहे, । स्मृति चित्स्वरूपाची न राहे; । परी कल्पना मोडतां, तेंची आहे । ज्यावरी होती ते कल्पना. ॥ ९६७ ॥ परी हा निपट एकदेशी दृष्टांत, । आतां तरंग जैसे सागरांत । उठती, राहती, क्षणांत, । तेंव्हां नसे कांहीं, जळच असे. ॥ ९६८ ॥ मन कल्पी डगर, । ते तरंग विना सागर । न दिसती, न असती तेंव्हां परात्पर । चित्सागरची तो अवघे. ॥ ९६९ ॥ कळलें ऐसें अंतःकरणा, । आणि नसतां या अनुभवाची धारणा, । मन अवलंबूनी विस्मरणा । यथापूर्व कल्पना करूं लागे. ॥ ९७० ॥ कल्पना सकळ विषयांची । ते सृष्टि अवघी तमाची, । वसती लिंगदेहीं राजसी इंद्रियांची, । त्या इंद्रियवृत्तीस दिसे कल्पना. ॥ ९७१ ॥ ते रजतमयुक्त

धारणा । सात्त्विकी म्हणवेल कवणा ? । ज्ञानीही कार्यांत स्फुरणा । न पाहे, तरी तेही नव्हे सात्त्विकी. ॥ ९७२ ॥ धारणा सात्त्विकी हे राहे, । तरी कल्पना आत्मस्वरूपची पाहे; । ते जडत्ववृत्तीतें[1] न साहे, । पाहे अवघा चिदात्मा. ॥ ९७३ ॥ सुवर्णदृष्टी नसे नग, । ब्रह्मदृष्टी नसे जग; । कारणदृष्टी कार्य पाहतां, मग । जडत्व कैंचें ? ॥ ९७४ ॥ एवंच सर्वही ब्रह्मांडरचना । तैसीच मनांत केली कल्पना, । परंतु चित्सुवर्णची ते अलंकार नाना । योगी पाहे, ते धारणा सात्त्विकी. ॥ ९७५ ॥ आंत बाहेर हेम नगीं, । तैसें आंत बाहेर ब्रह्म जगीं, । मनें कल्पूनी योगें योगी । सात्त्विकी धारणेनें पाहतो. ॥ ९७६ ॥ जडत्वास न उरे अवकाश, । जडज्वाळा चिदग्निप्रकाश, । सत्त्वयोगें योगी पाहे सावकाश, । सात्त्विकी धारणा ते त्याची. ॥ ९७७ ॥ अनुभव जों हा अंतःकरणीं, । तोंवरी धारणा अव्यभिचारिणी; । जडत्वें आकार पाहे ते व्यभिचारिणी, । योग नसतां. ॥ ९७८ ॥ याकारणें म्हणे चक्रपाणी, । कीं योगेंकरूनी जे अव्यभिचारिणी, । क्रिया मनाच्या अंतःकरणीं । धरिजेताति ऐशा तीकरितां. ॥ ९७९ ॥ ते सात्त्विकी धारणा प्रथम । अभ्यासेंकरूनीच जोडे, तेव्हां ब्रह्म । सर्वदा चराचरीं स्फुरे, जैसें हेम । नाना नगीं. ॥ ९८० ॥ कल्पूनी ध्यातां प्रपंचास, । कल्पित बाह्यांतर योगियास । आत्माच एक दिसे, जो जगन्निवास, । अव्यभिचारिणी तेव्हां वाणे धारणा. ॥ ९८१ ॥ जे ऐसी योगेंकरूनी अंतःकरणीं । प्रथम धारणा अव्यभिचारिणी, । ते जाणावी अभ्यासरूपिणी, । मग न सुटे सर्वदा. ॥ ९८२ ॥ मनें केली जगकल्पना, । हेमची नग, तैसा स्वयें ते रचना, । तैसीच हे ईश्वराची नाना । कल्पना जगदाकारेंकरूनी. ॥ ९८३ ॥ सबाह्य आपणची जगीं; । सोनें जैसें नाना नगीं, । कीं सागरची नाना तरंगीं, । तैसें देखे जगीं आपणातें. ॥ ९८४ ॥ हा वेध लागे अंतःकरणा, । ते अखंड सत्त्वाची धारणा; । चराचरीं पाहणें आपणा, । हेची धारणा सात्त्विकी. ॥ ९८५ ॥ धरिजेताती अव्यभिचारिणी करूनी । मनाच्या क्रियायोगेंकरूनि, म्हणोनी । देव बोले दोन्हीं दशा सुचवूनी । धारणेच्या. ॥ ९८६ ॥ प्रथम अभ्यासें मानसध्यान, । मग ठसावे जगदात्मक ज्ञान, । तेव्हां सकळ जडभान । ब्रह्मची वाटे. ॥ ९८७ ॥ आत्मा ब्रह्म निर्गुण, । परी चिच्छक्तीनें चित्स्फुरण, । त्या चित्स्फुरणें जडपण । स्फुरे, ते मनची चिच्छक्ती. ॥ ९८८ ॥ मन जिकडे धांवताहे, । तिकडे चित्स्वरूप जड

१. 'वृत्तीचें' असा पाठ आढळतो.

पाहे, । दृढाभ्यासें धारणा ऐसी राहे । योगेंकरूनी. ॥ ९८९ ॥ तेची अव्य- भिचारिणी; । म्हणिजे जरी धारणा राहे जडपणीं, । तरी ते होय व्यभिचा- रिणी । अव्यभिचारिणी हे धारणा. ॥ ९९० ॥ मन धांवे ते मनाची क्रिया, । जड आकार कल्पी हे त्याची विक्रिया, । योगें आणि अव्यभिचारिणी धारणे- करूनियां । क्रिया विक्रिया ब्रह्मची वाटती. ॥ ९९१ ॥ चित्स्वरूपावीण । न दिसे मनाचें मनपण, । त्याचवरी मनाचें धांवण, । दृष्टि जैसी धांवे आश्रयें सूर्यप्रकाशाच्या. ॥ ९९२ ॥ सूर्यप्रकाशेंची पाहे जळाभास, । जग जग- न्निवास तैसें स्फुरे मनास; । स्वकल्पनेनें ईश्वर कल्पितो जगास, । मन ऐसें पाहे, हे क्रिया मनाची जे धरी, ॥ ९९३ ॥ ते सात्त्विकी धारणा जाण; । आतां क्रियाशक्ति दशविध प्राण । चिदधिष्ठानावीण उठाण । वायूस कैंचें ? ॥ ९९४ ॥ वायूचा स्पर्शगुण, । तो स्पर्श न कळे चित्प्रकाशावीण, । तैसें वायूचें वायूपण । कैंचें तयावांचुनी ? ॥ ९९५ ॥ त्वगिंद्रियातें वायु स्पर्शतो, । तो स्पर्श ज्या चित्स्वरूपें स्फुरतो, । तें त्या वायूतें न प्रकाशी, तरी तो । लागे कैसा त्वगिंद्रियातें ? ॥ ९९६ ॥ प्रकाश दीपाचा नयनीं, । दूरी अंधकार वनीं, । वन तें प्रकाशावांचुनी । स्वप्रकाश नयनांसही दिसेना. ॥ ९९७ ॥ सूर्यप्रकाश दिवसा । नेत्रीं आहे जैसा, । वनापर्वताव- रीही तैसा, । तरी वनपर्वत दिसती नेत्रातें. ॥ ९९८ ॥ नेत्रीं रूपींही ज्योति असे, । तरी नेत्रांस तें रूप दिसे; । तैसा सर्व इंद्रियांत जो चित्प्रकाश गवसे । तोची वसे सर्वा विषयांत. ॥ ९९९ ॥ एवंच प्राण अवघे अरूप, । परी त्यांच्या प्रत्ययाचें जें जें रूप, । तें तें प्रत्यया नये विना चित्स्वरूप, । हा अनुभव जाणती जे अपरोक्षानुभवी. ॥ १००० ॥ प्राणाचें ऊर्ध्व गमन; । अधोगमन तो अपान; । अंगें पसरणें, गोळा करणें, तो व्यान; । सम करी समान, जें खादलें प्यालें, तयातें. ॥ १००१ ॥ ऊर्ध्वमुखें कंठाकडे फुगारा, । जो धरी पोटांत वारा, । त्या प्राणाचिया प्रकारा । उदान नामें जाणावें. ॥ १००२ ॥ नागनामक प्राण म्हणती, । उद्गार ज्याकरितां येती; । नेत्रांचीं पातीं, झांकती उघडती, । तो कूर्म; ॥ १००३ ॥ शिंका ज्याकरितां येती, । कृकल म्हणोनी त्यास म्हणती; । ज्याकरितां जांभया देती, । तो म्हणावा देवदत्त; ॥ १००४ ॥ न सोडी मेलियाही शरीरा, । धनंजयनामक सर्वगत तो वारा, । या प्राणाच्या दश क्रिया ज्ञानिया चतुरा । आत्माच दिसती. ॥ १००५ ॥ तैशाच श्रोत्रादि इंद्रियांच्या क्रिया । शब्दादि विषयग्राहका अव- घिया, । याही ब्रह्मची म्हणूनी धनंजया ! । धरिजेताती सात्त्विकी धारणेंकरूनी.

॥ १००६ ॥ योगेंकरूनी ते धारणा । अव्यभिचारिणी वाटे अंतःकरणा, । कार्यांत पाहतां उपादान कारणा, । व्यभिचार कार्यजडपणाचा मग नसे. ॥ १००७ ॥ जळत्वें पाहतां गार । जळची, कठिणत्वरूप मिथ्या विकार, । ऐसा शब्दादि जडव्यवहार । चित्स्वरूपची अवघा. ॥ १००८ ॥ धारणेंत दुसरा प्रकार । न दिसे, तेव्हां कैंचा व्यभिचार ? । जाणावा हा विचार । अव्यभिचारिणी धारणेचा. ॥ १००९ ॥ ध्वनि मेघाचा गगनीं, । तो स्फुरे त्याच चिद्वस्तूकरूनी, । सचेतन चित्त होऊनी कानीं । ज्या चिद्वस्तूनें आयके. ॥ १०१० ॥ एवच जें कानीं, मनीं, । तेंच चैतन्य गगनीं, । तेंची असे अधिष्ठूनी ध्वनी, । अधिष्ठूनी लहरी सिंधु जैसा. ॥ १०११ ॥ ध्वनि गोड कीं कठोर, । लहान अथवा थोर, । तार, मद्र, कीं घोर, । ध्वनीमध्यें प्रवेशुनी बुद्धि हें जाणे. ॥ १०१२ ॥ आत्मवस्तुविरहित । हें कांहींच न कळे निश्चित, । आत्माच त्या ध्वनीबाहेरआंत, । उदक गारेत ये रीती. ॥ १०१३ ॥ गारेचें कठिणपण । जळची आहे, जें अत्यंत मृदु आपण; । तैसें शब्दाचें जडत्व स्फुरण । स्वयें चिदात्मा. ॥ १०१४ ॥ त्यास नाहीं अंत, । तो स्वयें अनंत, । परतु मन धांवे जेथपर्यंत, । प्रत्यया ये तेथवरी. ॥ १०१५ ॥ सूर्यप्रकाश सर्व लोकीं, । परी दृष्टि जेथवरी अवलोकी, । अनुभवा ये तेथपर्यंतच कीं, । सर्वत्र असोनी तेज सूर्याचें. ॥ १०१६ ॥ तैसा ध्वनि उमटे जेथें, । मन धांवे चित्प्रकाशाचवरी तेथें, । तो ज्या आत्मयाकरितां सचेतन देहीं येथें, । तोची गगनीं मेघध्वनींतही. ॥ १०१७ ॥ पर्वताग्रीं तरु दूरी, । तेथवरी सूर्यप्रकाशाचवरी । दृष्टि धांवे, आणि त्याची तेजें बरी । पाहे, तों तेंच तेज येथेंही दृष्टींत. ॥ १०१८ ॥ ऐसीच जवळी आणि दूरी । दृष्टि धांवे भानुप्रकाशाचवरी, । परी दृष्टींत तेजांत बाह्यांतरीं । प्रकाशूनियां अवघियां असे आत्मा स्वप्रकाश. ॥ १०१९ ॥ रूप दूरील, त्यावरी । दृष्टि बसे, पाहे बरी, । आणि सूर्यप्रकाशे प्रकाशली खरी, । परी इतकींही प्रकाशलीं एकाच आत्मयाकरितां. ॥ १०२० ॥ आणि आधीं नगीं स्फुरे हेमरूप, । तैसें रूपमात्रीं आधीं स्फुरे अरूप, । जें नेत्रांस चित्स्वरूप । असे देहीं प्रकाशुनी. ॥ १०२१ ॥ तरग धांवे जळावरी, । तैसी दृष्टि चित्स्वरूपावरी; । हा दृष्टांत घावा, परी । जल तरंगाच्या ऊर्ध्वभागीं दिसेना. ॥ १०२२ ॥ समुद्रमध्यभागीं लहरी, । तिच्या नवही दिशा भरी । जळचि, आणि तेंही जळची परी, । वरी दशम दिशा जळरहित. ॥ १०२३ ॥ दृष्टि स्वरूपा एकपणें, । आणि स्वरू-

पाचवरी धांवणें, । हें साधलें, परी पडलें इतकें उणें, । कीं, दृष्टीस ऊर्ध्वभागींही तें स्वप्रकाश. ॥ १०२४ ॥ म्हणोनी दशदिशा सूर्याचा प्रकाश, । तोच दृष्टींत आधि त्या प्रकाशीं सावकाश । दृष्टि धांवे; तरी उणेपणास अवकाश । हाच, कीं, दृष्टी तेज नव्हे. ॥ १०२५ ॥ तरी आतां काय करावें ? । सर्वसाम्यास काय आणावें ? । ब्रह्म ऐसेंची; दुजें प्रत्यक्ष असावें, । तरी तें पावावें सर्वसाम्य. ॥ १०२६ ॥ एवंच एकदेशी दृष्टांत, । त्यांत अधिक साम्य सांपडे जेथपर्यंत, । तें घ्यावें; कीं, तोची दृष्टांत उत्तम अत्यंत, । ज्यांत अधिक साम्य सांपडे. ॥ १०२७ ॥ जरी नसते प्रमाण वेद, । आणि अनुभवा न येता अभेद, । तरी दूरी न होता हा खेद, । वेदें अनुभवें सांभाळिलें. ॥ १०२८ ॥ नव्हे वाळूक दोडका, । कीं, फोडोनी दाखवावा अनधिकारिया लोका; । अनुभवी जाणती, कीं, उत्तमश्लोका । ठावें देवास, ज्याणें दिधला स्वानुभव. ॥१०२९॥ ऐसेंच त्वगिंद्रिय । ज्या वस्तूनें जाणे स्पर्शप्रत्यय, । त्या वस्तुप्रकाशेंच स्पर्शविषय । प्रकाशला, जेंवी पट तंतूनें. ॥ १०३० ॥ उदकांत शैत्य गुण, । अग्नींत उष्णपण, । कठिणत्व, मृदत्व सर्वही आपण । द्रष्टाच असे. ॥ १०३१ ॥ तैसीच रसना, । रस कडू गोड ज्याविना । सर्वथा चाखों शकेना, । तोची आत्मा त्या रसीं. ॥ १०३२ ॥ प्रतिमा साकरेची अवघी साकर, । साकरेचीच रसना सुंदर, । फेणी साकरेचीच सूक्ष्मतर । रसनेवरी प्रतिमेच्या. ॥ १०३३ ॥ आकार तिन्ही असत्य, । साकर तिहींत सत्य, । या अनुभवापुढें पांडित्य । राहिलें समूळ तर्काचें. ॥ १०३४ ॥ तथापि प्रकाश नेत्रीं असे, । त्याच प्रकाशें रूप दिसे, । तैसा इंद्रियां विषयांत जरी चिदात्मा वसे, । तरीच ये प्रत्यय दोहींचा, हा तर्क. ॥ १०३५ ॥ याच प्रत्ययें घ्राणेंद्रिय । जाणे सुगंध दुर्गंध विषय, । नये विना चिद्वस्तुप्रत्यय । दोहींचा. ॥ १०३६ ॥ मातीच्या रांजणीं उदंड । घातले आणूनी मृत्पिंड, । प्रत्यय दोहींचा नये अखंड । मृत्तिकेविना. ॥ १०३७ ॥ प्रतिमा चंदनकाष्ठनिर्माण, । तें चंदन, आणि चंदनची तिचें घ्राण, । चंदन लाविलें अंगास त्याचें अवघ्राण । होतेंच लिंगदेह जरी असता. ॥ १०३८ ॥ ब्रह्म व्यापक असे, । परी भोग व्यापकास न दिसे, । व्याप्यास गवसे कार्य कीं जें कोठेंही नसे । सर्वसाम्य दृष्टांतीं. ॥ १०३९ ॥ ऐसीं पांचही ज्ञानेंद्रियें, । ऐसीं पांच कर्मेंद्रियें, । स्फुरती आत्मप्रत्ययें । इंद्रियें आणि कर्मेंही. ॥ १०४० ॥ ज्या प्रकाशें वाचा हाले, । ते जे कांहीं शब्द बोले, । त्या बोलांत बुद्धि डोले । कोणा आणिका प्रकाशें ?

॥ १०४१ ॥ बुद्बुद जळींच उठती, । क्षणांत त्याच उदकीं फुटती, । परी जळावांचूनी ते न दिसती, । आदि अंत सबाह्य जळ सारें. ॥ १०४२ ॥ शब्द उठतो ज्या प्रकाशेंकरूनी, । त्या प्रकाशेंच कळे शब्द म्हणोनी, । आणि शब्द राहतां, स्फुरे प्रकाश तोची मनीं, । बुद्बुद फुटतां, नयनीं जळ जैसें. ॥ १०४३ ॥ एवं आत्माच शब्द, । तोची आत्मा गोविंद, । तोच, नाम त्याचें मुकुंद, । जो मुक्ति दे अनुभविता ये रीती. ॥ १०४४ ॥ वाचा म्हणे 'राम, राम,' । तों रामरूपची तें नाम, । कीं न स्फुरे विना आत्माराम, । हें आत्मारामानुभवी जाणती. ॥ १०४५ ॥ ज्या प्रकाशें वाणी । म्हणते 'चक्रपाणी,' । त्या शब्दबुद्बुदीं पाणी । आत्माच अवघा. ॥ १०४६ ॥ गोशब्दें वाचा । म्हणे 'गोपाळ', तो पाळक तिचा, । जो तिला प्रकाशी चिदात्मा साचा, । त्या शब्दफेनांत दुग्ध तोची गोपाळ. ॥ १०४७ ॥ वाणी म्हणे 'वासुदेव,' । तो सर्व भूतीं, जो वसे देव, । तोची दिसे देवाधिदेव । वाचेंत. आणि नामांतही. ॥ १०४८ ॥ वाणी म्हणे 'नारायण', । अवघाची तो नारायण वाणी इंद्रियादिगण, । त्या नारा जीवतत्त्वांचें अयन आपण, । आणि तोची नामीं स्वयें नामवक्ता. ॥ १०४९ ॥ रज्जु सर्पाचा अयन, । तैसा नारांचा अयन नारायण; । नर जीव, त्याच्या जड तत्त्वांचा गण । तीं नारें, चिदात्मा आश्रय तयांचा. ॥ १०५० ॥ 'नारायण, नारायण, नारायण,' । म्हणतां अवघा नारायण, । कीं, वाणी आणि नामपरायण । बुद्बुद एका चित्सिंधूचे. ॥ १०५१ ॥ म्हणतां 'अच्युत, अच्युत,' । तो चिदात्मा नव्हे कोणे काळीं च्युत, । तोची वाणी आणि नाम, हें अद्भुत । नामस्मरण भक्तांचें. ॥ १०५२ ॥ म्हणतां, 'अनंत, अनंत,' । स्फुरे दाऊनी ब्रह्मांडकोटीचा अंत, । मन पसरे पुढें जेथपर्यंत । अनंत आत्मा त्यापुढें. ॥ १०५३ ॥ मुखीं नाम, मन जगीं, । तो अनंतसिंधु ब्रह्मांडकोटीच्या तरंगीं, । नामबिंदूच्या अंतरंगीं । तो असे, नवल काय? ॥ १०५४ ॥ ज्याचा ब्रह्मांडकोटींत नसे अंत, । तो वाचेंत नामांतही अनंत, । अनुभव हा कोठपर्यंत । अनंत नामाचा बोलावा? ॥ १०५५ ॥ इतरही शब्द आणि कान । हे विवर्त, आत्मा अधिष्ठान, । ज्यास अपरोक्ष साक्षात्कारज्ञान, । त्यास धारणा ऐसी इंद्रियांची. ॥ १०५६ ॥ आतां आत्माच जैसा शब्द आणि वाणी, । तैसें ग्रहणकर्म आणि पाणी । दोनी तरंग, चैतन्य पाणी, । ठाव कैंचा त्यावीण दोहींस? ॥ १०५७ ॥ तरंग कैंचे विना पाणी?

---

१. ठिकाण, अधिष्ठान. २. भास.

आत्मयावांचूनी कैचे पाणी ? । जरी न प्रकाशी आत्मा अपाद-पाणी, । तरी ग्रहणवार्ता मग कैंची ? ॥ १०५८ ॥ काष्ठप्रतिमेचे चरण, । त्यांस काष्ठावांचूनी कैंचें स्फुरण ? । काष्ठास दृष्टि स्पर्शी, तेव्हां विवरण । कळे अहो ! त्याच्या पदांचें. ॥ १०५९ ॥ शवाचे चरण दोनी । न स्फुरती ज्यावांचूनी; । चळती चरण त्याच सत्तेंकरूनी, । असतां ही क्रियाशक्ति लिंगदेह ॥ १०६० ॥ कर्म त्याचें गमन । ज्या प्रकाशें जाणे मन, । त्या तरंगास तेंच जीवन, । विना चित्सिंधु जडतरंग स्फुरे कैसा ? ॥ १०६१ ॥ भिंतीवरील चित्र, । बैसवुनी पायांवरी पुत्र, । माता टाकवी मळमूत्र । अवघी मृत्तिका. ॥ १०६२ ॥ त्यांत मूर्ति पुरुषाची एक, । त्याणें दुर्गंधें झांकिलें नाक, । मळमूत्रादि चित्रकौतुक अनेक, । अवघी मृत्तिका. ॥ १०६३ ॥ दशम इद्रियांत काम, । तो काम न स्फुरे विना आत्माराम; । कामसर्पाचें जें धाम, । तो आनंदरज्जु बोधात्मा. ॥ १०६४ ॥ जे स्वयें आत्माराम, । त्यांस प्रारब्धक्षयाचें न सुटे काम, । तथापि आत्माच त्यांचा काम, । तृतीयाध्यायटीकेंत मार्गे विशद हें. ॥ १०६५ ॥ ऐशा इद्रियांच्या क्रिया । आत्मस्वरूपची अवघिया, । योगें स्फुरती योगिया । ते अव्यभिचारिणी धारणा सात्त्विकी. ॥ १०६६ ॥ मनाच्या क्रियांची धारणा । बोलतां, त्यांत लेखिलें अंतःकरणा, । **मन**शब्दें सुचविलें विवरणा । चित्तबुद्धि इत्यादिकांच्या. ॥ १०६७ ॥ सर्वत्र चित्प्रत्यय, । जड नग चित्सुवर्णमय, । नुमताच ऐसा नव्हे दृढ निश्चय, । स्मृतीही ऐसी सर्वदा. ॥ १०६८ ॥ त्या स्मृतींत या । मनःप्राणेंद्रियक्रिया । स्फुरतां वाटती चिन्मया । हे धारणा सात्त्विकी. ॥ १०६९ ॥ ऐसी धारणा अंतःकरणीं, । न वाटतां जडत्व अव्यभिचारिणी, । परी हे योगाची सर्व करणी, । **योग** चित्तचैतन्यसयोग. ॥ १०७० ॥ सात्त्विकी धारणा ये रीती । बोलोनी, आतां श्रीपती । राजसी धारणा पार्थाप्रती । सांगतसे या श्लोकीं. ॥ १०७१ ॥

**यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन ।**
**प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥**

पार्था ! ज्या धृतीकरूनी । धर्म अर्थ काम हे तिनी । पुरुषार्थ धरिजेताती मनीं, । ते जाण राजसी धारणा. ॥ १०७२ ॥ धर्म करावयानिमित्त । मेळवावें विपुळ वित्त, । आणि उभयलोकीं भोगावे काम, ऐसें चित्त । धरिजे धारणा,

---

१. अ० ३, श्लो० १७-१८.

ते राजसी. ॥ १०७३ ॥ या धारणेनें अंतरंग । काटलें, कापितां विषयसंग, । त्या प्रकर्षसंगें प्रसंग । सर्वदा मनीं फळाचा. ॥ १०७४ ॥ धारणा सात्त्विकी ज्ञानकांडीं, । हे धारणा राजसी कर्मकांडीं; । आतां दुर्गुणातें जे न सांडी, । ते ऐसी म्हणतसे धारणा या श्लोकीं. ॥ १०७५ ॥

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।
न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥

ज्या धारणेंकरूनी । निद्राच आठवे मनीं, । जेव्हां तेव्हां नयनीं । दाटली झोंप. ॥ १०७६ ॥ बहुतेक निद्रा ज्यासी, । जागृतींत जांभया देतां तोंड वासी, । सोडील अगत्य देहासी, । परी न सोडील निद्रेतें. ॥ १०७७ ॥ जेव्हां असे जागृत, । तेव्हां दीर्घसूत्रीपणें भय अत्यंत । मन धांवे जेथपर्यंत । भय तेथवरी त्या देशाचें, आणि काळाचें. ॥ १०७८ ॥ होईल प्रारब्धें जें होणार, । करील तेंच ईश्वर जें असेल करणार, । या निश्चयें समाधानाचा प्रकार, । तो नसतां भयची अवघें. ॥ १०७९ ॥ विवेकी भलता एक निश्चय । धरूनी, सोडिती भय; । जो नर तामसी धारणेचा असे आश्रय, । तो न सोडीच भयातें. ॥ १०८० ॥ भय भविष्याचें न सोडी; । मागें मेलीं, गेलीं, त्यांचा एक घडी । न सोडी शोक; चरफडी । हारपतां तुटकीही पादरक्षा. ॥ १०८१ ॥ सर्वांस हानि, मृत्यु शोक; । परी जे भले विवेकी लोक । ते, 'होणार न चुके' म्हणूनी सविवेक । शोक सोडिती. ॥ १०८२ ॥ हा **दुर्मेधा** म्हणिजे दुष्ट-बुद्धी, । करी शोकाचीच वृद्धी, । कीं, तमोगुणें समृद्धी । धारणा तामसी हे अत्यंत. ॥ १०८३ ॥ जे भयशोकाची पेटी, । विषादास काय वाणी तिच्या पोटीं ? । निद्रा, भय, शोक, यांसी गांठी । सर्वदा विषादाची. ॥ १०८४ ॥ **विषाद** म्हणिजे अकर्मण्यता, । म्हणिजे रुचेना कांहीं कर्तव्यता; । निद्रा, भय, शोक, तेथें वार्ता । सहज न रुचे कांहीं करायाची. ॥ १०८५ ॥ आणि सर्वदा अहंकाराचा ताठा, । त्याणें देही मदाचा फांटा, । जाणों खैराचा खुंटा । न लवे कदापी. ॥ १०८६ ॥ न सोडी सर्वदा मद, । म्हणूनी म्हणे **गोविंद**, । येथें सुचवी ऐसें विशद, । कीं, हा केवळ लौकिकच दुर्बुद्धी. ॥ १०८७ ॥ सात्त्विकी धारणा योगिराया, । तो ब्रह्मभावें धरी मनःप्राणेंद्रियक्रिया; । आणि राजसी धारणा जया । तो धरी धर्मअर्थकामांतें. ॥ १०८८ ॥ त्याची धारणा धरायाची, । याची तामसी न सोडायाची, । कीं धारणा ज्ञानाची आणि

---

१. 'तामसी मता' असा पाठभेद. २. विस्तार, वाढ.

धर्मअर्थकामांची, शास्त्रश्रवणेंची घडतसे. ॥ १०८९ ॥ जें आयकोन कळलें अंतःकरणा, । त्याची स्मृति धरिते धारणा; । निद्रा, भय, शोक, कवणा । कोण शिकवी ? ॥ १०९० ॥ उपजत निजे बाळ, । उपजत भयें व्याकुळ, । उपजत शोकें विव्हळ,[1] । माता न दिसतां रडों लागे. ॥ १०९१ ॥ उगेंचही रडे क्षण, । उगेंची हांसे हर्षपूर्ण, । थोर होतां तेंच लक्षण । मदाचें. ॥१०९२॥ सुख कांहीं वाटे, । तेव्हांच मद पोटीं दाटे; । आणि तो मद आपणची आटे, । दुःख कांहीं उपजतां.॥१०९३॥न सांडी हे अवगुण ।जो दुर्बुद्धि अवलक्षण, । यालागीं धारणा विलक्षण । त्या दों धारणांस ही धारणा. ॥ १०९४ ॥ ते त्या धारणेतें धरिती, । हा या अवगुणांतें न सोडी दुर्मती, । कीं, या सहज लौकिकी रीती । न शिकताही लागल्या. ॥ १०९५ ॥ ऐसे धृतीचे भेद तिनी । बोलिले तीन श्लोकेंकरूनी, । तितकेच मागें बुद्धीचे भेद, ऐसे मिळोनी । सा श्लोक या श्लोकपर्यंत. ॥ १०९६ ॥ प्रतिश्लोकें देवें । 'पार्था!' म्हणोनी, या नांवें । अर्जुनास साही भेद गूढभावें । बोलिले पार्थनांवेंकरूनी. ॥ १०९७ ॥ कीं अविद्यायोगे बुद्धिवृत्ती । सहज तामसी, तैसीच धृती, । परतु कर्मनिष्ठाच्या संगे काम्यप्रवृत्ती, । निवृत्ति धरी सत्संगें.॥१०९८॥ या भावे म्हणे, पार्था! सात्त्विकी ये रीती । बुद्धि आणि धृती, । पार्था· राजसी ऐसी मती, । आणि धृति राजसी ऐसी अगा! पार्था! ॥ १०९९ ॥ पार्था! बुद्धि तामसी । आणि धृतीही तामसी ऐसी, । हे मायावृत्ति परी होते तैसी, । जैसी संगति जोडे; भाव हा, ॥ ११०० ॥ कीं पृथा कुंती, तिचा तूं सुत, । सहज आधीं अविद्यावृत, । निद्राभयशोकविषादमदसहित । होतासी तूं. ॥ ११०१ ॥ तोची तू पृथेचा सुत । द्रोणासंगें धनुर्धर अद्भुत । जालासी, आणि धर्मराजसगें बहुत । जालासी तू धर्मात्मा. ॥ ११०२ ॥ तोची तूं पार्थ अगा ! । धरितांची माझिया सत्संगा, । पाहों लागलासी मज एका श्रीरगा । सर्व भूतीं. ॥ ११०३ ॥ पूर्वीही माझी संगती । पार्था! जरी तुज होती, । तरी सारथ्यकर्माप्रती । प्रार्थिलें नाहीं. ॥ ११०४ ॥ आतां तूं रथी, । मी जालों सारथी, । तों बुद्धिस्थानीं देहरथीं । मीच असें. ॥११०५॥ कीं देह रथ, बुद्धि सारथी, । श्रुति बोलती जीवात्मा रथी, । त्यांत बुद्धिस्थानीं मी रथीं । सारथ्यकर्मी बैसलों. ॥ ११०६ ॥ कीं कांजी मानूनी अमृत प्याला। तो न्याय अर्जुना ! आला, । या रथीं सारथि करितां मला । देहरथी सार-

---

१. विरोधक, उफ़टी.

धीहि मी जालों. ॥ ११०७ ॥ त्या माझ्या सारथ्याचा प्रताप, । कीं; तुझ्या बुद्धीस उपजला अनुताप, । त्यावरूनी हा अध्यात्मवार्तासंलाप । पावलासी तूं मजकरितां. ॥ ११०८ ॥ तोची तूं पूर्वील पार्थ, । तोची ऐसा आयकोनी हा परमार्थ, । पावलासी परम पुरुषार्थ, । वेडे सनकादि शुकादि ज्याकारणें. ॥ ११०९ ॥ यालागीं या श्लोकीं धृती । तामसी बोलिलों तुजप्रती, । कीं सहज भलता अज्ञ दुर्मती । न सोडी या खोडीतें. ॥ १११० ॥ याहूनी राजसी बरी । धर्मार्थकामें कांहीं सुखकरी, । तेही कर्मठांच्या संगतीनें; परी । उत्तम सात्त्विकी सत्संगें. ॥ ११११ ॥ जैसा तूं पार्थ, । आयकोनी हा परमार्थ, । पावलासी सत्संगें परम पुरुषार्थ, । एवंच बरें तितकें सत्संगें. ॥ १११२ ॥ सहजची वाईट गुण असे, । उत्तम गुण सत्संगें गवसे, । पार्थशब्दें भाव ऐसे । प्रतिश्लोकीं या षट् श्लोकांत. ॥ १११३ ॥ प्रतिश्लोकीं नांव 'पार्थ' । अर्जुनाचें उच्चारी समर्थ, । साही पार्थ शब्दांचा ऐसा भावार्थ, । अर्थ तो पुत्र कुंतीचा. ॥ १११४ ॥ आतां यानंतर । सुख त्रिविध सांगेल सर्वेश्वर, । आणि हाची सुखही त्रिविध सांगावयाचा अवसर । बोलेल ऐसेंही. ॥१११५॥ कीं बुद्धिभेद, धृतिभेद, । जे मी बोलिलों त्रिविध विशद, । त्यांत जो ज्या भेदाचा आस्पद, । तो त्याच बुद्धिधृतिभेदें सुखी दिसे. ॥ १११६ ॥ ज्यांत जो बुद्धिधृतिभेद वसे, । तो त्याचकारिता सुखी दिसे, । परतु आदिअंत एकाचा नसे । एकासारिखा. ॥ १११७ ॥ याकारणें येथूनी । सत्त्वादि क्रमें करूनी । त्रिविध सुख आईक, म्हणोनी । म्हणतो त्यांत या दों श्लोकीं सात्त्विक. ॥ १११८ ॥

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥ ३६ ॥
यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥

सुख आतां याउपरी । आईक, कीं, येथवरी । जे बोलिलों वैखरी, । ते त्रिविधसुखाचीं साधनें. ॥ १११९ ॥ त्यांत श्रेष्ठ सुख सात्त्विक, । तें भरतर्षभा! आइक, । भरतकुळीं श्रेष्ठ तू एक, । कीं, लाधलासी श्रेष्ठसुखकामधेनु गीता हे. ॥ ११२० ॥ 'तें सुख सांगेन' म्हणोनी, । पूर्वार्धीं प्रतिज्ञा करूनी, । त्या सुखाची खूण येथूनी । उत्तरार्धी बोलतो. ॥ ११२१ ॥

उत्तरार्ध—**अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥**

**यत्र**शब्दीं सुख येथें, । **तत्र** म्हणिजे तेथें, । जेथें **यत्र**शब्द, तेथें । **तत्र**शब्द पोटीं तया **यत्र**शब्दाच्या. ॥ ११२२ ॥ "**अभ्यासाद्रमते यत्र । दुःखांतं च निगच्छति तत्र**" । ऐसें या दों चरणीं कमळनेत्र । बोलतो, दोपरी अभ्यास बोलतो. ॥ ११२३ ॥ अभ्यासें समाधिसिद्धी, । समाधि तोची कीं स्वरूपीं स्थिरबुद्धी, । तेव्हां ज्या सुखाची समृद्धी, । तें सुख सात्त्विक. ॥ ११२४ ॥ यापुढील जो श्लोक, । तेथें म्हणेल, कीं, तें सुख सात्त्विक; । येथें ज्या स्वरूपीं उत्तमश्लोक । द्विविध अभ्यास या दों चरणीं बोलतो. ॥ ११२५ ॥ त्यांत एक स्पष्ट सुख दिसे, । दुसरा, जे त्याचे अनुभवी, त्यांस गवसे, । सुखीं सुख होऊनी समरसे । ज्या अभ्यासीं दुःखही. ॥ ११२६ ॥ आतां शास्त्रज्ञ येथें म्हणती. । कीं, व्याल्या द्विविध अभ्यासाची कोणे रीती? । तरी "**दुःखांतं च निगच्छति**" । येथें **च**कारें अभ्यास दुसरा बोलिला. ॥ ११२७ ॥ "**अभ्यासाद्रमते यत्र । दुःखांतं च तत्र । निगच्छति**" म्हणे कमलनेत्र, । आतां या अन्वयाचा अर्थ ऐसा. ॥११२८॥ अभ्यासें रमतो जेथें, । दुःखाचा अंत पावतो तेथें, । **च**कार आणि दुःखाचा अंत बोलतां, येथें । दुसरा सविकल्प योगाभ्यास बोलिला. ॥ ११२९ ॥ **दुःख**शब्दें क्षरभागरचना, । रज्जूंत सर्प, कीं जळीं तरंग नाना, । त्याच्या अंतातेंही पावतो अर्जुना ! । जेथें, तें सुख सात्त्विक. ॥ ११३० ॥ जेथें अभ्यासें रमतो, । म्हणजे चित्त ज्या चित्स्वरूपीं योजितो, । त्या अधिष्ठानींच पावतो । अंत दुःखा विवर्ताचा. ॥ ११३१ ॥ कीं व्यतिरेकें क्षरभाग सकळ । निषेधितां, कळला चिदात्मा निष्कळ । चित्त लक्षी त्यातें केवळ । तो अभ्यास निर्विकल्पयोगाचा. ॥ ११३२ ॥ ऐसा अभ्यासें जेथें रमतो, । तेथेंची अंत दुःखाचा पावतो, । क्षरभागाची समाप्ति देखतो । त्या चित्स्वरूपीं. ॥ ११३३॥ म्हणिजे जे जळ । रसना चाखे, तें केवळ, । त्या जळींच सकळ । तरंगही अंत पावती. ॥ ११३४ ॥ कीं तरंग सकळ । आदि मध्यांत नुसतें जळ; । ऐसें जड चित्स्वरूप केवळ । अभ्यासें पाहणें, तोची अंत जडा तरंगाचा. ॥ ११३५ ॥ परंतु दोन्ही प्रकारांस । केला पाहिजे अभ्यास, । कीं, जळ ठावके बाळकास । परंतु भितो देखतां तरंगांतें. ॥ ११३६ ॥ जें निखळ चित्स्वरूप, । तेंची दिसे नाना रूप, । त्या रूपीं जों न देखे अरूप । तों नव्हे अंत दुःखाचा. ॥ ११३७ ॥ म्हणूनी जो आत्मा जगन्निवास, । त्या चित्स्वरूपीं जड जगास । पाहतां पाहतां, होतो निरास । जडत्वाचा. ॥११३८॥

तंतूमध्येंच लक्षितां पट, । पट दिसोनी वाटे नसे निपट, । मातींत पाहतां घट, । अंत वाटे घटाचा. ॥ ११३९ ॥ घट दिसे घटत्वेंची जोंपर्यंत, । तोंवरी नव्हे घटत्वाचा अंत, । मातींत घट पाहतां, मग दिगंत । धुंडितां, नसे दिसोनी घटरूपें. ॥ ११४० ॥ जळदृष्टी जळीं तरंग, । पाहतां, तरंगाचा नव्हतांही भंग, । नाहींच तें तरंगाकार अंग, । बाह्यांतरंग जळ अवघें. ॥ ११४१ ॥ एवं ज्या जळीं रसना रमे, । त्या जळीं तरंग जळरूप गमे, । तेव्हां तरंगाचें तरंगत्व शमे । अतिशयें. ॥ ११४२ ॥ तैसा ज्या स्वरूपीं रमे, । अभ्यासेंची त्या स्वरूपीं दुःख शमे, । कीं, दुःख जडभाग तितका गमे । चिंत्स्वरूप त्या अभ्यासीं. ॥ ११४३ ॥ परंतु तंतु कळला देखतां दसोडी, । आणि तंतुरूपें न दिसे देखतां पासोडी, । तैसा जडावेगळा कळला तोची जडीं । आत्मा न दिसतां, न सोडी भय त्यातें. ॥ ११४४ ॥ क्षीरसागरीं रसना । रमे, तों गोडीवेगळें कांहीं असेना, । आणि देखतां तरंग नाना । भय वाटे. ॥ ११४५ ॥ तैसा निष्कळ स्वरूपीं रमे, । आणि जग देखतां भय गमे, । तें स्वरूपीं स्वरूपमय देखतां शमे, । तरंगभय जैसें कळतां समुद्रैक्य. ॥ ११४६ ॥ यालागीं योगियांस । दोन्ही असावे अभ्यास, । जें जग आपण आत्मा जगन्निवास, । भय कैंचे कोणाचे तयातें? ॥ ११४७ ॥ व्यतिरेकें अन्वयज्ञान, । निर्विकल्प सविकल्प ध्यान, । दोन्ही अभ्यास बिंबतां समाधान, । अथवा एक तरी. ॥ ११४८ ॥ कीं व्यतिरेकें जडचैतन्यशोध । करितां, जडावेगळा स्वरूपाचा बोध; । अन्वयें जडा चैतन्याचा नासे विरोध, । अद्वैत बिंबे. ॥ ११४९ ॥ ज्ञान दोहींपरी असे, । मग अभ्यासें चित्त उभयत्र न बसे, । आणि एकाच अभ्यासीं समाधि गवसे, । तरी समाधान. ॥ ११५० ॥ दोनी करितां अभ्यास, । एक साध्य, एक असाध्य, जयास । त्या एकाच साध्यें तयास । समाधान, ऐसें वासिष्ठीं योगशास्त्रींही. ॥ ११५१ ॥ निर्विकल्प योग बाणे जरी, । नाश चित्ताचा होय तरी, । आणि सविकल्प बाणेना, परी । अभ्यास करितां फिटे भ्रम जडत्वाचा. ॥ ११५२ ॥ सविकल्प बाणे जया, । द्वैत औषधास न सांपडे तया, । निर्विकल्प जरी त्या योगिया । न बाणे. ॥ ११५३ ॥ परंतु दोनी अभ्यास । अगत्य बोलिले योगियास, । म्हणूनी बोले जगन्निवास । द्विविध अभ्यास ये स्थळीं. ॥ ११५४ ॥ यांत दुःखाचा अंत । पावतो, म्हणे भगवत, । हा जगदात्माभ्यास निश्चित, । कीं, दुःख जडभाग अवघा. ॥ ११५५ ॥ ऐसे द्विविध अभ्यास । ज्या सुखस्वरूपीं योगियास, । तें सात्विक सुख म्हणेल श्रीनिवास । पुढिलिया श्लोकीं.

॥ ११५६ ॥ हें अर्जुनें ऐकिलें, । परंतु एक आश्चर्य मानिलें । कीं, अभ्यास करणें लागलें । स्वस्वरूपीं. ॥ ११५७ ॥ रसनेस लागतां गोडी, । मग ते पीयूष कां सोडी ? । जेथें सुख, तेथें उडी । दाटूनी मनाची पडतसे. ॥ ११५८ ॥ जरी न लागे गोडी, । तरीच चित्त त्यातें सोडी; । जें सुखस्वरूप, त्यातें घडी । न सोडी, हा तों सहज गुण चित्ताचा. ॥ ११५९ ॥ ऐसें असतां अभ्यास । कां बोलतो जगन्निवास ? । जरी सुख नावडे चित्तास, । तुवि तेथें लागतां अभ्यास बोलावा. ॥ ११६० ॥ चित्त न थारे जरी, । अभ्यास मांडावा तरी, । जें सुखच केवळ, तेथें कां परी । न थारेल चित्त ? ॥ ११६१ ॥ ऐसी अर्जुनाची शका । कळली शेषपर्यंका, । म्हणूनी उत्तमश्लोक या श्लोका । बोलत असे. ॥ ११६२ ॥

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३८ ॥

या शंकेचा परिहार । चतुर्थचरणीं बोलतो सर्वेश्वर, । कीं, तें सुख परात्पर । आत्मबुद्धिप्रसादजनित म्हणोनी. ॥ ११६३ ॥ आत्मस्वरूपबोधसिद्धी । जे बुद्धीस, ते आत्मबुद्धी; । रजतमवियोगें तिची शुद्धी, । तो प्रसाद बुद्धीचा. ॥ ११६४ ॥ जें सुख त्या प्रसादापासुनी, । स्वसुखीं तिची स्थिरता म्हणोनी; । अनुभवा नये बुद्धिप्रसादावांचूनी, । यानिमित्त बुद्धिप्रसादजनित तें. ॥ ११६५ ॥ दृष्टींत जों भ्रम वसे, । तों दिसोनीही दोर न दिसे; । भ्रमनिवृत्ति होतां, दोर गवसे, । जाणों उपजलाच दृष्टीपासूनी. ॥ ११६६ ॥ तैसे रजतमबुद्धीचे मळ । **विक्षेपलय** दोन्ही ओगळ; । विक्षेप जडभावना कश्मल, । तें रज; आणि निद्रालय तमोगुणें. ॥ ११६७ ॥ या दों मळीं-करूनी । बुद्धि सदा क्षोभली, म्हणोनी । स्वसुख नये प्रत्यया असोनी । स्वतःसिद्ध. ॥ ११६८ ॥ जेव्हां जडभावना राहे, । निखळ निजतत्त्व बुद्धी पाहे, । जरी कल्पनेचाही प्रवाह वाहे, । चैतन्य उदकची देखे जडा तरंगांत. ॥ ११६९ ॥ जातां ऐसा रजोमळ, । बुद्धिकल्पनारहित निर्मळ, । आणि निद्रा तमोगुण अमंगळ । तद्वर्जितही हे बुद्धी. ॥ ११७० ॥ ते पाहे स्वरूप निश्चळ, । अथवा विश्वरूप ब्रह्म सबळ । पाहतां, होय बुद्धि अचळ । दोंहीपरी चित्स्वरूपीं. ॥ ११७१ ॥ ऐसा बुद्धिप्रसाद अमळ । होय, जातां रजतमाचे मळ; । त्या प्रसादापासूनी केवळ । स्वसुख अनुभवा येतसे. ॥ ११७२ ॥ ते म्हणावी आत्मबुद्धी, । तिच्या ऐशा प्रसादापासूनी हे सिद्धी; । ज्या प्रसादा-

पासूनी या सुखाची समृद्धी, । तें जाणों त्याचपासूनी उपजलें. ॥ ११७३ ॥ आत्मबुद्धिप्रसादजनित । याप्रकारें म्हणे भगवंत, । बुद्धिप्रसादावांचूनी हें सुखामृत । प्राप्त नव्हे. ॥ ११७४ ॥ अमौल्य मुक्ताफळांचा हार, । परंतु भासला सर्पाकार, । दृष्टिक्षोभें भय अपार, । दृष्टिप्रसादें लभ्य तो. ॥ ११७५ ॥ तेव्हां दृष्टीचपासूनी । तो म्हणावा उपजला म्हणोनी, । आत्मसुख उपजे ये रीतीकरूनी । बुद्धिप्रसादापासूनी, देव म्हणे. ॥ ११७६ ॥ कीं मुक्ताफळांची माळ । देखोनी कोण न घे तत्काळ ? । परंतु दृष्टिभ्रमक्षोभें तो व्याळ, । हार दृष्टिप्रसादें तो उपजे. ॥ ११७७ ॥ हारीं स्पर्शोनी दृष्टी । सर्पभ्रमें नव्हे कष्टी, । तेव्हां दृष्टिप्रसादाची पुष्टी । तो लभ्य त्या प्रसादेंकरूनी. ॥ ११७८ ॥ ऐसा आत्मबुद्धिप्रसाद, । त्यापासूनी उपजे स्वरूपानंद, । एवंच **"अभ्यासयत्न"** म्हणे **मुकुंद** । पूर्वश्लोकीं बोलिला तो करावा. ॥ ११७९ ॥ ऐसें चतुर्थ चरणीं । बोलणें म्हणूनी **चक्रपाणी**, । प्रथम चरणीं प्रथमची वदला वाणी, । कीं, **"यत्तदग्रे विषमिव"**. ॥ ११८० ॥ कीं जें आरंभीं विषासम, । जे अभ्यासीं विघ्न करिती रजतम, । कीं, पित्तज्वरें विषोपम । शर्करा पित्तशमनी वाटते. ॥ ११८१ ॥ ते पित्तातें शमन करी, । आणि स्वरूपें गोड शर्करा, परी । जों पित्त शमे, तोंवरी । विषच वाटे. ॥ ११८२ ॥ तथापि ते शर्करा । आरोग्य करी पित्तातुरा; । तेव्हां रसनेचा प्रसाद होतां, सुधाधारा । तेच शर्करा स्रवों लागे. ॥ ११८३ ॥ या भावें **चक्रपाणी** । जें विषासम म्हणे प्रथम चरणीं, । त्यास तोच दुसऱ्या चरणीं बोले वाणी । **'परिणामेऽमृतोपमं'** म्हणूनियां. ॥ ११८४ ॥ एवंच अभ्यासावांचूनी । आत्मसुख नव्हे प्राप्त, म्हणोनी । सिद्धांत केला यावरूनी, । ते शब्दज्ञानी, जे 'अभ्यास' म्हणती 'किमर्थ ?' ॥ ११८५ ॥ जो उपजतां पित्तातुर, । त्यास वैद्यें दिधली साकर, । कडू लागतां न सेवी पामर, । आणि 'गोड' म्हणे आयकोनी. ॥ ११८६ ॥ श्रीगुरुकृपाघन । सर्वत्र वर्षे कृपाजीवन, । परी अभ्यास करिती विरळ सज्जन, । शब्दज्ञानी बहु फार. ॥ ११८७ ॥ गुरुमुखें आत्मा समजला, । तो कल्पवृक्ष दृष्टीं देखिला, । परंतु अभ्यासें कल्पित फळें देणार त्याला, । न मागतां आनंद, व्यर्थ सर्व. ॥ ११८८ ॥ कल्पवृक्षास मागावें, । तैसें अभ्यासें स्वसुख अनुभवावें, । ऐसें असोनी अभ्यासाच्या नांवें । शून्य घालिती भाग्यशून्य. ॥ ११८९ ॥ कीं, अभ्यासीं प्रथम । कडू लागे चित्तसंयम, । म्हणोनी बोले **सर्वोत्तम**, । कीं, **"यत्तदग्रे विषमिव"**. ॥ ११९० ॥ कल्पवृक्ष दे मागतां, । सुख दे आत्माभ्यास होतां, । **देव म्हणे** त्याच संतां ।

"परिणामेऽमृतोपमं" म्हणोनी. ॥ ११९१ ॥ कोणी अभ्यास वाटतां विष, । विषयविष मानी पीयूष, । ते षष्ठले योगाभ्यासीं पुरुष । हें षष्ठाध्यायीं बोलिलें. ॥ ११९२ ॥ तथापि जो कांहीं घडे अभ्यास, । त्या स्वल्पा अभ्यासें त्यास । जन्मांतरीं जुगनिवास । मुक्ति म्हणूनी षष्ठीं बोलिला. ॥ ११९३ ॥ जे ज्ञान मिरवावयाकारणें । गुरुमुखें करिती श्रवणपरायणें, । तिहीं तें ज्ञान अभ्यासाविणें । गमाविलें व्यर्थ. ॥ ११९४ ॥ कामधेनु आली द्वारा, । तृणाचा तीस लागेल भारा, । म्हणूनी तीस दवडिलें, त्या नरा । जोडा हा, जो वाग-विना अभ्यास. ॥ ११९५ ॥ असो तें प्रस्तुत । बोलतो ऐसें अच्युत, । कीं, ते सात्त्विक-सुख अद्भुत । पूर्वश्लोकीं अभ्यासलभ्य बोलिलें. ॥ ११९६ ॥ जें ऐसें आरंभीं वाटे विष, । आणि परिणामीं जें पीयूष, । तें आत्मसुख म्हणे परमपुरुष । सात्त्विक म्हणोनी. ॥ ११९७ ॥ सात्त्विकी बुद्धि, सात्त्विकी धृती, । जे मागें बोलिला श्रीपती, । त्या बुद्धिधृतियुक्तास ये रीती । अक्षय सुख. ॥ ११९८ ॥ आतां राजसी बुद्धि, राजसी धृती, । सुख त्याचें कोणे रीती ? । ते सांगावया जगत्पती । बोलतसे हा श्लोक. ॥ ११९९ ॥

विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

विषय आणि इंद्रिय । याच्या संयोगें जे होय, । तें सुख म्हणे रुक्मिणी-प्रिय । राजस बोलिले म्हणोनी. ॥ १२०० ॥ तें ऐसें, कीं, आरंभींच प्रथम । सुख वाटे अमृतोपम, । परतु परिणामीं विषासम । सुख तेंची शेवटीं दुःख वाटे. ॥ १२०१ ॥ चोरी करिताच सुख, । परिणामीं होय काळें सुख, । दंड होतां होय दुःख । तेंच सुख, जे चोरितां गोड वाटलें. ॥ १२०२ ॥ जें सुख अमृतोपम । मानिलें परद्रव्य घेतां प्रथम, । तेंच दंड होतां विषासम । वाटे पश्चात्तापेंकरूनी. ॥ १२०३ ॥ तैसें इंद्रियेंकरूनी । विषय सेवितांची मनीं । गोड वाटे अमृताहुनी, । होय परिणामीं तेंच दुःख. ॥ १२०४ ॥ जेव्हां विषय देखिला दृष्टी, । गोड वाटतांच पावला तुष्टी, । त्याच्या उत्तरक्षणींच कष्टी । दृष्टीआड होतां विषय तो. ॥ १२०५ ॥ तें रूप रेखिलें राहे मनीं, । न विसरे गोड मानुनी, । तें मज लभ्य कां नव्हे ? म्हणोनी । उपजे तळमळ. ॥ १२०६ ॥ गज, रथ, अश्व, कामिनी, । जें रूप देखिलें नयनीं, । तें रुतोनी राहे मनीं, । गोड वाटलें जें देखतां. ॥ १२०७ ॥ तें प्राप्त कां नव्हे ?

---

१. अ० ६, श्लो० ३५,३६,४०,४१. २. अ० ६, श्लो० ४२-४५. ३. पुढील क्षणींच.

म्हणोनी । तगमग सुटे अत्यंत मनीं, । वाटे गेला प्राण झिंखोनी । त्यासवें, न होतां प्राप्त तें रूप. ॥ १२०८ ॥ तो विषय यत्नें प्राप्त जाला, । तेव्हां वाटे प्राण आला; । पुन्हा अमृततुल्य वाटला, । प्राप्त होतां. ॥ १२०९ ॥ तों तो भळता पदार्थ । क्षणभंगुर अनर्थ; । शाश्वत राहेल कीं न राहेल? ऐसी व्यर्थ । चिंता तयाची. ॥ १२१० ॥ कांहीं होणार त्याची हानी, । ऐसा हेतु देखतां नयनीं, । मग दुःखाची गोष्टी काय म्हणोनी । वर्णावी? ते अतिप्रसिद्ध. ॥ १२११ ॥ तो विषय नाशतां, त्यासवें । वाटे आपण मरावें, । किंबहुना स्वर्गादि नांवें । ज्याविषयांचीं, ते ऐसे. ॥ १२१२ ॥ स्वर्गसुख पडे कानीं, । साध्य जें ज्योतिष्टोमादि करूनी, । तें सांग यागसिद्धि म्हणोनी । श्रम चिंता असंख्यात. ॥ १२१३ ॥ एवंच बहुतां कष्टें स्वर्गास जाय, । आरंभीं अमृत-रूप गोड होय, । परिणामीं ते देवांगनादि भोगविषय । विष होती सकळही. ॥ १२१४ ॥ तें शाश्वत वाटलें सुख, । परी पाहतां परम दुःख, । आपणाहूनी अधिक पदवीचा आणिक । देखतां, विष होय सुख आपुलें. ॥ १२१५ ॥ राजा एक स्वर्गासी जाउनी, । सुखी विमानीं देवांगना भोगुनी, । तों त्यास-मान राजा त्यामागुनी । अल्प तो बैसला अर्धासनीं इंद्राच्या. ॥ १२१६ ॥ त्यास देखतां दुःख वाटलें; । अमृत वाटलें होतें, तें विष जालें; । भोगितां तों नाहींच धालें । चित्त कधीं. ॥ १२१७ ॥ त्या स्वर्गापासुनी । च्यवतां, जों जें सेविलें अमृत मानुनी, । तें तों हालाहलाहीहूनी । विष वाटे. ॥ १२१८ ॥ स्वर्गादि पुरुषार्थ ऐसे होती, । इहलोकसुख तें आतां किती? । एवंच विषय जों जों अमृत वाटती, । तों तों परिणामीं होती अधिक विष. ॥ १२१९ ॥ ऐसें सुख राजस म्हणोनी । बोलिलों विषयेंद्रियसंयोगेंकरूनी, । सुख तों नाहीं ब्रह्मानंदावांचुनी, । परंतु दुःखपरिणाम विषयभावें. ॥ १२२० ॥ देखोनी नुसते किरण, । कोणी न धांवती हरिण, । श्रम धांवतां होती त्यास, कारण । जळाभास जळ मानितां. ॥ १२२१ ॥ ब्रह्मच एक आनंदस्वरूप, । त्या सुखीं विषयआरोप, । ब्रह्मची सुख, परी मानितां विषयरूप, । दुःख विषय इंद्रियसंयोगें. ॥ १२२२ ॥ त्यांत जें प्रत्यया आलें सुख, । तें तों ब्रह्मची 'विश्वतोमुख,' । त्या सुखीं अविद्याभ्रमें उपजे दुःख, । न कळतां सुमनहारीं सर्प जैसा. ॥ १२२३ ॥ सुख सुगंध त्या सुमनहाराचा । तो तों मिथ्या नव्हेच साचा, । धाक ज्या सर्पाभासाचा, । लटिका तो दुःखरूप. ॥ १२२४ ॥ जो स्वयें सुगंध सुख, । तोच सर्पाकारें होय दुःख, । दिसोनी न दिसे 'विश्वतो-मुख' । ब्रह्मसुख, जेंवी हार सुमनाचा. ॥ १२२५ ॥ सुगंध वाटे सर्पाचा, ।

तो तों सुमनहार साचा; । आनंद वाटे विषयांचा, । तों तेंही ब्रह्मसुख. ॥ १२२६ ॥ म्हणूनी सुख राजस म्हणावें त्यास, । कीं सर्प मानिलें हारास, । विषय मानितां ब्रह्मानंदास, । परिणामीं दुःख विषयेंद्रियसंयोगेंकरूनी. ॥ १२२७ ॥ कीं सुगंध आला हाराचा, । तो मानिला सर्पाचा, । तो सहज गुण त्या भासाचा । दुःख देणें. ॥ १२२८ ॥ महिमा अधिष्ठानाचें सुख, । गुण विवर्ताचा दुःख । तत्पदें हा अर्थ बोले मुख । स्वयें गीताकाराचें. ॥ १२२९ ॥ न बोलोनी बोले गीताकार, । तो भावार्थ म्हणती टीकाकार, । गीताकारची बोलिला म्हणावा तो प्रकार, । जो निघे अर्थ शब्दीं तयाच्या. ॥ १२३० ॥ आतां विषयसुखही ब्रह्मसुख, । ऐसें टीकामुखें तोची पूर्णेंदुमुख । या गीतेंत बोलिला विश्वतोमुख । या श्लोकीं एका तत्पदेंकरूनी. ॥ १२३१ ॥ या श्लोकीं तत्पदें दोनी, । एक 'यत्तदग्रेऽमृतोपमं' म्हणोनी, । दुसरें तें जें "तत्सुखं राजसं" या तत्पदेंकरूनी, । तें सुख राजस हा अर्थ. ॥ १२३२ ॥ जें विषयेंद्रियसंयोगे । सुख उपजे उभययोगे, । तें राजस म्हणावें, कीं, विषयभोगें । परिणामीं दुःख सर्वत्र. ॥ १२३३ ॥ 'यत्तदग्रे' या तत्पदेंकरूनी । जें बोलिलें विषयेंद्रियसंयोगे म्हणोनी, । तें राजस म्हणूनी भगवद्वचनीं । तत्पद निघाले दुसरे. ॥ १२३४ ॥ परतु 'यत्तदग्रे' येथें जें यत्पद,- यापुढें जे प्रथम तत्पद । हे या अर्थी न वाखाणितां विशद, । एक तत्पद निरर्थक होतसे. ॥ १२३५ ॥ तरी या तत्पदेंहीकरूनी । तें सुख, जें पूर्वश्लोकीं सात्त्विक म्हणोनी । बोलिलें, तेंच सुख हेंही, ऐसें सुचवुनी । देव बोले. ॥ १२३६ ॥ एक निर्भय सुमनहाराचा । सुगंध भोगी मानूनी हार साचा, । दुसरा तोची परिमळ सर्पाचा । मानितो आणि कांपतो. ॥ १२३७ ॥ या दोवेगळा एक साक्षी, । तो अनुभव दोघांचे दोनी लक्षी, । आणि सांगे एकास, जो अपेक्षी । श्रवण दोहीं गोष्टींचें. ॥ १२३८ ॥ त्यात हाराचा जाणे सुगंध, । त्यास सात्त्विक सुगंधाचा संबंध; । जो सर्प मानी भ्रमें अंध, । सुगंध राजस तयाचा. ॥ १२३९ ॥ उपदेश ऐसा ज्याप्रती, । त्यांस राजस सुगंध सांगे सुमती, । कीं, तोच सात्त्विक सुगंध दृष्टिभ्रांती । राजस करूनी; परिणामीं दे दुःख. ॥ १२४० ॥ न कळता हार उपजे भ्रांती, । हार भासे सर्पाकृती, । भ्रमदृष्टिसंयोगें अंगें कांपती, । सुगंध तो हाराचा. ॥ १२४१ ॥ अमृत वाटे तो परिमळ, । परी सर्पभयें विष केवळ । होय, कीं भयें विव्हळ । परिणाम करी त्या सुखाचा. ॥ १२४२ ॥ 'यत्तदग्रे' येथें तत्पद । अर्थ इतका वदवी, विशद, । अन्यथा निरर्थक गोविंद । सर्वज्ञ बोलेल, हें न घडे.

॥ १२४३ ॥ आतां हा मुख्यार्थ जरी । न सांपडे, तरी । जैसी तैसी टीका वैखरी । चालोनी जाते. ॥ १२४४ ॥ या तत्पदाचा अर्थ । आणिकें प्रकारें केला, तरी तो व्यर्थ; । उगवतां सूर्य समर्थ, । न प्रकाशे प्रकाश दीपाची. ॥ १२४५ ॥ अर्थ भावार्थ अबाधित, । आणि अर्थ अनुभवपर्यंत, । वेदवेदांतसिद्ध सिद्धांत, । आणि प्रस्तुत प्रकरणास उपयोगी. ॥ १२४६ ॥ अर्थ सोडोनी ऐसा, । लाटूनी नेला भलतैसा, । संतांस मान्य कैसा । होणार तो? ॥ १२४७ ॥ मुखाचें हें प्रकरण, । त्या मुखाचें तत्त्वविवरण । सुचवूनी विश्ववंद्यचरण । बोलत असतां, केंवी सोडावें? ॥ १२४८ ॥ तत्त्व ऐसें सुखाचें, । कीं, चैतन्यच सुख साचें, । "विज्ञानमानंदं ब्रह्म" ऐसें वेदांचें । प्रतिपदीं बोलणें. ॥ १२४९ ॥ सुख आत्माच केवळ, । अंश त्याचें विषयसुख सकळ, । ऐसेंही बोलती प्रांजळ । वेदश्रुती. ॥ १२५० ॥

श्रुती—**एतस्यैवानंदस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवंति ॥**

याच ब्रह्मानंदाचिया अंशानें । भोगूनी जिती सर्वही भूतें, । म्हणूनी ऐसीं बहुतें । वेदवचनें येविषयीं. ॥ १२५१ ॥ परंतु विषययोगें तेंची सुख । सेवितां परिणामीं दुःख, । म्हणूनी यास्तव बोले पूर्णेंदुमुख । हें राजससुख म्हणोनी. ॥ १२५२ ॥ एवंच ज्या सुखीं दुःखाचा अंत, । तें ब्रह्मसुख सात्त्विक, म्हणे भगवंत, । याच कारणें सेविती संत । सात्त्विका सुखातें. ॥ १२५३ ॥ जें सत्त्वीं ब्रह्मसुख, । रजीं तेंच, परी परिणामीं दुःख; । जळांत मूत्रांतही दिसे स्वमुख, । परी उघडे मुख मूत्रीं न पाहती. ॥ १२५४ ॥ मुतोनी गारींत बाळ । स्वमुख पाहोनी मानी सुकाळ; । प्रौढाची दृष्टि पडतां, तत्काळ । दृष्टि काढी तया स्वमुखावरूनी. ॥ १२५५ ॥ जाणतां आरसा, पाहे मुख, । ज्ञानी सत्त्वीं सात्त्विक ब्रह्मसुख, । विषयसुख मूर्ख भोगिती परिणामदुःख, । स्वमुख मूत्रांत बाळ पाहे जैसा. ॥ १२५६ ॥ अतएव सात्त्विकी मती, । आणि ज्याची सात्त्विकी धृती, । ते सात्त्विक सुखची सेविती, । जेथें अंत सर्वां दुःखांचा. ॥ १२५७ ॥ चंद्रींच सुख चकोरातें, । सुख मेघींच मयोरातें, । सोडोनी सागरा थोरातें । मेघजळची चातक सेविती. ॥ १२५८ ॥ उच्छिष्ट गर्ताजळें । सादर सेविती काककुळें, । हंसांस तें अति अमंगळें, । जे सेविती विमळें मानससरोवरीं. ॥ १२५९ ॥ जे सात्त्विकसुखें रमती, । विषयसुखीं त्यांची मती । तरीच सादर न धरी प्रीती, । कीं, मिष्टान्नवमन

कोणास आवडे ?. ॥ १२६० ॥ अतएव सात्त्विक संत । सात्त्विकसुख त्याचें वदे भगवंत; । आणि मतिधृति राजसी अत्यंत, । राजससुख तयाचें, दावी हा भाव. ॥ १२६१ ॥ आतां ज्याची मति, धृती, । तामसी, बोलिला श्रीपती । त्याचें तामससुख पार्थाप्रती । बोलतो आतां या श्लोकीं. ॥ १२६२ ॥

यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ।
निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

जें आरंभीं मोहच करी, । म्हणिजे विवेकस्फूर्ति सत्त्वाची हरी, । आणि भोगकाळ क्रमलिया उपरी । उपजवी मोह बुद्धीस. ॥ १२६३ ॥ जें सुख निद्रेपासुनी, । जें सुख आलस्येंकरूनी, । आणि ज्याला म्हणावें प्रमाद म्हणोनी, । त्यापासूनीही सुख, तें तामस. ॥ १२६४ ॥ जें अगत्य करणें, । तें न करणें असावधपणें, । दिसे जो मोह या गुणें, । तो म्हणावा प्रमाद. ॥ १२६५ ॥ ये रीती निद्रा, आलस्य, प्रमाद, तिनी, । सुख उपजे जें या तिहींपासुनी, । तें म्हणावें तामस म्हणोनी; । मोह आदि, अंतींही, त्या सुखें. ॥ १२६६ ॥ निद्रा, स्वप्न, सुषुप्ती, । तेव्हां विवेकाची समाप्ती, । निखळ तमाची प्राप्ती । बुद्धीस जेव्हां. ॥ १२६७ ॥ तेव्हां मोहास काय वाणी ? । ते अवस्था मोहाची खाणी, । बैसती सर्वां द्वारीं ठाणीं । महामोहाचीं जेधवां. ॥ १२६८ ॥ जो असे निद्रित, । सुख तेंच तोंवरी वाटे अमृत; । जेव्हां होय जागृत, । तेव्हां उत्तरकाळ त्या सुखाचा. ॥ १२६९ ॥ निद्रा जयास फार, । तो जागा जाला जरी नर, । तथापि जांभया देतां अवसर । लागे बहु. ॥ १२७० ॥ गेला निद्रेचा अवसर, । राहिला सुखाचा भर; । तथापि देहीं उरला विसर, । कांहीं न उमजे. ॥ १२७१ ॥ मोह अंतींही ये रीती, । म्हणोनी मोह आदि अतीं, । तामस सुख ऐसें, अगा ! सुमती ! । देव म्हणे. ॥ १२७२ ॥ आलस्यसुख याला म्हणावें, । कीं, ज्या काळीं जें करावें, । तें त्या काळीं न करणें मूढभावें, । आणि सुख वाटणें, न करितां. ॥ १२७३ ॥ यथा काळें जें न करी, । सुख तें न करी तोंचवरी, । करूं लागतां तदुपरी, । सुख नसे. ॥ १२७४ ॥ तेव्हां तो सुखाचा समाप्तिकाळ, । तो त्याही काळीं मोहाचा सुकाळ, । कीं, न घडे होतां सायंकाळ, । कार्य मध्यान्हीं करायाचें. ॥ १२७५ ॥ तेव्हां होय घाबिरा, । कर्तव्य न सुचे पामरा, । तो मोह तेव्हांही

त्या नरा । आलस्यसुख सरल्यानंतरही. ॥ १२७६ ॥ आलस्यसुखतत्परा । मोहची आद्यंत सारा; । आतां प्रमादापासूनी सुख ज्या नरा, । त्यासही मोह आद्यंत. ॥ १२७७ ॥ कर्तव्यविषयीं असावधपण, । आणि निश्चित मानी अंतःकरण, । त्या निश्चित सुखीं अत्यंत आपण । कृतकृत्य जैसा. ॥ १२७८ ॥ तों कार्याचा नाश दिसे, । तेव्हां स्वयें स्वबुद्धीहीवरी रुसे, । कष्टी होतां न दिसे । मग तें प्रमादसुख. ॥ १२७९ ॥ तो सुखाचा अंत, । कीं प्रमादें सुखी होता तोंचपर्यंत, । जों असावधपण अत्यंत । बुद्धींत होतें. ॥ १२८० ॥ जेव्हां कार्यनाश कळला, । तेव्हां सावधपणें खवळला, । भाव बुद्धीचा निवळला, । परी शोक उपजला कार्यनाशें. ॥ १२८१ ॥ शोक मोहाचें स्वरूप, । घट मातीचेंची रूप, । एवं मोह आद्यंतही अमूप । तें तामस सुख बोलिलें. ॥ १२८२ ॥ ऐसा मोह आदि अंतीं । ज्यास, तें त्रिविध ये रीती, । तामससुख बोलिला श्रीपती । निद्रालस्यप्रमादजनित. ॥ १२८३ ॥ या श्लोकीं हें तामस, । पूर्वश्लोकीं राजस, । त्यामागें तें सात्त्विकसुख ब्रह्मरस, । भगवंत बोलिला. ॥ १२८४ ॥ यांत सत्त्वसुखीं सत्त्व प्रबळ, । तेथें क्षीण रजतममळ; । राजससुखीं रजाचें बळ; । तामस सुखीं तमाचें. ॥ १२८५ ॥ यांत बळवंत एक गुण, । त्यावेगळे उरले दोनी ते क्षीण, । परंतु शुद्धसत्त्वाचें शुद्धपण । तें न कळे या प्रसंगीं. ॥ १२८६ ॥ म्हणोनी हें संशयाचें स्थळ, । कीं, शुद्धसत्त्व जें निर्मळ, । त्याच्या योगें जें सुख केवळ, । त्याचा अनुभव आणि अनुभवी त्याचे कैसे ? ॥ १२८७ ॥ या प्रसंगीं सात्त्विकसुख । जें बोलिला पूर्णेंदुमुख, । त्याच्या अभ्यासाआरंभीं दुःख । रजतमसंस्कारेंकरूनी. ॥ १२८८ ॥ रजतमापासूनी अभ्यासें । शुद्ध होतां ब्रह्मरसें, । मग परिणामीं अमृतसें, । एवंच मिश्रसत्त्वें सात्त्विक हें सुख. ॥ १२८९ ॥ परंतु शुद्धसत्त्व जे असती, । सुख सात्त्विक तयाचें कोणे रीती ? । ये स्थळीं श्रोतयाची मती । ऐसी सापेक्ष होणार. ॥ १२९० ॥ तरी तें शुद्धसत्त्व । कोठेंच नाहीं विना ईशत्व, । हें आतां बोलतो तत्त्व । या प्रसंगें या श्लोकीं. ॥ १२९१ ॥

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥**

तें तों नसे पृथ्वीवरी, । अथवा स्वर्गलोकीं, आणि त्याही उपरी । ब्रह्मादि देवाच्या ठायीं परी । तें सत्त्व नसे. ॥ १२९२ ॥ जें या तिहीं गुणेंकरूनी ।

बद्ध नव्हे, म्हणोनी । मुक्त म्हणावें या तिहीं गुणांपासुनी, । प्रकृतीपासाव जन्म ज्या त्रिगुणांचा. ॥ १२९३ ॥ तें पृथ्वींत नसे, । स्वर्गीं आणि देवाच्याही ठायीं न वसे; । अथवा पुन्हा होईल, हेंही न गवसे, । भविष्यदृष्टीकरूनी. ॥ १२९४ ॥ पृथ्वी आणि पृथ्वीतळें सात, । तें सत्त्व नाहीं या इतकियांत, । स्वर्गीं आणि ऊर्ध्वलोकींही विख्यात, । महर्लोकादि त्या लोकींही. ॥ १२९५ ॥ तें नित्यमुक्त । ईश्वरोपाधि अव्यक्त, । जें अखंड ब्रह्माद्वैतबोधयुक्त, । तें नसे कोणास आणि नव्हे पुन्हां पुढेंही. ॥ १२९६ ॥ तो उपाधि आपला भाव । दावी येथें देवाधिदेव, । कीं, जें मुक्त सर्वदा स्वयमेव । या प्रकृतिसंभवापासूनी. ॥ १२९७ ॥ सत्त्वादि गुण हे तिनी । उपजले म्हणती प्रकृतीपासुनी, । ते प्रकृतिसूत्र म्हणोनी । वेदीं पुराणीं प्रसिद्ध. ॥ १२९८ ॥ शुद्धसत्त्व मूळमाया, । त्या उपाधियोगें ईश्वरा अद्वया । इच्छा सृष्टि करावया । उपजली, तेव्हां प्रकटली प्रकृति तें सूत्र. ॥ १२९९ ॥ तें त्रिगुणात्मक, । तीं गुणांचें सूत्र एक. । त्या प्रकृतीच्या क्षोभेकरूनी जाला विवेक । भिन्नत्वें गुणत्रयाचा. ॥ १३०० ॥ ऐसे प्रकृतीपासुनी । जे गुण उपजले, त्यांहींकरूनी । बद्ध नव्हे, म्हणोनी । मुक्त जें सत्त्व. ॥ १३०१ ॥ 'तें कोणही स्थळीं । कोणांत कोणेही काळीं । नाहीं' म्हणतां, भावार्थाची उकळी । दावी, कीं, तें असे आपणाचमध्यें. ॥ १३०२ ॥ कीं दशमीं देवाधिदेव । हाची बोलिला स्वयमेव. । कीं, माझा प्रादुर्भाव । देव महर्षि कोणी न जाणती. ॥ १३०३ ॥ **"न[3] मे विदुः सुरगणाः प्रभवं"** या श्लोकेंकरूनी । **"न महर्षयः"** म्हणोनी । कीं यांचाच आदि आपण आपणाचपासूनी । उपजले देव महर्षि सकळ. ॥ १३०४ ॥ देवांचा आदि जो देवाधिदेव, । प्रभव म्हणजे त्याचा प्रादुर्भाव । काय जाणती ते ब्रह्मादि देव ? । जे त्याच्या उपाधीपासूनी उपजले. ॥ १३०५ ॥ त्याचा उपाधि शुद्धसत्त्व, । जें ब्रह्म प्रकट तें प्रथम मायातत्त्व, । त्यापासूनी सूत्र, तेंची मग महत्तत्त्व । चतुर्मुखरूप प्रगटलें. ॥ १३०६ ॥ ब्रह्मादि देवांच्या ठायींही । तें शुद्धसत्त्व म्हणे नाहीं, । बंध नसे ज्यास कांहीं । या तिहीं गुणांचा. ॥ १३०७ ॥ तें सत्त्व पृथ्वींत नसे, । म्हणजे पृथ्वीवरील लोक त्यांत न दिसे, । **'दिवि'** म्हणतां स्वर्गीही न गवसे, । म्हणजे देवांमध्येंही तें असेना. ॥ १३०८ ॥ पृथ्वी म्हणतां नर, । तैसेंच स्वर्ग म्हणतां सुर, । पुन्हां

१. पाताळें. २. उदय, जन्म. ३. अ० १०, श्लोक २.

देवांच्या ठायीं म्हणे सर्वेश्वर, । कीं, ब्रह्मादिकांहीमध्यें तें नसे. ॥ १३०९ ॥ जें सत्त्व कोठें नाहीं म्हणोनी । देव बोले या श्लोकेंकरूनी, । त्याचा प्रादुर्भाव तोच आपला ऐसें सुचवुनी । दशमीं म्हणे **"न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः"**, ॥ १३१० ॥ एवंच त्या सत्त्वाचा प्रादुर्भाव । हे न जाणती ब्रह्मादि देव; । तेव्हां तें सत्त्व ज्यांत, तो हा देवाधिदेव, । हें कळलें अर्जुनातें. ॥ १३११ ॥ ऐसें अर्जुनातें कळावें, । म्हणोनी ऐसें देवें बोलिलें या भावें, । कीं, दशमीं हें रहस्य ठावें । अर्जुनातें. ॥ १३१२ ॥ परंतु जें सत्त्व जालें आधीं, । तें एकाच ईश्वराचा उपाधी, । त्यावांचूनी नाहीं कोठे कधीं, । हें रहस्य नेणे अर्जुन. ॥ १३१३ ॥ म्हणूनी त्या शुद्धसत्त्वाचा सुखानुभव । ज्याला असेल, त्याचें बुद्धिधृतिसुखवैभव । कां न बोले देवाधिदेव ? । साशंक जाला ये रीती. ॥ १३१४ ॥ त्यावरूनी हा श्लोक । बोलिला उत्तमश्लोक, । कीं, धुंडितां सर्व लोक, । कोठें कोणांत तें नसे. ॥ १३१५ ॥ पृथ्वी स्वर्ग लोक दोन्ही । बोलिला, परि **"पृथिव्यां वा"** म्हणोनी, । आणि **"दिवि देवेषु वा"** म्हणतां या दोहीं **वा**शब्दींकरूनी । लोक चतुर्दश सुचविले. ॥ १३१६ ॥ **वा** म्हणिजे विकल्प, जे नाना । पृथ्वीखालें सप्तपाताळांतील रचना । आणि स्वर्गादीवरी लोककल्पना । सप्तलोकपर्यंत. ॥ १३१७ ॥ या लोकीं जे लोक सकळ, । देवादिकांचें जें कुळ, । या कोणामध्यें तें सत्त्व विमळ । नाहीं, म्हणे गूढभावें. ॥ १३१८ ॥ भाव कीं, ज्या लोकीं जो वसे, । त्यास त्या लोकीं स्वदेह दिसे; । आणि शुद्धसत्त्वोपाधीस हें नसे, । कीं, मी असें एका अमुकियाच लोकीं. ॥ १३१९ ॥ ब्रह्मादि देवां वाटे, कीं, । 'आपण असों सत्यादि लोकीं;' । हें नसे सत्त्वोपाधि उत्तमश्लोकीं, । तो अनंत, त्यास वाटे सकळ आपण. ॥ १३२० ॥ सर्व व्यापूनी, साक्षी । सर्वांस आत्मत्वेंची लक्षी, । सर्वांस निर्मी संहरी, रक्षी, । सर्व व्यापूनी जो उरला. ॥ १३२१ ॥ ज्याचा उपाधी सत्त्व ऐसें, । तो मी एकाच लोकीं म्हणेल कैसें ? । सिंधु न मानी जैसें । एकाच तरंगीं आपण. ॥ १३२२ ॥ इतर सत्यलोकादिपती । आपण अमुकिया लोकीं आहों म्हणती, । म्हणूनी लोक उच्चारूनी जगत्पती । बोले ऐसें. ॥ १३२३ ॥ कीं जे पृथ्वींत असती नर, । आणि स्वर्गीं सुर, । त्यांत हें नसे, म्हणे सर्वेश्वर । या गूढभावेंकरूनी. ॥ १३२४ ॥ आतां वर्तमानकाळीं नसे जरी, । पुढें कोणी निमार्ण होईल

या उपरी, । त्यांत तें प्रकट होईल म्हणसी, तरी । पुन्हा होईल प्रगट कोठें, हेंही घडेना. ॥ १३२५ ॥ 'पुनः'शब्दें आणि 'स्यात्' पदेंकरूनी । अन्वय या दोहों पदांचा सुचवुनी, । अर्थ ऐसा करावा म्हणोनी । सुचवी देव. ॥ १३२६ ॥ हें गुणप्रकरण, । येथें शुद्धसत्त्वाचें विवरण । न होतां, साक्षेप अंतःकरण । होणार अर्जुनादिकांचें. ॥ १३२७ ॥ म्हणूनी तें[1] शुद्धसत्त्व । तेथेंची, कीं जेथें ईश्वरत्व; । वरकड कोणांत नाहीं, ऐसें तत्त्व । या श्लोकीं देव बोलिला. ॥१३२८॥ परी बोलती कोणी टीकाकार । या श्लोकीं अन्य प्रकार, । ते त्रिगुणमुक्त शुद्धसत्त्वविचार । सत्त्वशब्दे न बोलती. ॥ १३२९ ॥ सत्त्व-शब्दे देह, परी । जो जीव, तो पृथ्वींत स्वर्गलोकींही वरी । ऐसा नाहीं, कीं, या गुणत्रयाच्या दोरीं । बांधला नसे. ॥ १३३० ॥ अर्थ बराच तोही, परी । सत्त्वशब्दें जीव होय जरी, । सत्त्वशब्दें देहची तरी, । देह याच तीं गुणांचा. ॥ १३३१ ॥ त्रिगुणांचेंच जे शरीर सत्त्व, । त्यास त्या गुणत्रयापासूनी मुक्तत्व । नाहीं पृथ्वींत स्वर्गा. ऐसें तत्त्व । बोलतां विरुद्धार्थ लागतो. १३३२ ॥ कीं नग सुवर्णाचेच घडले, । ते काय सोन्याच्या बंधीं पडले, । बंधींच जरी नाहीं सांपडले, । तरी त्यांत मुक्त कोणी नाहीं कां म्हणावें? ॥ १३३३ ॥ किंबहुना शरीरें । पंचभूतांची नानाकारें, । त्यांत पंचभूतांपासूनी मुक्त बरें । एकही शरीर नाहीं, कोण म्हणे? ॥ १३३४ ॥ गुणत्रयाचाच बंध, । गुणत्रयातेंच बंधसंबंध, । चंदनानें चंदनसुगंध । बंध जैसा. ॥ १३३५ ॥ वेगळा बंध, वेगळा बद्ध, । असे तरी हा अर्थ कांहीं दिसे साध्य; । बद्धबंधएकत्वीं असाध्य । अर्थ ऐसा. ॥ १३३६ ॥ आता 'नाहीं मुक्त' म्हणिजे बंधापासुनी । मुक्त नाहीं, ऐसा अर्थ न करूनी, । सत्त्व कोणी त्रिगुणावेगळें नाहीं, म्हणोनी । मुक्त नाहीं, याचा ऐसा करावा अर्थ. ॥ १३३७ ॥ तरी या उपदेशास अधिकारी कवण? । योग्य काय ज्याला या उपदेशाचें श्रवण? । जो जाणे सत्त्व-मात्र त्रिगुण । तो, कीं त्रिगुणाचें तत्त्व मात्र नेणतो. ॥ १३३८ ॥ यांत जो त्रिगुणाचेंच जाणे सत्त्व, । त्यास हे ठावेंच तत्त्व, । कीं, जें त्रिगुणाचेंची त्यास भिन्नत्व । कैचें त्रिगुणापासूनी? ॥ १३३९ ॥ त्यास उपदेश ये रीती, । कीं, पुत्र ज्याचा सांगितला ज्याप्रती, । त्याप्रतीच सांगणें मागुती, । कीं, तो पिता त्या पुत्राचा. ॥ १३४० ॥ आतां त्रिगुणाचेंची सत्त्व, । जो ऐसें नेणे तत्त्व, । जरी म्हणावें त्यास योग्यत्व, । तरी तो पुसेल 'कां?' म्हणोनी. ॥ १३४१ ॥

---

१. 'जें' असा पाठ आढळतो.

त्रिगुणाविरहित कोणी सत्त्व । कां नाहीं? काय याचें तत्त्व ? । ऐसें पुसेल; तेव्हां त्यास उचित वक्तृत्व, । कीं, त्रिगुणाचें सत्त्व मात्र म्हणोनी. ॥ १३४२ ॥ तरी आधीं येच रीती । कां न वदावें त्याप्रती? । कीं, त्रिगुणांचीच भलती सत्त्वाकृती, । मग त्यासही हें सांगणें लागेना. ॥ १३४३ ॥ सत्त्व मात्र त्रिगुणाचें, । हें न सांगता, मुक्तत्व ऐसें त्याचें । सांगतां, त्यास तत्त्व त्याचे । न कळे तें त्रिगुणाचे, कीं ऐसें न सांगतां, ॥ १३४४ ॥ कीं बापा! शरीर सत्त्व जितकें, । त्रिगुणांचे रचले तितके, । म्हणूनी बोलणें लागलें इतके, । कीं त्रिगुणमुक्त नाहीं सत्त्व कोठे. ॥ १३४५ ॥ तो म्हणेल, स्वामी! । पहिलेंची ऐसें कळतें, तरी मी । जाणतोंच कीं स्थावरजगमीं । कोणी नाहीं त्रिगुणापासून सूटले. ॥ १३४६ ॥ कीं जळाचे तरंग सकळ, । ऐसें कळतांच, कळलें प्रांजळ । कीं, तरंग कोणी नाहीं ज्यास जळ । सोडी कदापी. ॥ १३४७ ॥ नग अवघे सुवर्ण, । ऐसें सांगतांच, कळलें पूर्ण, । कीं, सुवर्णें सोडिलें ऐसें भूषण । कोठेही असेना. ॥ १३४८ ॥ एवं दोहींपरी हा उपदेश । न करील सर्वज्ञ हृषीकेश, । हा अर्थ साधता, वृथा क्लेश । का करावे? ॥ १३४९ ॥ अर्थ मुख्य अबाधित । सापडता, कोण पंडित । अर्थ गौण आणि खंडित । अंगीकारी? ॥ १३५० ॥ आता सत्त्वास म्हणता बंध, । जीवाकडे लागावा संबंध, । तरी मुख्यार्थ जो न देखे अंध, । वाटे त्याने हे घ्यावें ॥ १३५१ ॥ बोलोनी काय बहुत? । अर्थ सापडला अद्भुत, । भगवत्कृपाकटाक्षसंमत, । किंबहुना टीकाकर्ता तो स्वयें. ॥ १३५२ ॥ न दूषिता इतर अर्थ, । तोही वाटेल कीं समर्थ. । श्रोते म्हणतील, कोणता यथार्थ? । श्रद्धा उभयत्र, तोंची उभयत्र संदेहही. ॥ १३५३ ॥ भगवंत करितो हे टीका, । आणि नांव **यथार्थदीपिका,** । येथें बाधितार्थ खटणी शंका । तो मज लेखका धरूं नेदी. ॥ १३५४ ॥ म्हणोनी हे लागले बोलणें, । बाधित अर्थाची बोलिले दूषणें, । तत्रापि सर्वही करणें । त्याचेंची असे. ॥ १३५५ ॥ या श्लोकीं **स्यात्**पदाचा अर्थ । **मुक्त**पदीं त्यजिता जाला अनर्थ, । **पुनः**शब्दासीं **स्यात्**पदासीं अन्वय समर्थ! सुचवूनी बोलिला अर्थ ऐसा. ॥ १३५६ ॥ कीं प्रकृतिसंभव गुण तीनी, । मुक्त या तरी सामुनी । शुद्धसत्त्व ऐसें त्रिभुवनीं । नाहीं. प्रस्तुत. ॥ १३५७ ॥ परी पुढे होईल या जगीं ऐसें, । कीं, मनुष्यांत देवात ते नित्य सत्त्व गवसे, । या शंकेचा परिहार बोलतसे. । कीं, पुन्हा पुढे होईल हेंही घडेना. ॥ १३५८ ॥ **पुनः**शब्दाचें सार्थकत्व, । आणि प्रमाणसिद्ध तत्त्व, ।

गुणप्रकरणीं शुद्धसत्त्व । बोलिलें, अन्य अर्थ लागेना. ॥ १३५९ ॥ असो तें; प्रस्तुत । सत्त्व येथें अच्युत । जें त्रिगुणापासूनी मुक्त, तें अद्भुत । कोठे नाहीं, न होणारही म्हणतसे. ॥ १३६० ॥ एवं एक आपण । अवलंबूनी शुद्ध सत्त्वगुण, । करितों हें गीतानिरूपण, । भावार्थ ऐसा. ॥ १३६१ ॥ आतां या उपरी गीता । कशाविषयीं पांडुसुता । उपदेशितो पिता । ब्रह्मयाचा ? ॥ १३६२ ॥ त्याचा करितां विचार, । ब्राह्मणादि वर्णधर्मप्रकार । गुणत्रय-प्रसंगानुसार । भगवंत बोलतो येथूनी. ॥ १३६३ ॥ प्रकरण तें किमर्थ । बोलों पाहतो समर्थ ? । हा विचार करितां, पार्थ । झणी स्वधर्म टाकील म्हणोनी. ॥ १३६४ ॥ कीं, बुद्धि, आणि धृती, । आणि सुखही त्रिविध विश्वपती । गुणभेदें बोलतां स्वमती । करिता जाला ये रीतीं पार्थ. ॥ १३६५ ॥ कीं, सात्त्विक तितकें उत्तम, । राजस तामस मध्यमाधम, । शुद्ध सत्त्व उत्तमोत्तम, । तें तों नसेच कोठेही. ॥ १३६६ ॥ परतु जें प्रकृतिसंभव सत्त्व, । त्यास या त्रिगुणीं उत्तमत्व, । तरी जे जे गोष्टीस सात्त्विकत्व, । ते तेच गोष्टी आपण कां न अवलंबू ? ॥ १३६७ ॥ निश्चय ऐसा करी पार्थ, । हा उत्तमची तो मानी साक्षी समर्थ, । परी एक त्यांत मोठा अनर्थ, । कीं, त्याग होणार स्वधर्माचा. ॥ १३६८ ॥ धर्म राजस क्षत्रियांचा, । आणि युद्ध न करणें निश्चय जयाचा, । आवडे धर्म तो सात्त्विकाचा, । तऱ्हां युद्ध राजस धर्म तो न करी. ॥ १३६९ ॥ म्हणेल देवें केलें सिद्ध. । कीं सात्त्विक नितुकें परम शुद्ध, । या आश्रये मी टाकून युद्ध, । अवलंबीन सात्त्विक बुद्धि धृतिही. ॥ १३७० ॥ म्हणूनी युद्धत्यागास अवसर । देखोनी, आतां सर्वेश्वर । क्षात्रधर्मप्रसंगे पसर । बोलेल चहू वर्णांचा. ॥ १३७१ ॥ यांत वाटे गुण-हीन, । तरी स्वधर्मेच मुक्तीचें साधन, । म्हणूनी शेवटीं कमलनयन । बोलेल ऐसें. ॥ १३७२ ॥ स्वधर्म जरी विगुण, । आणि परधर्म सद्गुण, । तथापि मुक्ति द्यावया निपुण । धर्म आपलाच आपणातें. ॥ १३७३ ॥ बोलेल ऐसें अंतीं, । प्रस्तुत वर्णधर्म पार्थाप्रती । सांगेन म्हणोनी श्रीपती । बोलतसे हा श्लोक. ॥ १३७४ ॥

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥**

अगा ! ब्राह्मणांचीं, क्षत्रियांचीं, । आणि वैश्यांचीं, शूद्रांचीं, । प्रकर्षेकरूनी कर्में यांचीं । पावलीं विभाग. ॥ १३७५ ॥ वेगळींच कर्में ब्राह्मणांचीं, । जालीं

वेगळीं क्षत्रियांचीं, । जालीं वेगळीं वैश्यांचीं, । आणि शूद्रांचींही वेगळींच. ॥ १३७६ ॥ कोण्या हेतूकरूनी । वेगळे भेद पावलीं ? म्हणोनी । म्हणसी, तरी हेच गुण तीनीं । सत्व, रज, तम, यांकरितां. ॥ १३७७ ॥ कांत सात्विक केवळ । कर्म ब्राह्मणाचें निर्मळ; । कांहीं सत्त्व आणि प्रबळ । रजोगुण कर्म क्षत्रियांचें. ॥१३७८॥ आणि वैश्यांची । केवळ राजसी क्रियाची; । तामस क्रिया शूद्रांची; । भेद ऐसे या गुणेंकरूनी. ॥ १३७९ ॥ तरी हे भेद कां परी । जाले ? म्हणोनी म्हणसी जरी, । तरी याच्या निमित्ताची गोष्टी बरी । सांगतों, ते आईक. ॥ १३८० ॥ हे गुण **स्वभावप्रभव** । म्हणिजे स्वभावापासूनीं यांचा प्रभव, । **प्रभव** म्हणिजे प्रकर्षे भव, । उद्भव. यांचा ब्रह्मीं प्रतिकल्पीं. ॥ १३८१ ॥ अचूक यांचा संभव । प्रतिकल्पीं, म्हणूनी ऐसा जो उद्भव, । तो प्रकर्षे होतो म्हणोनी प्रभव । म्हणावे यांच्या उद्भवानें. ॥१३८२॥ सृष्टि, स्थिति, संहार, । याचकरितां वारवार, । ब्राह्मणक्षत्रियादि वर्णव्यवहार । याचकरितां, ऐसा उद्भवप्रताप याचा. ॥ १३८३ ॥ म्हणूनी यांचा भव । म्हणावा प्रभव, । तो का होतो म्हणसी ? तरी स्वभाव । ऐसाच यांच्या कारणाचा. ॥ १३८४ ॥ याचें कारण जें मूळ । अनादि ब्रह्म केवळ, । त्याचा स्वभाव ऐसा प्रबळ, । कीं, ते नासे, तरी नासे उत्पत्ति या गुणांची. ॥ १३८५ ॥ तें तो नित्य सनातन शाश्वत, । आणि वस्तुस्वभाव ऐसा अद्भुत, । त्या स्वभावापासूनीं निश्चित । व्हावाच उद्भव या गुणाचा. ॥ १३८६ ॥ किरणांचा वस्तुस्वभाव, । कीं, जळाभासाचा व्हावा उद्भव; । स्वभाव वृक्षाचा, कीं, संभव । फळाचा व्हावाच त्यापासूनीं. ॥ १३८७ ॥ किरणीं जळाभास-उदय । जो असे, तो किरणमय, । किरणींच त्याचा लय, । गुणावस्था ब्रह्मीं ये रीती. ॥ १३८८ ॥ हा प्रकृतिपुरुषांचा विवाह । प्रतिकल्पीं ऐसा निर्वाह; । तें अनाद्यनत, तैसा गुणप्रवाह । कधींपासूनी, कोठवरी, हें असेना. ॥ १३८९॥ एवंच हें तत्त्वच संतांतें पुसावे, । आणि स्ववर्णोचित कर्ममार्गी असावें, । आतां कोणी कोणावरी रुसावें ? । राजस तामस कर्म कां माझे म्हणोनी ? ॥ १३९० ॥ भावपोटीं ये रीती, । तो त्रिगुणमायेचा पती । म्हणे ऐसें अर्जुनाप्रती, । कीं, स्वभावप्रभव गुणीं हे कर्मभेद. ॥ १३९१ ॥ येथें 'परंतपा!' म्हणोनी । अर्जुनास याच भावेंकरूनी । आळवी, कीं, पर जे शत्रु त्यांतें मारुनी, । स्वकर्म राजस तरी आचरावें. ॥ १३९२ ॥ आणि ब्राह्मण, क्षत्रिंय, । तिसरे वैश्य, हें वर्णत्रय, । हे द्विज वेदाधिकारीच ऐसा निर्णय, । शूद्र यां न सारिखे. ॥ १३९३ ॥ परतु वर्णत्रयसेवाधर्म । वेदविहितची त्यांचें कर्म, ।

हें सुचवूनी बोले वर्म, । कीं, भिन्नकर्म शूद्रांचेंही. ॥ १३९४ ॥ एवंच सत्त्वादिक गुणत्रय, । यांच्यायोगें वर्णनिर्णय । वेगळाला म्हणे श्रीप्रिय, । त्यांत ब्रह्मकर्म बोलतो या श्लोकीं, ॥ १३९५ ॥

**शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥**

**शम** म्हणजे भगवन्निष्ठता । बुद्धीस असे तत्त्वता, । प्रथम **ब्रह्मकर्म पांडु**-सुता ! । हें बोलिलें. ॥ १३९६ ॥ निष्ठा धरावी माझे ठायीं, । बुद्धि जडावी माझे पायीं, । शम ऐसा नाना उपायीं । साधावा, त्यास **दम** प्रथम साधन. ॥ १३९७ ॥ दम म्हणजे इंद्रियांचा । निग्रह काया मनसा वाचा, । अर्थ ऐसा शमाचा आणि दमाचा । अबाधित. ॥ १३९८ ॥ शम निग्रह चित्ताचा, । ऐसेंही वदे शास्त्रकाराची वाचा, । परी विना चित्तनिग्रह इंद्रियांचा । न घडे निग्रह. ॥ १३९९ ॥ म्हणूनी दम जेथें बोलिला । शम चित्ताचा त्यांत आला, । म्हणूनी निर्णय ऐसाच जाला । शमदमशब्दांचा भागवतीं. ॥ १४०० ॥ स्कधीं एकादशीं उद्धवाच्या । प्रश्नानुरूप याच भगवताची वाचा । बोलिली अर्थ ऐसाच साचा । या श्लोकीं. ॥ १४०१ ॥

श्रीमद्भागवतश्लोक—**शमो मन्निष्ठता बुद्धेर्दम इंद्रियसंयमः ।**
**तितिक्षा दुःखसंमर्षो जिह्वोपस्थजयो धृतिः ॥**

उद्धवातें म्हणे सर्वोत्तम । कीं बुद्धीस माझे ठायीं निष्ठा परम, । त्या निष्ठेतें म्हणावें शम, । आणि दम संयम इंद्रियांचा. ॥ १४०२ ॥ पुढें तितिक्षेचा अर्थ । उत्तरार्धीं वदला समर्थ, । प्रस्तुत शमदमांचा अर्थ हा यथार्थ । भगवद्वचनें सिद्ध जाला. ॥ १४०३ ॥ **दम**शब्दार्थ इंद्रियसंयम, । तो इंद्रियनिग्रह विना चित्ताचा उपशम । न घडे, यालागीं बोलतां दम, । तों **शम**शब्दार्थ आला न बोलताही. ॥ १४०४ ॥ याकारणें प्रस्तुत । गीतेंतही अच्युत । शमापुढें दम बोलतां करी श्रुत । **शम**शब्दें स्वनिष्ठता बुद्धीची. ॥ १४०५ ॥ एवंच ज्याची भगवन्निष्ठ बुद्धी, । त्यातेंचीं ब्राह्मणत्वसिद्धी, । कीं विना ब्रह्मकर्म न घडे समृद्धी । ब्राह्मणत्वाची ब्राह्मणानें. ॥ १४०६ ॥ दुसरें ब्रह्मकर्म । इंद्रियांचा संयम, । ज्यास म्हणावें दम । **तप** तिसरें. ॥ १४०७ ॥ तें सप्तदशीं मागें सात्त्विक । तप[1] कायिक वाचिक मानसिक । बोलिलें, जेथें त्रिगुणभेद

१. अ० १७, श्लो० १४, १५, १६.

अनेक । तपआदिकांचे बोलिले. ॥ १४०८ ॥ आतां शौच द्विप्रकार, । एक बाह्य मृत्तिकाजळें यथाधिकार, । दुसरा शौच चित्त निर्विकार । निर्मळ करावें वैराग्येंकरूनी. ॥ १४०९ ॥ क्षांति म्हणजे क्षमा, । ते आधीं असावी ब्राह्मणोत्तमा, । हें एक अगा! कुरुकुलोत्तमा! । ब्रह्मकर्म. ॥ १४१० ॥ आर्जव म्हणिजे अवक्रता, । सुरळीतपणें वर्तणें, अगा! पांडुसुता! । शब्दांत बुद्धींत वक्रता । नसणें, हें ब्रह्मकर्म. ॥ १४११ ॥ आणि ज्ञानही ब्रह्मकर्म, । कीं, ब्रह्म जाणावें, हा मुख्य धर्म, । सफळ तरीच ब्राह्मणजन्म, । कीं, ब्रह्मज्ञान होय जरी. ॥ १४१२ ॥ आचरोनीही षट्कर्म, । 'आपण कोण,' हें न कळे वर्म, । तरी व्यर्थ सर्व त्याचे धर्म, । जैसें राज्यावीण जिणें राजपुत्राचें. ॥ १४१३ ॥ बैसावें राजसिंहासनीं, । म्हणोनी पुत्र जन्मले रायापासुनी, । त्यांत जे राहिले पदच्युत होउनी, । काय जिणें तयांचें? ॥ १४१४ ॥ ते गजादि यानारूढ जाले, । त्यांच्या दर्शनासी जनही आले, । स्वसुखें तथापि ते न भाले, । पदवी न पावले वंशाची. ॥ १४१५ ॥ तैसा हा उत्तमोत्तम वर्ण, । धनी वेदांचा ब्राह्मण, । अध्ययन अध्यापन दोहींस निपुण, । आणि 'आपण कोण' हें नेणे. ॥ १४१६ ॥ ब्रह्मात्मबोधाचनिमित्त । वेद त्रिकांडही प्रवृत्त, । ऐसें असोनी कर्म दुर्वृत्त । ब्राह्मण होऊनी निंदिती ज्ञानातें. ॥ १४१७ ॥ ते तों अत्यंत अधम, । जे कर्मची म्हणती ब्रह्मकर्म; । ते असोत; इतरही पात्रोनी जन्म । पदच्युत, जे न साधिती अनुभवातें. ॥ १४१८ ॥ असोनी डोळे न दिसे, । अंधकूपीं पडतसे; । वेदवेत्ते जाले तैसे, । संसारकूपीं पडोनियां. ॥ १४१९ ॥ उपजोनी मत्स्यकुळीं । पोहों नेणे जळीं; । तैसा लेखिला कुशळीं । ब्रह्म नेणे तो ब्राह्मण. ॥ १४२० ॥ सिंहाचिया उदरा आला, । आणि गजदंतें चूर्ण जाला; । ब्राह्मणकुळीं उपजला । आणि भवपाशीं पडला तो तैसा. ॥ १४२१ ॥ आतां ज्ञान कर्मातीत । त्यास ब्रह्मकर्म, म्हणे भगवत । कीं, ब्राह्मणजन्मीं करणें हेंची अत्यंत, । कीं, ज्ञान साधावें ब्राह्मणें. ॥ १४२२ ॥ त्या ज्ञानाचे दोन भेद, । व्यतिरेक, अन्वय, बोलती वेद; । त्यांत जडचैतन्य अभेद । विना अन्वय कळेना. ॥ १४२३ ॥ व्यतिरेक म्हणजे वेगळेपण, । त्या व्यतिरेकाचें द्विविध लक्षण, । एक जडनिषेधें ओळखणें चिदात्मपण, । दुसरा व्यतिरेक अधिष्ठानीं विवर्ताचा. ॥ १४२४ ॥ हा दुसरा तेव्हां कळे व्यतिरेक, । कीं, अन्वयें एकीं एकत्वें दिसे अनेक, । परंतु आधीं चैतन्यजडविवेक । होय, तरी तो व्यतिरेक अन्वयें मग कळे. ॥ १४२५ ॥ म्हणूनी जडचैतन्यविवेक । आधीं हाच जाणावा

व्यतिरेक,। मग त्यास त्यांत जें मिथ्या अनेक, । तो व्यतिरेक भिन्नत्वें मग कळेल. ॥ १४२६ ॥ कीं रज्जूस सर्पाचा विटाळ, । हा तों बोलची फटकाळ; । व्यतिरेक सर्पासी सर्वकाळ । सहज रज्जूतें ये रीती. ॥ १४२७ ॥ तथापि भ्रमें सर्प भासतो, । म्हणोनी असत्यास सत्याचाच आश्रय तो, । हें खरें, परंतु हा विचार तेव्हां कळतो, । जेव्हां जडा देहावेगळा कळे आत्मा आपुला. ॥ १४२८ ॥ हें प्रथम ज्ञानाचें लक्षण, । यासही 'व्यतिरेक' म्हणती विचक्षण, । कीं, वेगळा जडदेह, वेगळा आपण, । कळावें आधीं. ॥१४२९॥ या व्यतिरेकेंकरूनी । चिदात्मा आपण, म्हणोनी । ज्ञान जालें, यावरूनी । ज्ञान म्हणावें. याही ज्ञानातें. ॥ १४३० ॥ परंतु जडभाग सारा । उरला प्रकृतीचा पसारा, । त्या चित्समुद्रीं तरंगभागही दुसरा । भिन्न न दिसे, तेव्हां कळलें अद्वैत. ॥ १४३१ ॥ कोणी करिती पांडित्य, । कीं, नश्वर म्हणूनी जडभाग असत्य, । परी जों असत्यांत न दिसे सत्य, । तों द्वैत असत्य कोण म्हणे. ? ॥ १४३२ ॥ तथापि ज्याला आत्मा समजला, । तो 'आपण कोण ?' ऐसें उमजला, । याकारणें ज्ञान त्याला । म्हणावेंच कीं. ॥ १४३३ ॥ म्हणूनी ज्ञान एक । ब्रह्मकर्म बोलिलें, हाही व्यतिरेक, । आतां अन्वयें एकीं अनेक । हें अद्वयज्ञान विज्ञान बोलावें. ॥ १४३४ ॥ '**विज्ञान**'शब्दीं अक्षरें तीनी, । त्यांत प्रथमाचा अर्थ विपरीत म्हणोनी, । **ज्ञान** चिद्वस्तु दों अक्षरीं करूनी, । तिहीं अक्षरांचा अर्थ हा. ॥ १४३५ ॥ चैतन्य ओळखिलें तें ज्ञान, । तें ज्ञान जालिया उपरी जडभान । विपरीत त्या चैतन्यास, कीं, जें अधिष्ठान । विवर्त विपरीतच त्याहुनी. ॥ १४३६ ॥ परी त्या विवर्ती अधिष्ठान । उघड, तैसें जडीं विपरीतीं तें ज्ञान । विपरीत, ऐसें तें विज्ञान, । विपरीता तरंगीं सिंधु जैसा. ॥ १४३७ ॥ परतु आधीं चिदात्मस्वरूप । जडावेगळें कळे अरूप, । तेव्हां त्या जडरूपीं अरूप चिद्रूप । देखावें. ॥ १४३८ ॥ म्हणूनी बोलोनी आधीं ज्ञान, । मग **देव** म्हणतो विज्ञान; । ज्ञान, कीं, चैतन्यास विपरीत जडभान । तेंही ज्ञानची ऐसें जाणावें. ॥१४३९॥ चैतन्यास विपरीत जड । त्यांत चैतन्य देखावें उघड, । यास शास्त्रकार सुघड । **विज्ञान** म्हणती. ॥१४४०॥ कीं सुवर्णास विपरीत आकार, । जे दिसती नाना अलंकार, । तें अवघें सोनेंची, एतत्प्रकार । ज्ञान तें विज्ञान बोलावें. ॥ १४४१ ॥ कीं नग नश्वर असत्य, । सोनें नित्य सत्य, । परी अनित्य असत्यांत नित्य सत्य । उघडें एकत्वें दिसतसे. ॥ १४४२ ॥ ऐसीं भूतें चराचरें । असत्यें जडें आणि नश्वरें, ।

१. 'आशय' असा पाठ आढळतो.

त्यांविपरीतीं जें चैतन्य उघडें खरें । तें एकत्वें जाणणें विज्ञान. ॥ १४४३ ॥ ज्या चैतन्याचे आश्रयें नाना । मनें केली कल्पना, । त्यावीण कांहीं दिसेना असेना, । तेव्हां तेंची हें विज्ञान. ॥ १४४४ ॥ निजेला स्वप्नीं मनीं । स्वप्नेंची नानाकार होउनीं, । त्यांत एक शरीर आपण मानुनी, । भय अभय मानी आपणची आपण. ॥ १४४५ ॥ कीं आपणची स्वप्न सारें, । आपलेंची मन व्याघ्रचोरादिआकारें । भय दाखवी, आणि निर्भय करी शरीरें । साधुसंतांचीं होउनी. ॥ १४४६ ॥ जागा होतां, तें विपरीत । मीच कीं म्हणे निश्चित, । विज्ञान या ज्ञानाचें नांव उचित, । विज्ञान अन्वयज्ञान हें ऐसें. ॥ १४४७ ॥ एवं ज्ञानस्वरूपीं विवर्ताचें भान, । त्याचें अधिष्ठान त्या भानासी ज्ञान, । त्यास म्हणावें विज्ञान, । हें ब्रह्मकर्म. ॥ १४४८ ॥ म्हणजे जो ब्राह्मण, । त्याणें व्हावें ऐसें निपुण, । कीं आत्मयास जड विपरीत मायागुण, । त्यांत अधिष्ठान दिसे. ॥ १४४९ ॥ आतां ऐसा अनुभवप्रकार । नसे, तरी अद्वैतसंस्कार । शास्त्रश्रवणें यथाधिकार । जोडावा आस्तिकपणेंकरूनी. ॥ १४५० ॥ या भावेंकरूनी । ब्रह्मकर्म **आस्तिक्य** म्हणोनी, । ज्ञान विज्ञान बोलोनी, । मग आस्तिक्य म्हणतसे. ॥ १४५१ ॥ अर्थ आस्तिक्याचा ये रीती, । कीं शास्त्रें जें जें बोलती, । त्या गोष्टी जरी अनुभवा न येती, । तरी विश्वास तेथें असावा. ॥ १४५२ ॥ प्रथम चार्वाकांचें नास्तिक्य । टाकूनी, परलोक मानणें आस्तिक्य; । मग भेद नास्तिक्य टाकूनी. ऐक्य । जडचैतन्याचें मानणें हें दुसरें. ॥ १४५३ ॥ प्रत्यक्ष न दिसे परलोक, । न मानिती यालागीं चार्वाक; । ऐक्य न कळोनी, जाले नास्तिक । भेदवादी. ॥ १४५४ ॥ चार्वाकमतें प्रत्यक्ष एक, । कैचें पुण्य? कैचें पातक? । कैचा परलोक? म्हणती नास्तिक, । प्रथम नास्तिक्य हें नसावें. ॥ १४५५ ॥ परंतु चार्वाकादिक । खंडावया प्रवर्तला **तर्क**, । त्या तार्किका दिवांधा[1] अद्वैतअर्क[2] । आस्तिक्यदृष्टीं दिसेना. ॥ १४५६ ॥ तैसेच कर्ममीमांसक । जरी मानिती वेद परलोक, । तथापि दूषिती मोक्षकारक । अद्वैतशास्त्र सांक्षेपें[3]. ॥ १४५७ ॥ वेद बोले अद्वैत, । ते म्हणती खरें द्वैत, । एवंच इत्यादिकही निश्चित । नास्तिक म्हणावे. ॥ १४५८ ॥ चार्वाक प्रत्यक्षावेगळें । नाहीं म्हणती अदृष्टफळें; । तैसें न अंगीकारिती तर्कबळें । भेदवादी अद्वैतशास्त्र. ॥ १४५९ ॥ प्रत्यक्ष चार्वाकां प्रमाण जैसें, । द्वैतवादियां द्वैत तैसें, । नास्तिकत्वाचें यांसही पिसें, । प्रत्यक्ष

१. घुबडाना. २. अद्वैतज्ञानरूपी सूर्य. 'अद्वैततर्क' असा पाठ आढळतो. ३. नेटानें, आग्रहानें.

द्वैतेंची वेदोक्त अद्वैतीं. ॥ १४६० ॥ चार्वाक जाणती प्रत्यक्ष, । हेही जाणोनी प्रत्यक्ष दक्ष, । परलोक चार्वाकां परोक्ष, । अपरोक्ष परोक्ष या सकळां. ॥ १४६१ ॥ युक्तीस न मिळे परलोक, । नास्तिक तेथें चार्वाक; । तैसेच भेदवादी नास्तिक । अद्वैतयुक्त ते न कळतां. ॥ १४६२ ॥ प्रस्तुत सांगतां ब्रह्मकर्म, । आस्तिक्य म्हणे ब्राह्मणधर्म, । येथें बोलिलें असतीं हें वर्म, । तरी चार्वाकमतविलक्षणत्व बोलावें. ॥ १४६३ ॥ येथें शमदमादि साधन, । ज्ञानविज्ञान कैवल्यधन, । हें भेदवादियांचें नास्तिक्यखंडन । आस्तिक्य देवें बोलिलें. ॥ १४६४ ॥ कीं ज्ञानविज्ञानीं अधिकार । नसेल, तरी अद्वैतसंस्कार. । जोडावा, कीं, जैसा अद्वयप्रकार । वेदीं बोलिला, तो सत्यत्वें मानावा. ॥ १४६५ ॥ सर्वथा अपेक्षावा मोक्ष, । परी ईश्वरप्रसादेंची तत्त्व होय अपरोक्ष, । तदर्थ शास्त्रश्रवण परोक्ष । संतमुखें करावें. ॥१४६६॥ त्यांत जें युक्तीस मिळे, । तें गिळावेंची जोंवरी गिळे, । जें अत्यंत अकळ न कळे, । तें म्हणावें कळेल गुरुसेवेनें. ॥ १४६७ ॥ कीं बोलती श्रुती, । जे गुरूची भक्ति करिती, । त्यांतें ते ते अर्थ प्रकाशती, । जे जे उपदेशिले गुरूनें. ॥ १४६८ ॥ तोंवरी शास्त्रीं अद्वैत, । जें बोलिलें वेदविहित, । तें सत्य तैसेंची निश्चित, । आस्तिक्य ऐसें असावें. ॥ १४६९ ॥ कीं हृदयग्रंथि सुटती, । संशय अवघे तुटती, । तेव्हां, कीं, जेव्हां आत्मा दिसेल, ऐसें श्रुती । बोलती हाका मारूनी. ॥ १४७० ॥

श्रुती—भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ।
क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥

हृदय म्हणजे अंतःकरण, । त्यास आत्मचैतन्यें स्फुरे आत्मपण, । चुंबकशिळेकरितां[1] भ्रमण । लोखंडातें जे रीती. ॥ १४७१ ॥ तें हृदय अंतःकरण, । त्यास चैतन्य येतां सचेतनपण, । त्यापासूनी उठतें स्फुरण, । 'देह आत्मा' म्हणोनी. ॥ १४७२ ॥ येथें 'मी देह' ऐसा अहंकार, । तो हृदयग्रंथिरूप विकार, । जडचैतन्यग्रंथीं एतत्प्रकार । हृदयग्रंथि अज्ञानेंकरूनी. ॥ १४७३ ॥ या हृदयग्रंथीचा भेद होतो, । जेव्हां आत्मा जडावेगळा समजतो, । आणि तो परावर जेव्हां दिसतो, । तेव्हां संशय सर्व तुटती. ॥ १४७४ ॥ ब्रह्मादि थोर थोर, । ते म्हणावे पर; । आणि सूक्ष्म देह ते अवर, । मशकपिपीलिकादि. ॥ १४७५ ॥ जडभेद ऐसे अनेक, । सर्वही आत्माच एक, । ऐसा

१. लोहचुंबकाच्या गोळ्यानें.

आत्मा देखतां, अभिषेक । पूर्णत्वाचा जेधवां, ॥ १४७६ ॥ तेव्हां तुटती सर्वही संशय, । कीं, तत्त्व कळलें अद्वय, । सर्वां कर्मांचा तेव्हां क्षय, । श्रुति म्हणे. ॥ १४७७ ॥ प्रस्तुनीं श्रुति उपयोगी । या प्रसंगीं याचिलागीं, । कीं, निःसंशय ज्ञानयोगी । आत्मसाक्षात्कारें होतसे. ॥ १४७८ ॥ तोंपर्यंत वेद । आणि पुराणें बोलती अभेद, । स्थळस्थळीं निषेधिती भेद, । आस्तिक्य तेथें असावें. ॥ १४७९ ॥ जगीं नाना शास्त्रभेद, । प्रसिद्ध जितके वेद, । त्यांत कोठेही सत्यभेद । श्रुति ऐसी न आढळे. ॥ १४८० ॥ म्हणूनी, भेदमती । कल्पूनी लिहिल्या श्रुती, । "सत्यं भिदा सत्यं भिदा" म्हणती, । त्या न पुस्तकीं न पाठ वेदशाखापाठकां. ॥ १४८१ ॥ खरें मानावया ऐक्य, । धरावया अद्वैतीं आस्तिक्य, । आणि समजावया भेदमतनास्तिक्य, । हेतु जाल्या श्रुति कल्पितांही. ॥ १४८२ ॥ कीं सत्य आहे अभेद, । तरी सर्वत्र अद्वैतच बोलती वेद, । जरी वेदीं कोठेंही असता भेद, । तरी कां श्रुति कल्पिते? ॥ १४८३ ॥ ऐसें भेदवादियांचें जें नास्तिक्य, । तेंच अद्वैत उपजवी आस्तिक्य, । आतां न सांपडे हुडकितां त्रैलोक्य । जोडा अभाग्यां नास्तिकां. ॥ १४८४ ॥ एवं सर्वथा हें अद्वैत खरें, । ऐसें अंगीकारावें आदरें, । श्रवणाचें मनन करितांही वरें, । राहेच कांहीं संशय; ॥ १४८५ ॥ ते सर्वही संशय । साक्षात्कारें हरतील. ऐसा असावा हा निश्चय, । सिद्धांतें ऐसा निर्णय । देव आस्तिक्यशब्दें सुचवी.॥ १४८६ ॥ हें मुख्य ब्रह्मकर्म, । एवंच थोर हा ब्राह्मण्यधर्म, । कीं, शमदमादि साधनीं ब्रह्म । जाणावें ज्ञानें-विज्ञानेंकरूनी. ॥ १४८७ ॥ तें कळे, तोंपर्यंत । आस्तिक्य असावें, म्हणे भगवंत, । ब्रह्मकर्म हेंच अत्यंत; । षट्कर्म तों निपट पहिली पायरी.॥१४८८॥ ब्रह्मकर्म म्हणतां वेदाध्ययन, । न बोलतां बोलिलें; जसें उपनयन, । तैसें शमदमादि ब्रह्मकर्म बोले पद्मनयन, । त्यांत षट्कर्में न बोलतां बोलिलीं. ॥ १४८९ ॥ कीं विनाउपनयन । ब्राह्मण्य नसतां, कैचें अध्ययन ? । शमदमादि बोले शेषशयन । ब्रह्मकर्म या भावें. ॥ १४९० ॥ कीं षट्कर्में आचरे तोची ब्राह्मण; । त्या ब्राह्मणाचें हें ब्रह्मकर्मपण, । अन्यथा विनाषट्-कर्माचरण । ब्राह्मण्य कैचें? ॥ १४९१ ॥ यांत कोणी पूर्वींच जन्मजन्म । ज्ञानकारणेंकरूनी श्रम । शुद्धचित्त ज्ञानाधिकारी, तेच परम । उपजत शमद-मादि आचरती. ॥ १४९२ ॥ ते ज्ञान विज्ञान पावती, । अद्वैत आत्मा अनुभविती, । ते अत्यंत आदर न धरिती, । यथाशक्ति करितीही षट्कर्में.

॥ १४९३ ॥ ब्रह्मीं गीताही बोलते, । कीं, "शब्दब्रह्मातिवर्तते", । जैसा योगभ्रष्ट, तैसेच ते, । ते जन्मांतरीं शुद्धचित्त; ॥ १४९४ ॥ जे जन्मांतरीं शुद्धचित्त, । यत्न करिती अनुभवाचनिमित्त; । यजन, याजन, अध्ययन, अध्यापनादि वृत्त । न करिती अत्यंत आदरें. ॥ १४९५ ॥ त्यास मुख्य ब्रह्मकर्म, । कीं, ज्ञानें विज्ञानें अनुभवावें ब्रह्म; । तदर्थ शौच, तप, शम, दम, । आचरावें. ॥ १४९६ ॥ म्हणूनी सुचवूनी ज्ञानाचें मुख्यत्व, । येथें वर्णिलें ब्राह्मणत्व, । कीं ज्या गोष्टीनें सांपडे आत्मत्व । अवलंबावी तेच गोष्टी. ॥ १४९७ ॥ आतां ब्राह्मणकुळीं जे उपजती, । तिंहीं वर्णसार्थक करावें ये रीती, । म्हणूनी बोलती श्रुती, । ब्रह्मीं होती त्या श्रुती प्रकट. ॥ १४९८ ॥ हांडा धनाचा निघे जेथुनी, । धन निघालें म्हणावें ते भूमीचपासूनी, । भाव ऐसा हृदयीं धरूनी, । म्हणे भगवंत, कीं, हें स्वभावजनित. ॥ १४९९ ॥ ब्रह्मीं वस्तुस्वभाव, । कीं, व्हावाच मायाप्रादुर्भाव, । तिच्या पोटीं हे सर्वेही भाव, । त्यांत हे वर्णधर्मही. ॥ १५०० ॥ एवं वेद जेव्हां प्रकटती, । वर्णधर्म तेव्हां प्रकट होती, । ब्रह्मीं अनादि प्रवाह ये रीती । हा सहज ब्रह्मस्वभाव. ॥ १५०१ ॥ एवंच ब्रह्म जैसें अनादि, । तसे ब्राह्मण आणि कर्म शमदमादि । हेंही अनादि, ऐसें उपपादी, । म्हणतां स्वभावजनित हें. ॥ १५०२ ॥ आतां हे वर्णधर्म एतदर्थ । देव बोले, कीं, स्वधर्म आचरो पार्थ, । तो क्षत्रियांचा धर्म आतां समर्थ । बोलतसे या श्लोकीं. ॥ १५०३ ॥

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥**

**शौर्य** म्हणजे पराक्रम, । युद्धीं करावा विक्रम, । **तेज** म्हणजे आक्रम । प्रौढत्वाचा. ॥ १५०४ ॥ कीं शौर्य असोनीही दृढ, । दिसे भ्याड, न दिसे रणप्रौढ, । तैसें नसावें क्षत्रियें, हा भाव गूढ । तेज म्हणतां दाविला. ॥ १५०५ ॥ हृदय शत्रूचें फुटे, । आशा जीवित्वाची तुटे, । दृष्टि देखतांच कांप उठे, । तेज ऐसें असावें, हा भाव. ॥ १५०६ ॥ आतां **धृति**शब्दें धैर्य, । तें तों सिद्ध जालेंच, म्हणतां शौर्य; । एवंच **धृति**शब्दें यदुवर्य । धारणा बोले ये स्थळीं. ॥ १५०७ ॥ धरूनी राहे मती । ज्या ज्या गोष्टीची स्मृती, । ते स्मृतीतें **धारणा** म्हणती, । हा अर्थ मागेंही निवडला. ॥ १५०८ ॥ त्यांत क्षत्रियांची धारणा ये रीती, । कीं, झोटेधरणीं होतांही मती, । धारणा राखे ये

१. अ० ६ श्लो० ४३. २. केसांस धरून केलेल्या मल्लयुद्धीं.

रीती, । कीं, स्फुरे हननक्रिया प्रतिक्रिया. ॥ १५०९ ॥ कीं ¹मांडतां घेऊन दंड । कौशल्य जाणे उदंड, । झळकतां खड्ग प्रचंड । कांहींच नाठवे ते विद्या. ॥ १५१० ॥ न स्फुरे हननक्रिया, । अथवा न स्फुरे प्रतिक्रिया, । धारणा तैथें क्षत्रियां । असावी अगत्य. ॥१५११॥ इत्यादि युद्धक्रिया, । आणि परकृत्याच्या प्रतिक्रिया, । धारणा या गोष्टीची क्षत्रिया । असावी, हे धृती. ॥ १५१२ ॥ आतां दक्ष शब्दाचा विचार, । आपण थोडे, शत्रु फार, । तेथें करितां कोण प्रकार । जय पाविजे, हें जाणे. ॥ १५१३ ॥ भिंती कोटाची मोटी । पाडी बैसोनी तिच्या पोटीं, । त्या गोळियासारिखे कोटी । पाषाण ज्या भिंतींत. ॥ १५१४ ॥ शत्रु फार, आपण थोडे, । भार त्यांचा ²ज्या रीतीनें मोडे, । दक्षता ऐसी जोडे, । तो क्षात्रधर्म. ॥ १५१५ ॥ भेदू जाणे व्यूहरचना, । करूं जाणे व्यूहाची कल्पना, । घेऊं जाणे दुर्ग नाना, । दक्ष इत्यादि गोष्टीस. ॥ १५१६ ॥ आणि युद्धीं न करणें पलायन । म्हणे क्षत्रियातें शेषशयन, । कटाक्षयुक्त नयन । दावी, ऐसें बोलतां. ॥ १५१७ ॥ कीं द्वितीयाध्यायीं अर्जुन । म्हणे, 'करीन भिक्षाटण, । परी मारूनी हे स्वजन, । राज्य नेघे'. ॥ १५१८ ॥ तो शब्द त्याचा आठवूनी, । हें पलायन नव्हे काय ? म्हणोनी । भाव दावी म्हणावें कीं याचवरूनी । वर्णी धर्मप्रसग. ॥१५१९॥ यावरूनी हा भाव । दावी म्हणावा देवाधिदेव, । भाव कांहीं आणीकही-स्तव । शब्दप्रयोगें सुचवी. ॥ १५२० ॥ कीं न पळतां उदंड युद्धीं मरती, । परंतु याचक देखतां भिती, । ऐसे नेणों किती । या जगीं शूर ? ॥ १५२१ ॥ तरी युद्धीं देखोनी अमित्र, । आणि याचक देखोनी सर्वत्र, । पाठी न दे, तोची पवित्र । क्षत्रियोत्तम जाणावा. ॥ १५२२ ॥ ऐसा अत्यंत गूढभाव । हृदयीं धरोनी देव । **'युद्धे चापि'** म्हणूनी वासुदेव । चकारें अपिशब्दें सुचवी. ॥ १५२३ ॥ कीं युद्धीं नये पळों, । याचक देखतांही नये टळों, । एवंच कृपणत्वातें नये आतळों, । ऐसें **'युद्धे चापि'** म्हणतां सुचवी. ॥ १५२४ ॥ **'अपि च'** म्हणिजे आणिकेही स्थळीं । पाठी ³नेदावी क्षत्रियकुळीं । शौर्य औदार्य दोहीं बळीं । जो बळवंत, तो क्षत्रिय. ॥ १५२५ ॥ आतां याचकातें नेदी पाठी । क्षात्रधर्मपरिपालनासाठीं, । यावेगळी न सोडी गांठी । गांठोडीची धनाच्या. ॥ १५२६ ॥ त्यासही क्षात्रधर्माचा नसे मान, । म्हणूनी दान बोले जगन्निधान, । जो देतसे सर्वस्व दान, । आणि दे आत्मत्वही यदुवीर

१. उलटसुलट डावपेंच. २. डावपेंच, व त्याची तोड. ३. न द्यावी.

भक्तांतें. ॥ १५२७ ॥ प्रस्तुत तो जगन्निधान । करी अर्जुनास आत्मदान, । त्याचें पाहतां निदान । भक्ति अर्जुनाची. ॥ १५२८ ॥ आतां ऐसा आत्मप्रद गुरु होउनी, । ईश्वर एक आपण म्हणोनी, । करी गीता उपदेश ये रीतीकरूनी । सत्त्ववृत्ति या भक्तिभावें. ॥१५२९॥ तो आपले ठायीं भाव । दृढ धरावा, म्हणूनी देव । क्षत्रियातें म्हणे देवाधिदेव । ईश्वरभावंही असावा. ॥ १५३० ॥ कीं ईश्वर आपण, । तरी स्वचरणीं तुवां दृढपण । करावें, या भावाचें ऐसें निरूपण । ईश्वरभाव म्हणतां सुचवी. ॥ १५३१ ॥ तरी नुसतीच भक्ती, । आणि अद्वैतभावाची नसे अभिव्यक्ती, । तेव्हां आत्मत्व आवडीची अनुरक्ती । नसतां, अलवणी[1] भक्ति ते. ॥ १५३२ ॥ कीं, स्त्री, पुत्र, गृह, वित्त, । प्रिय सर्वेही ज्यानिमित्त, । तोची प्रिय आत्मा निर्निमित्त, । भक्ति मुख्य तो कळतां. ॥ १५३३ ॥ एवंच आत्मज्ञान । त्या भक्तीचें निदान, । तेंही असावें, म्हणे जगज्जीवन । चकारेंकरूनी. ॥ १५३४ ॥ 'ईश्वरभावश्च' म्हणोनी, । येथें या चकारेंकरूनी । आत्मज्ञानही बोले सुचवुनी । ज्ञानप्रद गुरु अर्जुनाचा आणि सर्वांचा. ॥ १५३५ ॥ हें स्वभावजनित । अनादि क्षात्र-कर्म, म्हणे अच्युत, । कीं, आतां काय बोलोनी बहुत, । युद्धही करीं, मोक्ष साधीं, भाव ऐसा. ॥१५३६॥ आतां प्रसंगसंगती । वैश्यशूद्रकर्मही श्रीपती । सांगतसे अर्जुनाप्रती । या श्लोकीं. ॥ १५३७ ॥

**कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥**

**कृषि** म्हणजे शेत करणें, । आणि गौळी होऊनी गाई पाळणें, । आणि **वाणिज्य** धन मेळवणें । क्रयविक्रय करूनी; ॥ १५३८ ॥ हें वैश्यकर्म, । हेंही स्वभावजनित परम, । अनादि जसें ब्रह्म, । तैसें तेथूनी वस्तुस्वभावें हें उपजे. ॥ १५३९ ॥ ऐसेंच शूद्राचें कर्म, । सेवा वर्णत्रयाची हा धर्म, । हेंही म्हणे पुरुषोत्तम । स्वभावसंभव म्हणोनी. ॥ १५४० ॥ या दों वर्णांस देव । नाहीं बोलिला ईश्वरभाव, । कीं, हे राजस तामस स्वभाव, । परमार्थ यांस बहु दूरी. ॥ १५४१ ॥ परंतु नवमाध्यायांत । "मामुपाश्रित्य कौंतेय"[2] या श्लोकीं भगवंत । म्हणे, 'स्त्रिया, वैश्य शूद्रही, अत्यंत । परमगति पावती माझ्या आश्रयें.' ॥ १५४२ ॥ "किं[3] पुनर्ब्राह्मणाः पुण्या" या श्लोकीं । म्हणे जे तरती स्वभक्तीनें या लोकीं, । त्यांत ब्राह्मणराजर्षि यांचें नवल नाहीं,

---

१. अळणी, नीरस. २. अ० ९, श्लो० ३२. ३. अ० ९, श्लो० ३३.

कीं । तरती स्त्रीवैश्यशूद्रपर्यंत. ॥ १५४३ ॥ परंतु दुर्लभ हरिभक्ति यांतें । राजसतामसां वैश्यशूद्रांतें, । तेही तरती भजतां मातें, । ऐसें नवमीं बोलिला. ॥ १५४४ ॥ तदनुरूप प्रस्तुत । ब्राह्मणक्षत्रियांतें अच्युत । म्हणे परमार्थ अत्यंत विहित, । कीं, कर्मच तें तयांचें. ॥ १५४५ ॥ म्हणूनी ब्राह्मणक्षत्रियां ईश्वरभाव । स्वकर्म बोलिला देव, । तैसा न बोले देवाधिदेव । परमार्थ वैश्यांशूद्रांतें, ॥ १५४६ ॥ कीं, परमार्थ दूरी यांला, । तथापि सत्संगें स्वभक्ति ज्यांला, । परमार्थ जोडे त्यांला । ब्राह्मणक्षत्रियांचसारिखा. ॥ १५४७ ॥ म्हणूनी सर्ववर्णांसगट । परमपदलाभ उत्कट । होय ऐसें पीतपट[1] । आतां बोलतो या श्लोकीं. ॥ १५४८ ॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**

**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥ ४५ ॥**

अगा! आपल्या आपल्या कर्मीं रत । पुरुष संसिद्धि पावतो निश्चित, । तरी आता कैसा स्वधर्मनिष्ठित । सम्यक् सिद्धि पावतो? तें आइक या श्लोकीं. ॥ १५४९ ॥

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**

**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥ ४६ ॥**

ज्यापासूनी भूतांची प्रवृत्ती, । म्हणजे, सर्वभूतें ज्यापासूनी होती, । आद्य चिदंशें कर्मीं प्रवर्तती, । तेच त्यापासाव प्रवृत्ति, अर्थ ऐसा. ॥ १५५० ॥ आणि ज्याणें हें सकळ । व्यापिलें, जो उपादान या जगाचें केवळ, । व्यापक मृत्तिका, तंतु, जळ, । घटीं, पटीं, तरंगीं, जे रीती. ॥ १५५१ ॥ स्ववर्णोचित कर्में करूनी, । त्या कर्में तया ईश्वरातें अर्चुनी, । सिद्धि पावतो मानव, म्हणोनी । देव म्हणे. ॥१५५२॥ अर्थ ऐसा याचा, । कीं, जीव आणि देहही जयाचा, । भूतें वर्तवी अंश त्याचा, । माया त्याचें शरीर. ॥ १५५३ ॥ तें सबाह्यांतर शरीर । व्यापिलें त्याणें, जेंवी नीर । व्यापी तरंग, तैसा ईश्वर । भनी कारण सर्वांचा. ॥ १५५४॥ ज्याच्या भूमीवरी असावें, । ज्या भूपतीच्या आश्रयें वसावें, । त्याच्या आज्ञेनें उठावें, बसावे, । तेची पूजा तयाची.॥१५५५॥ जो राजाज्ञा मानूनी वर्तती, । तो स्वगृहीं सुखी असतो, । दंड चुकतो, आणि होतो । कृपापात्र. ॥१५५६॥ एवंच जो सर्व भूतवृंद । चेतवी, व्यापी, श्रीमुकुंद; । स्वकर्में त्याचे चरणारविंद । अर्चूनी सिद्धि मानव पावतो. ॥ १५५७॥

---

१. पीतांबरधारी कृष्ण.

स्वकर्में त्याचें अर्चन । मोक्षदायक हेंच भजन, । त्याचें तत्त्व हाच भवभंजन । तृतीयांत, नवमांत, अन्यत्रही बोलिला. ॥१५५८॥"यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र"[1] । या श्लोकीं म्हणे कमलनेत्र, । 'जें विष्णूस अर्पिलें, तेंच एक पवित्र । बंधक नव्हे. ॥ १५५९ ॥ नवमीं "यत्करोषि यदश्नासि"[2] । या श्लोकीं म्हणे अर्जुनासी, । कीं, 'समर्पी मज जगन्निवासीं । लौकिक वैदिक कर्ममात्र. ॥ १५६० ॥ नवमीं यापुढें दुसरा श्लोक । "शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे"[3] म्हणे उत्तमश्लोक, । एवं गीतेंत कर्मकांडसिद्धांत एक, । कीं, कर्म ईश्वरार्पण करावें. ॥ १५६१ ॥ त्या क्रियमाणें नव्हे बंध, । आणि होतां ईश्वरकृपासंबंध । ज्ञान होय, मग नुरे गंध । पूर्वसंचिता कर्माचा. ॥ १५६२ ॥ भोगें प्रारब्धाचा क्षय, । ऐसा सकळ शास्त्रांचा निर्णय, । याकारणें रुक्मिणीप्रिय । कर्म समर्पण म्हणे करावें आपणातें. ॥ १५६३ ॥ हें मोक्षाचें द्वार, । प्रस्तुत श्लोकीं तोच प्रकार । बोले, कीं, स्वकर्में सर्वेश्वर । अर्चूनी सिद्धि मानव पावतो. ॥ १५६४ ॥ आणि तोची जाणावा मानव, । अन्यथा पशु, राक्षस, दानव, । जो स्वकर्मेंकरूनी देवाधिदेव । न अर्चून सिद्धीतें पावेना. ॥ १५६५ ॥ सिद्धि ते मुक्ती, । तीस साधन भक्ती, । ते भगवच्चरणीं अनुरक्ती । उपजे स्वकर्में अर्पितां. ॥ १५६६ ॥ तेव्हां होय अद्वयज्ञान, । कळे सर्वां भूतांचें अधिष्ठान, । आणि ज्याच्या अंशें भूतांस जीवन, । तोची अधिष्ठान या त्रिवर्तांचें. ॥ १५६७ ॥ ज्ञान ऐसें अद्वय । स्वकर्में ज्यास अर्पितां होय, । तोची सर्वात्मा जगन्मय । पूजितां, पूज्य कळतो, हें सुचवी. ॥ १५६८ ॥ कीं ज्यापासूनी भूतांची प्रवृत्ती, । आणि ज्याणें व्यापिली हे जगदाकृती, । स्वकर्में अर्चूनी त्यातें अपुनरावृत्ती । मानव पावतो. ॥ १५६९ ॥ वेदीं द्विविध । बोलती अद्वैतबोध, । त्यांत 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्यें शोध । जीवेश्वराच्या ऐक्याचा. ॥ १५७० ॥ निरसतां उपाधिद्वय, । उरे कूटस्थ अद्वय, । तो चिदंश माया उपाधिमय । जीवत्वीं ईश्वरत्वीं. ॥ १५७१ ॥ दुसरें जडभाग आणि ब्रह्म, । यांचें अद्वैत बोले निगम । "सर्वं खल्विदं ब्रह्म" । इत्यादि. ॥ १५७२ ॥ या दोहीं ऐक्यांचा अनुभव । तो सिद्धि पावतो म्हणे मानव, । स्वकर्में अर्चितां ज्यास, तो देव । ज्ञेय या दोहीं ऐक्यांचा. ॥ १५७३ ॥ या भावें ज्यापासुनी । म्हणे प्रवृत्ति सर्वां भूतांची म्हणोनी, । कीं, त्याच्या चिदंशेंकरूनी । प्रवर्तती सर्व भूतें. ॥ १५७४ ॥

---

१. अ० ३. श्लो० ९. २. अ० ९, श्लो० २७. ३. अ० ९, श्लो० २८.

आणि ज्याणें हें व्यापिलें, । त्यातें अर्चूनी सिद्धि पावतो, ऐसें बोलिलें, । यांत जडैक्यही सुचविलें, । कीं, कार्य कारण व्यापकत्वींची एकत्व. ॥१५७५॥ व्यापक माती घटीं, । व्यापक तंतु जैसा पटीं, । ऐसे दृष्टांत कोटिकोटी । व्यापकत्वींच एकत्व. ॥ १५७६ ॥ एवं स्ववर्णोचित स्वकर्म । ऐसें ईश्वरातें अर्पणें स्वधर्म, । म्हणतां, तोची तत्प्रसादें जाणावा, हें वर्म । सुचविलें ये स्थळीं. ॥ १५७७ ॥ ऐसें ईश्वरार्पणें स्वकर्म । करावें, म्हणे सर्वोत्तम, । तों कांहीं एक बुद्धिभ्रम । उरला देखिला अर्जुनाचा. ॥ १५७८ ॥ कीं, स्वकर्म न दिसे बरें, । तरी इतर वर्णांचें आदरें । अंगीकारोनी नरें । कां न पूजावा ईश तो? ॥ १५७९ ॥ कीं मुख्यत्व ईश्वरभजनीं, । तेव्हां तो भलतिया उत्तम कर्मेंकरूनी । अर्चितां, अत्यंतच उत्तम, म्हणोनी । अर्जुनातें वाटलें. ॥ १५८० ॥ यावरूनी याचा परिहार, । स्वकर्मेंची पूजावा ईश्वर, । म्हणूनी ऐसें यानंतर । बोलतसे दों श्लोकीं. ॥ १५८१ ॥

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥

अगा! जरी स्वधर्म कांहीं । गुणहीन तो बरासा दिसत नाहीं, । आणि परधर्म बरा अनुष्ठितांही, । तरी श्रेय गुणहीन आपलाच आपणा. ॥१५८२॥ आपल्या कर्मी दोषही वसे, । तथापि तेंच करितां बरें दिसे, । कर्ता तो दोषही पावत नसे, । ज्याचें कर्म कांहीं दोषयुक्त. ॥ १५८३ ॥ आणि अहीं जो वस्तुस्वभाव, । तेथूनी हे नियतकर्माचे भाव, । हें मागेंही देवाधिदेव । स्वभावशब्दें चारी धर्म बोलिला. ॥ १५८४ ॥ एवंच अनादिसिद्ध । क्षात्रधर्म हिंसामय प्रसिद्ध, । तथापि पूर्वोक्त अर्पणविधीनें बद्ध । तूं क्षत्रिय नव्हसी, भाव ऐसा. ॥ १५८५ ॥ कीं, ज्यापासूनी हें जग, । सिंधूपासूनी जैसे तरंग, । त्याचीच आज्ञा जालिया, मग । किल्बिष त्या कर्मे कोण पावे? ॥ १५८६ ॥ बोलोनी काय आतां उदंड? । परश्वान मारितां राजदंड, । राजाज्ञेनें राजपुत्र प्रचंड । मारितां अपराध लागेना. ॥ १५८७ ॥ या भावें म्हणे अच्युत, । कीं, सदोषही जें स्वभावनियत, । अधिष्ठानस्वभावें जें ज्यास निर्मित, । तें करितां, कर्ता किल्बिष पावेना. ॥ १५८८ ॥ अर्थ ऐसा जाला, । परंतु संदेहास ठाव इतका राहिला, । कीं, स्वकर्म ज्याची आज्ञा, तो बोलिला । सगुण सर्वेश्वर. ॥ १५८९ ॥ आणि ज्या अधिष्ठानस्वभावें । कर्म उपजलें म्हणावें, । तें तों निर्गुणची जाणावें; । तेव्हां पूजा सगुणाची

आज्ञा हें न घडे. ॥ १५९० ॥ श्रोते ऐसें म्हणती, । तरी निर्गुणची सगुण विश्वपती, । सगुणही अधिष्ठान म्हणती श्रुती । 'अपाणिपाद अचक्षु पाहे,' म्हणोनी. ॥ १५९१ ॥ कीं, आपण निर्गुण । हेही वृत्ति मायागुण, । त्या वृत्तीपलीकडे त्याची ऐसी खूण, । कीं, त्या वृत्तीचेंही प्रकाशक तें. ॥१५९२॥ वृत्तिप्रकाशक निर्गुण, । तें आपण ऐसें अखंड स्फुरण, । त्या अखंडानुभवातें म्हणावें सगुण, । तेव्हां अधिष्ठानची सगुण तें. ॥ १५९३ ॥ कीं आपण अधिष्ठान, । हें अखंड वृत्तिज्ञान, । तेव्हां कारण जगाचें उपादान । सगुणची साक्षी. ॥ १५९४ ॥ यालागीं कर्मप्रादुर्भाव । हा बोलिला वस्तुस्वभाव, । तेंची निर्गुण, तेंची सगुण, येथें ठाव । न दिसे सर्वथा संशयातें. ॥ १५९५ ॥ असो तें. आतां हें आयकोनी पार्थ । मानिता जाला यथार्थ, । परंतु ठाव उरला खेदार्थ । तो ऐसा. ॥ १५९६ ॥ कीं, आज्ञा समर्थाची । शिरीं धरावी, हे नीति साची; । परी क्रिया क्षत्रियांची । वाईट निपट. ॥ १५९७ ॥ बरें वाईट कर्मे दोनी । समर्थे करूं सांगितलीं म्हणोनी, । करावी परी उत्तम क्रिया देखोनी, । खेद उपजेच वाईट आचरे तयातें. ॥ १५९८ ॥ सुगंध कर्मी एक लाविला, । दुर्गंध एका हातीं टाकविला, । दोघीं मान्य केलें त्या बोला, । परी खेद मानी त्यांत एक. ॥ १५९९ ॥ तैसें ईश्वरें आपुलें । क्षात्रकर्म वाईट निर्माण केलें, । तें अगत्यास करणें लागलें । टाकितां नये. ॥ १६०० ॥ ऐसा अर्जुनाचा भाव । जाणोनी, सर्वसाक्षी देव । खेद त्याचा हरे ऐसा स्वयमेव । हेतुपूर्वक बोलतो या श्लोकीं. ॥ १६०१ ॥

**सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।**
**सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥**

जें सहज कर्म, कौंतेया! । म्हणजे वर्णासह उपजलें, तया । न टाकावें, अगा! कुंतीतनया! । सदोष असे तें जरी. ॥ १६०२ ॥ परंतु कर्म एकाचें निर्दोष, । त्यापुढें आपलें सदोष, । हा खेद वाटे तोची दोष, । कीं, निर्दोष कर्म कोणी दिसेना. ॥ १६०३ ॥ करावा आरंभ ज्या कर्माचा, । त्यांत असे दोष साचा, । यालागीं आरंभ ऐसा कैंचा? । कीं दोष नसे जया आरंभीं. ॥ १६०४ ॥ जीं कर्मे आरंभावीं, । आरंभशब्दें तींच कर्मे म्हणावीं, । सर्वारंभ म्हणतां जाणावीं । सर्व कर्मे. ॥ १६०५ ॥ एवंच जें करावें बरें म्हणोनी, । तेंही बांधे बंधगुणेंकरूनी, । तें बंधकत्व दवडावें ईश्वरीं अर्पूनी, । तरी जो स्वधर्म, तोची अर्पितां मोक्ष असे. ॥ १६०६ ॥ यावेगळेही दोष ।

वेदीं पशुहिंसादि विधिघोष; । विचारितां कवणिया कर्मी संतोष । उपजेल निर्दोषत्वेंकरूनी? ॥ १६०७ ॥ धूमें वेष्टिला अनळ, । तैसें दोषें व्यापिलें कर्म सकळ, । तें स्वकर्म टाकणें हें निष्फळ, । म्हणूनी स्वकर्मच आचरावें, ऱ्हा विधी. ॥ १६०८ ॥ एवं कर्म ज्या वस्तुस्वभावें । उपजतें, त्याच देवाधिदेवें । जें निर्मिलें, तें न्यायनीतिप्रभावें । निर्मिलें जाणावें ये रीती. ॥ १६०९ ॥ त्या ईश्वरें वर्ण चारी । करितां, त्यांचे सहकारी । धर्म निर्मिले ज्या प्रकारीं, । तेच त्या वर्णे आचरावे. ॥ १६१० ॥ ऐसें वर्णासह उपजलें, । तें कर्म सहज शब्दीं बोलिलें, । जें जया वर्णासह जालें, । तें सहज म्हणावें तया वर्णातें. ॥ १६११ ॥ उपजलें जरी वस्तुस्वभावेंकरूनी, । जालें तथापि सर्व त्यापासुनी, । शुक्रशोणित स्वभावेंची उपजोनी । कांहीं मायबापासारिखें होतसे. ॥ १६१२ ॥ बीजासारिखा अंकुर, । फळ वृक्षानुसार, । कारणाचा कांहीं संस्कार, । कार्यांत दिसतो. ॥ १६१३ ॥ तैसें स्वभावें जरी जालें, । तरी अयुक्तपण नाहीं आलें, । कीं कर्म ज्याचे त्यास करणें भलें, । हें नव्हे अयुक्त. ॥ १६१४ ॥ कीं, दोष लागला सर्वत्र, । कीं, बंधकची कर्ममात्र, । ईश्वरार्पणीं तें पवित्र । स्वकर्म सदोषही होतसे. ॥ १६१५ ॥ लहान अथवा थोर, । असे सदोष जें तें घर, । आणि स्वगृहींच सिद्धि पावे नर, । तरी कां जावें परगृहा? ॥ १६१६ ॥ प्रकाश सूर्याचा परम । स्वगृहीं राजमंदिरीं सम, । त्या प्रकाशाकारणें श्रम । कां राजमंदिर प्रवेशाया? ॥ १६१७ ॥ स्वगृहीं गोड निर्मळ झरा, । तरी कां ग्रामवापीस येरझारा? । स्वधर्मीच परमार्थ साधे बरा, । तरी उत्तम अन्यधर्म अवलंबावा किमर्थ? ॥ १६१८ ॥ सदोष आपला धर्म, । तरी दोषयुक्तची सर्वही कर्म, । अग्नीपासूनी उपजे धूम, । दोष कर्मी भलतिया ये रीती. ॥ १६१९ ॥ परधर्म अवलंबिजे बरा, । दोषयुक्तची तोही खरा; । आणि परधर्मअवलंब नव्हे बरा, । हाही एक दोष. ॥ १६२० ॥ स्वधर्मत्याग पाप तिसरें, । ऐसे दोष एकसरें । प्राप्त होती, स्वधर्म टाकितां नरें, । आणि अवलंबितां परधर्म. ॥ १६२१ ॥ याही भावें म्हणे भगवंत, । कीं, अग्नि जैसा धूमें आवृत, । तैसे सर्व आरंभ दोषसहित, । सहज कर्म सोडूं नये यालागीं. ॥ १६२२ ॥ आरंभ परधर्मावलंबनाचा, । आरंभ स्वकर्मत्यागाचा, । एवंच आरंभ करावा ज्या ज्याचा । त्या त्यांत दोषची? ॥१६२३॥ एवंच दोष सर्वत्र, । आणि सहणें अगत्य एकत्र, । तत्रापि घर आपुलें आपणातें पवित्र, । तरी कां जावें परगृहा? ॥ १६२४ ॥ सर्वकर्मी दोष, । तेव्हां स्वधर्मही सदोष, । तो आपणास होत असतां निर्दोष, ।

किमर्थ परधर्म अवलंबावा? ॥ १६२५ ॥ परंतु ज्या रीतीकरूनी । स्वधर्म-दोषेंही अलिप्त राहोनी, । मुक्ति पाविजे, ते रीति अवलंबुनी । आचरावें स्वकर्म. ॥ १६२६ ॥ तरी स्वकर्मी दोषबंध, । चुके त्याचा संबंध, । तो ऐसा, म्हणूनी येथूनी प्रबंध । आरंभला त्यांत प्रथम श्लोक हा. ॥ १६२७ ॥

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥**

आचरतां स्वधर्म, । आणि करितां देहनिर्वाहादि कर्म, । फलासक्ति **बुद्धीस** नसणें हें वर्म । मोक्ष साधावयाचेच कर्मी. ॥ १६२८ ॥ आतां नव्हे फलासक्त बुद्धी, । हे कोणे गोष्टीनें होय सिद्धी, । तरी यास पाहिजे विवेकाची समृद्धी, । विवेकें स्ववश बुद्धि आसक्ति टाकिते. ॥ १६२९ ॥ बुद्धि स्ववश होय, । तरी तोची बुद्धीचा जय, । म्हणूनी म्हणतो भक्तप्रिय । **'जितात्मा'** म्हणोनी. ॥ १६३० ॥ **जित** म्हणजे जिंकिली, । **आत्म**शब्दें बुद्धि आपली, । ते फलासक्ति खोडी टाकी पहिली । तो जितात्मा. ॥१६३१॥ वश ऐसी होय बुद्धी, । तेही कोण्या उपायें सिद्धी? । तरी होतां विवेकाची समृद्धी, । तुच्छ स्पृहा सांडी महाफलाकारणें. ॥ १६३२ ॥ कांजीसाठीं गुंततां, । अमृत न लागे हाता, । ऐसें कळतां, बुद्धिमंता । कां स्पृहा न त्यजील कांजीची? ॥ १६३३ ॥ जेथें हस्ती चवरडोलसहित । प्राप्त होणार, तेथें कोण बुद्धिमंत । तुटकिया पादरक्षांची अत्यंत । धरी स्पृहा? ॥ १६३४ ॥ देवांगनांशीं विवाह । होत असतां निर्वाह, । ग्राम्य नवरीचा उत्साह । कोण धरी? ॥ १६३५ ॥ ज्या स्वकर्मे **मुकुंद** । देणार अर्पितां परमानंद, । तो सकळां आनंदांचा कंद । सोडोनी, विषयानंदस्पृहा कोण धरी? ॥ १६३६ ॥ स्वकर्मे अर्पितां **सर्वेश्वरीं** । परमप्राप्ति यापरी, । जो नर विवेकें संपन्न अंतरीं, । तो **निस्पृह** स्वकर्मी सर्वत्र. ॥ १६३७ ॥ पूर्वार्धाचा ऐसा अर्थ; । परंतु ईश्वरार्पणाचा भावार्थ । बरा विशद समजो **पार्थ**, । म्हणूनी उत्तरार्धी प्रवर्तला. ॥ १६३८ ॥

उत्तरार्ध—**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥**

ते सिद्धि नव्हे कर्मरूप, । जाणावें जेथें चिदात्मस्वरूप, । जडतरंगरूपीं अरूप । तो चैतन्यसिंधु ओळखणें, हे सिद्धी. ॥ १६३९ ॥ ऐसी चिदात्मबोधसिद्धी, । ती म्हणावी नैष्कर्म्यसिद्धी, । स्वकर्मसंन्यासें समृद्धी । त्या चिदात्मबोधसिद्धीची जाणतो. ॥ १६४० ॥ सम्यक् प्रकारें न्यास, । तो

म्हणावा **संन्यास;** । न्यास म्हणावें त्यागास, । एवं त्याग उत्तम, तोच संन्यास बोलावा. ॥ १६४१ ॥ आश्रमसंन्यास म्हणोनी । वाखाणावें **संन्यास**शब्दें-करूनी, । तेव्हां स्वधर्मत्याग त्यावरूनी । प्राप्त होतो. ॥ १६४२ ॥ करितां स्वकर्माचरण । हे नैष्कर्म्यसिद्धि, ऐसें प्रकरण; । येथें आश्रमसंन्यासाचें विवरण । या **संन्यास**शब्दें घडेना. ॥ १६४३ ॥ आतां काम्यकर्मत्याग जरी । या **संन्यास**शब्दें वाखाणावा, तरी । काम्यत्यागाचउपरी । स्वकर्मे हे सिद्धि बोलतो. ॥ १६४४ ॥ कीं, जो स्वकर्मनिरत, । तो जे रीति सिद्धि पावतो अत्यंत, । ते आईक, म्हणूनी बोलिला भगवंत, । **"स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु"**[1] म्हणोनी. ॥ १६४५ ॥ जो स्वकर्मीं अत्यंत रत, । तो म्हणावा **निरत,** । या **निरत**शब्दें भगवंत, । काम्यरत नव्हे, ऐसें बोलिला. ॥ १६४६ ॥ जो काम्यकर्मीं सादर, । तो प्रत्यवायाच्या भयेंची नर । स्वकर्म आचरे, कीं तत्पर । काम्य फळीं. ॥ १६४७ ॥ संध्यादि स्वकर्मेंची आधीं शुद्धी, । काम्यकर्में मग फळाची सिद्धी, । हे शास्त्रीं आयके प्रसिद्धी, । म्हणूनी काम्यार्थच त्याचें स्वकर्म. ॥ १६४८ ॥ तो स्वकर्मीं निरत । ऐसी त्याला म्हणेना अच्युत, । एवंच काम्यत्यागेंची अत्यंत रत । स्वकर्मीं निरत तोची बोलिला. ॥१६४९॥ आणि ऐसा स्वकर्मनिरत, । त्याची सिद्धि आईक, म्हणे भगवंत; । त्या पुढिल्या श्लोकीं म्हणे अच्युत, । कीं, तो स्वकर्मे ईश्वरातें अर्चूनी सिद्धि पावतो. ॥ १६५० ॥ **"यतः प्रवृत्तिर्भूतानां"**[3] या श्लोकेंकरूनी । **"स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति"** म्हणोनी, । तदर्पण सुचवूनी । त्याही श्लोकीं बोलिला. ॥ १६५१ ॥ स्वकर्मे ईश्वराचें । अर्चन तें एकची साचें, । कीं, चरणीं त्याच्या कर्माचें । करावें अर्पण. ॥ १६५२ ॥ तेंच **संन्यास**शब्देंकरूनी । संन्यासें नैष्कर्म्यसिद्धि जाणतो म्हणोनी । देव बोलतो, सुचवुनी । **संन्यास**शब्दें त्याग बरवा पूर्वोक्त. ॥१६५३॥ याच अध्यायाआरंभीं पार्थ, । 'संन्यासाचें आणि त्यागाचें जें यथार्थ, । तें तत्त्व सांग;' म्हणतां बोलिला समर्थ । संन्यास त्याग काम्यमात्राचा.॥१६५४॥ सर्वकर्मफलत्याग । त्याचें नांव बोलिला त्याग, । तरी कर्म करूनी टाकणें फलभाग । विना भगवदर्पण घडेना. ॥ १६५५ ॥ **"यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र"** । या श्लोकीं म्हणे कमलनेत्र, । कीं, ईश्वरार्पणार्थ स्वकर्म पवित्र । तें एक बंधक होईना. ॥ १६५६ ॥ त्या यज्ञार्थावेगळें अन्यत्र । बंध करी कर्ममात्र, । एवंच कर्मफलत्याग अष्टादशीं पद्मनेत्र । ईश्वरार्पणविधीनें बोलिला.

१. अ० १८, श्लो० ४५. २. दोषाच्या. ३. अ० १८, श्लो० ४६.

॥ १६५७ ॥ प्रस्तुत स्वकर्मेंकरूनी । नैष्कर्म्यसिद्धि संन्यासें पावतो म्हणोनी । देव बोलतो, यावरूनी । सर्वकर्मफलत्यागची अर्थ याचा. ॥ १६५८ ॥ न्यास म्हणजे त्याग, । तो बरवा म्हणजे करूनीही नित्यकर्मयोग । ईश्वरार्पणें त्यागावा फळभाग, । त्याग सम्यक् ये रीती. ॥ १६५९ ॥ कीं, न घडे स्वकर्मत्याग । आचरतां कर्मयोग, । आणि ईश्वरार्पणें फळभोग । चुके, आणि प्रसाद ईश्वराचा. ॥ १६६० ॥ त्या प्रसादें सर्वेश्वर । मूर्तिमंत गुरुवर । सांगे नैष्कर्म्यसिद्धि परात्पर, । तेव्हां नैष्कर्म्यसिद्धि पावतो. ॥१६६१॥ येथें नैष्कर्म्यसिद्धी । कोणी म्हणती चित्तशुद्धी, । तरी विनासत्त्वशुद्धि कोणाची बुद्धी । अलिप्त होईल सर्वत्र? ॥ १६६२ ॥ हे नैष्कर्म्यसिद्धि बोलिली ज्याला, । तो अलिप्तबुद्धि, जितात्मा, विगतस्पृह बोलिला, । चित्तशुद्धीवांचूनी त्याला । आलीं कैसीं हीं लक्षणें? ॥ १६६३ ॥ जो बोलिला पूर्वार्धेकरूनी, । तो हे नैष्कर्म्यसिद्धि पावतो म्हणोनी । देव बोलिला, यावरूनी । चित्त शुद्धि बोलवेना. ॥ १६६४ ॥ आतां या श्लोकीं 'अधिगच्छति' । म्हणूनी म्हणे श्रीपती, । अर्थ याचा ये रीती, । कीं, जे नैष्कर्म्यसिद्धि परमा, ते जाणतो. ॥ १६६५ ॥ 'अधिगच्छति' म्हणजे पावतो, । आणि 'अधिगच्छति' म्हणजे जाणतो, । या दों अर्थांत कोण तो । अर्थ अंगीकारावा? ॥ १६६६ ॥ तरी पावतो म्हणूनी । म्हणतां, उत्तरश्लोकेंकरूनी । सिद्धि पावला, तोही ब्रह्म पावतो, यावरूनी । सिद्धशब्दें ज्ञानमात्र. ॥ १६६७ ॥ ज्ञान जालें हे बुद्धीस बोधसिद्धी, । मग अभ्यासें समाधीची समृद्धी, । ब्रह्मीं ब्रह्माकार होय बुद्धी, । ते ब्रह्मप्राप्ति, अर्थ ऐसा, ॥ १६६८ ॥ हे कर्मे शुद्धचित्ता नैष्कर्म्यसिद्धि, । आत्मा ओळखे मात्र बुद्धी, । यासीच समाधिसमृद्धी, । ब्रह्मप्राप्ति जाण, म्हणतो या श्लोकीं. ॥ १६६९ ॥

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥**

अगा! पूर्वश्लोकीं । नैष्कर्मसिद्धि तुज बोलिलों, कीं, । स्वकर्मे शुद्धचित्त या लोकीं, । मग परम नैष्कर्म्यसिद्धीतें जाणतो. ॥ १६७० ॥ तोची तों नैष्कर्म्यसिद्धीतें पावला, । म्हणजे, अद्वैतबोध त्यास जाला, । ब्रह्म होणेंची असे त्याला । अभ्यासेंकरूनी. ॥ १६७१ ॥ म्हणूनी नैष्कर्म्यसिद्धीतें पावे तो, । ज्या प्रकारें ब्रह्म पावतो, । तो प्रकार जाण, जो सांगतों, । देव म्हणे. ॥ १६७२ ॥ कीं, आत्मा ओळखे बुद्धी, । हेही नैष्कर्म्यवस्तूची सिद्धी, ।

परंतु ते बुद्धीस तन्मयत्वसमृद्धी । अभ्यासें होतसे. ॥ १६७३ ॥ कोणी आत्मा ओळखिला, । तोच ज्ञानाचा परिणामही लेखिला, । परंतु आत्मा तिहीं नाहीं देखिला । तदाकार बुद्धीतें करूनी. ॥ १६७४ ॥ ते पूर्वश्लोकीं नैष्कर्म्यसिद्धी । वाखाणिती चित्तशुद्धी, । कीं, त्याच सिद्धि पावली यांची बुद्धी । ब्रह्म पावते, म्हणतो म्हणती या श्लोकीं. ॥ १६७५ ॥ म्हणती, या श्लोकीं पुरुषोत्तम । म्हणतो, तो पावतो ब्रह्म; । तेव्हां नैष्कर्म्यसिद्धि या नाम । पूर्वश्लोकीं ते चित्तशुद्धी. ॥ १६७६ ॥ जरी अंगीकारिते अभ्यास, । तरी हें तत्त्व कळतें त्यांस, । नैष्कर्म्यसिद्धि म्हणजे ज्ञान जालें ज्यास, । तो अभ्यासें ब्रह्म पावतो. ॥ १६७७ ॥ स्वरूपअभ्यासेंकरूनी । बुद्धि तन्मय जालियावांचुनी । आत्मज्ञानही शब्दज्ञानच, म्हणोनी । बहुधा मागेंही बोलिला हा अर्थ. ॥ १६७८ ॥ तें असो मागुती; आतां । ग्रंथ वाढतो बोलतां, । एवंच आत्मा कळला तत्त्वतां, । तरी ब्रह्म पावणें असेच. ॥ १६७९ ॥ कीं ब्रह्मावांचूनी दुसरें । मनीं न स्फुरे एकसरें; । आपण ब्रह्म, आपणच भूतें चराचरें, । हें बिंबे, तेव्हां ब्रह्म जाला. ॥ १६८० ॥ जो ब्रह्म जाला, । तोच ब्रह्म पावला, । तोंवरी आत्मा सर्व म्हणूनी बोध कळला, । परी नाहीं पावला तो ब्रह्म. ॥ १६८१ ॥ तत्रापि ब्रह्म निखळ । बिंबलें जरी केवळ, । तथापि जों बिंबे ब्रह्मत्वेंची सकळ, । तोंवरी उरी आहेच ब्रह्म व्हावयाची. ॥ १६८२ ॥ पुढें चतुर्थ श्लोकेंकरूनी । "ब्रह्मभूयाय कल्पते" म्हणोनी । बोलेल, कीं, ब्रह्मनिष्ठही होउनी । ब्रह्म व्हावया योग्य होतसे. ॥ १६८३ ॥ मग पंचम श्लोकीं अच्युत । म्हणेल, कीं, तोच होतां ब्रह्मभूत । सम सर्वभूतीं अद्भुत । माझी भक्ति पावतो. ॥ १६८४ ॥ यावरूनी ब्रह्म । पावणें हेंची परम, । कीं, आपण सर्व भूतें ऐसें उत्तम । अखंड स्फुरे. ॥ १६८५ ॥ याचेंची नांव मुकुंद । सर्व भूतीं भक्ति बोलिला गोविंद, । त्याची टीका तेथें होईल विशद, । प्रस्तुतीं ब्रह्म पावणें तें ऐसें. ॥ १६८६ ॥ त्या ब्रह्मप्राप्तीतें पावतो । तोची, जो आधीं नैष्कर्म्यसिद्धीतें जाणतो, । कीं, जाणोनी सर्व भूतें आपण होतो । दृढाभ्यासेंकरूनी. ॥ १६८७ ॥ तो अभ्यासक्रम । संक्षेपें बोलों पाहतो सर्वोत्तम, । म्हणोनी म्हणतो, कीं, सिद्धि पावला तो ब्रह्म । जैसा पावतो, तैसा क्रम समज तूं. ॥ १६८८ ॥ अर्जुना! संक्षेपेंकरूनी । [1]तें जाण मजपासुनी, । ते ज्ञानाची निष्ठा परा म्हणोनी । देव म्हणे. ॥ १६८९ ॥

---

१. अ० १८, श्लो० ५२.

जीमध्यें ज्ञानाची स्थिती । अभ्यासें अतिशयें बाणे ते रीती, । 'निष्ठा परा' म्हणे श्रीपती, । कीं, तें कुंतीसुता मजपासुनी जाण तूं. ॥ १६९० ॥ ज्ञान पावला तेही सिद्धी, । कीं, अद्वैत समजली बुद्धी, । जों नाहीं समाधिसुख-समृद्धी, । तोंवरी हे सिद्धि तीस बोलों नये. ॥ १६९१ ॥ कीं, क्षुधितास पाकसामग्री मिळाली, । तेही सिद्धि त्यानें मानिली, । तथापि तृप्ति तया नाहीं जाली, । तदर्थ अन्नातें नाहीं मिळाला, म्हणावा. ॥ १६९२ ॥ दर्शन जालें दातयाचें, । कार्यसिद्धीच नांव त्याचें, । तथापि धनलाभें मानसाचें । होणेंच असे समाधान. ॥ १६९३ ॥ कलश अमृताचा । हातास लागला साचा, । तेही सिद्धी, परी त्याचा । लाभ होणेंची असे पानपर्यंत. ॥ १६९४ ॥ दृष्टांत कोटि ये रीती । स्मरोनी सिद्धि पावला त्यातेंही श्रीपती । ब्रह्म पावणें असे म्हणे; आणि श्रुती, । गीता, पुराणें, प्रमाण ये अर्थी. ॥ १६९५ ॥ या टीकेंत वारंवार । निरूपिलाच तो प्रकार, । आतां पुन्हा ग्रंथविस्तार । कां करावा? ॥ १६९६ ॥ एवंच ज्ञान जालें जयास, । त्यानें ब्रह्मप्राप्तीचा कैसा करावा अभ्यास? । तें येथूनी सांगतों अर्जुनास, । त्यांत साधनें कांहीं बोलतो या श्लोकीं. ॥ १६९७ ॥

बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।
शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥

स्वकर्मेंकरूनी बुद्धी । पूर्वोक्तरीती पावली सिद्धी, । जे पावली विवेकाची समृद्धी, । युक्त त्या शुद्धा बुद्धीनें. ॥ १६९८ ॥ ऐशा शुद्धबुद्धीकरूनी । आणि धृतीकरूनी चित्तातें नियमुनी, । शब्दादि विषय रागद्वेषही टाकुनी, । ब्रह्म व्हावया योग्य होतसे. ॥ १६९९ ॥ तीं श्लोकीं ये रीती । साधक आणि साधनाची संगती । बोलोनी, शेवटीं श्रीपती । म्हणेल, तो "ब्रह्मभूयाय कल्पते." ॥ १७०० ॥ म्हणजे ब्रह्म व्हावया योग्य होतो, । ज्या साधनाभ्यासें तैसा करितो, । ब्रह्म व्हावयाचा प्रकार तो । कीं सर्वही आपण, ऐसें अनुभवी. ॥ १७०१ ॥ पुढें विशद हा निर्णय, । प्रस्तुत या श्लोकत्रयाचा अन्वय । दावी ऐसा रुक्मिणीप्रिय, । कीं, जो ऐसा तो "ब्रह्मभूयाय कल्पते." ॥ १७०२ ॥ आतां या श्लोकाचा विशद । अर्थ ऐसा, कीं, गोविंद । अभ्यास बोलतो मुकुंद । धृतिशब्देंकरूनी. ॥ १७०३ ॥ युक्त शुद्धबुद्धीनें असोनी, । चित्त धारणेनें नियमुनी, । विषय शब्दादि आणि

---

१. अ० १८, श्लो० ५४.

रागद्वेष टाकूनी, । अभ्यास करितो. ॥ १७०४ ॥ तो धृतिशब्दें अभ्यास । कीं, धारणेनें चित्तास । नियमितो, म्हणे जगन्निवास, । तें नियम्य म्हणे कोठें चित्ताचें? ॥ १७०५ ॥ तरी "धृत्यात्मानं" म्हणोनी । या आत्मशब्देंकरूनी । स्वरूपीं धारणाद्वय सुचवूनी । देव बोले. ॥ १७०६ ॥ आत्मशब्दें बुद्धी । चित्त मन अंतःकरण ऐसी प्रसिद्धी, । प्रस्तुतीं आत्मशब्दाची अर्थसिद्धी । चित्तवृत्ति सत्त्वाची. ॥ १७०७ ॥ कीं, स्वकर्मे जिची सिद्धी, । ऐसी जे शुद्ध बुद्धी, । तीकरूनी युक्त म्हणतां अर्थसिद्धी । जाली बुद्धीची बुद्धिशब्दें. ॥ १७०८ ॥ अत्यंत धृतीकरूनी । चित्तातें स्वरूपीं नियमुनी, । या आत्मशब्दें चित्त म्हणोनी । धृतिशब्दें योग्य अर्थ बोलावा. ॥ १७०९ ॥ कीं, धृति धारणा, तीकरूनी । चित्तातें स्वरूपीं नियमुनी, । ब्रह्म व्हावया योग्य होतो, म्हणोनी । तृतीय श्लोकीं अन्वय. ॥ १७१० ॥ आणि शुद्धबुद्धीनें युक्त, । म्हणजे मुमुक्षासंपन्न साधक विरक्त, । शुद्धबुद्धी ते, जे नव्हे आसक्त । प्रपंचीं विषयवासनेकरूनी. ॥ १७११ ॥ ऐशा शुद्धबुद्धीकरूनी । साधकें युक्त होउनी, । धृतीकरूनी चित्त नियमुनी, । स्वरूपधारणा धरावी, हा अर्थ. ॥ १७१२ ॥ ते द्विविध धारणा, । एक केवळ चित्स्वरूपीं योजावें अंतःकरणा, । दुसरी कार्यां जडांत कारणा । पाहावें, अलंकारीं जैसें सुवर्ण. ॥ १७१३ ॥ दोहीं परी चित्स्वरूपीं । संस्कार जोडावा अरूपीं, । तो शुद्ध चित्स्वरूपीं हो, अथवा नानारूपीं । स्फुरे अरूप चित्स्वरूप. ॥ १७१४ ॥ धृतीकरूनि चित्तातें । नियमुनी, मांडावें अभ्यासातें, । ऐसें बोलिलें रमाकांतें; । चित्त कोठें नियमावें? तरी स्वरूपीं, हा अर्थ. ॥१७१५॥ या दोनी अभ्यासरीती । करितां, बाणते सर्वात्मत्वीं स्थिती, । तेव्हां ब्रह्म व्हावया योग्य होतो, म्हणे जगत्पती । हा अन्वय श्लोकत्रयाचा. ॥ १७१६ ॥ आतां धृतीकरूनी अभ्यास । बोलिला ऐसा जगन्निवास, । आणि वर्णिता जाला साधकांस । युक्त शुद्धबुद्धीकरूनी म्हणोनी. ॥ १७१७ ॥ युक्त ऐसा शुद्धबुद्धीकरूनी । अभ्यास करितां धारणा धरूनी, । तो काय टाकतो? काय धरितो? तें येथुनी । भगवत बोलतो. ॥ १७१८ ॥ म्हणे शब्दादि विषयभोग । टाकोनी साधितो योग, । कीं, जों विषयवासनारोग । तोंवरी योग साधेना. ॥ १७१९ ॥ कीं व्यातां वस्तु केवळ । स्थिरत्वें योजून चित्त विमळ, । वारा नसतां स्थिर जळ । तैसें स्वरूपीं चित्त वासनात्यागें. ॥ १७२० ॥ जरी वासना असे मनीं, । तरी त्या केवळ स्वरूपध्यानीं । विषयवासना भोगवायू करूनी । तरंग उठती विषयांचे. ॥ १७२१ ॥ तो विक्षेप बोलावा, । या-

लागीं अगा! पांडवा! । शब्दादि विषयत्याग बरवा । करूनी, धारणा धरावी स्वरूपाची. ॥ १७२२ ॥ एक निखळ चित्स्वरूपीं । धारणा ऐसी ब्रह्मीं अरूपीं, । येथें शब्दादिविषयरूपीं । घडों न शके अभ्यास. ॥१७२३॥ दुसरी सर्वब्रह्मरूप । धारणा, रूपीं अरूप । पाहतां, विश्व लक्षावें चित्स्वरूप, । तरंग पाहतां जळ जैसें. ॥ १७२४ ॥ तेथेंही शब्दादि विषयवासनात्याग । असे तरीच अभ्यासूं शके योग, । कीं, विषयरूपची वाटलें जग, । तेंची ब्रह्मत्वें घ्यावें पुनःपुन्हा. ॥ १७२५ ॥ जरी मनीं अपेक्षी भोग, । तरी विषयांत निर्विषयस्फूर्तिसंयोग । न स्फुरे, तेव्हां सर्वात्मयोग । अभ्यासणें न घडे कदापिही. ॥ १७२६ ॥ जो सुवर्णाचा व्यवसाय करी, । तोही अलंकार नानारूप देखे, परी । दृष्टि त्याची त्या सुवर्णावरी; । वेश्या नग लेणारी ऐसें न पाहे. ॥ १७२७ ॥ नग चांगला सांपडे, । त्यावरी तिची उडी पडे, । नग वेडा वांकडा नावडे । दृष्टि पडोनीही सुवर्णी. ॥ १७२८ ॥ ऐसा जो विषयासक्त नर, । तो विषयस्मृतीनें होय भोगींच तत्पर, । त्यास विषयीं निर्विषय परात्पर । न स्फुरे, तेव्हां अभ्यास कैंचा? ॥ १७२९ ॥ जो विषयवासनात्यागी, । तो विषयीं जेव्हां निर्विषय पाहे योगी, । तेव्हां त्याच्या चित्तास भोगीं । करील कोण अनुरक्त? ॥ १७३० ॥ अलंकार त्यावे ये रीती । न इच्छी ज्याची मती, । सुवर्णलाभेंची मानी तृप्ती, । त्यास त्या नगीं तेंची दिसे. ॥ १७३१ ॥ यालागीं अभ्यासितां योग, । आधीं करावा विषयत्याग, । याकारणें म्हणे श्रीरंग । "शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा" म्हणोनी. ॥ १७३२ ॥ आतां हाची शब्दादि विषयांचा । त्याग बोले भगवंताची वाचा, । परंतु प्रारब्धें जों देह जितो[1] ज्याचा, । तों त्या सिद्धासही लागेच विषय सेवणें. ॥१७३३॥ ऐसें असतां भगवंत, । विषयत्यागच बोलतो अत्यंत, । म्हणूनी अर्जुन शंकित । देखिला देवें. ॥ १७३४ ॥ म्हणूनियां शंकेचें परिहरण । याच श्लोकीं हा जगद्वंद्यचरण । करितो, तदर्थ चरण । चतुर्थ आतां बोलतो. ॥ १७३५ ॥

चतुर्थचरण—**रागद्वेषौ व्युदस्य च** ॥

**राग** म्हणजे गोड विषय, । तो भोगितां वाटे प्रिय, । तो पुनःपुन्हा भोगावा ऐसा निश्चय, । तो विषयानुरागनामक राग टाकावा. ॥ १७३६ ॥ आणि वाईट विषय । भोगितां वाटे अप्रिय, । तो मज नलगे ऐसा निश्चय, । तें रूप द्वेषाचें टाकावें. ॥ १७३७ ॥ जो विषय प्रारब्धेंकरूनी । प्राप्त जाला,

---

१. जगावा, जीवंत राहावा.

तो रागद्वेष टाकूनी । सेवावा, म्हणोनी । म्हणे शेवटिल्या चकारें भगवंत. ॥ १७३८ ॥ पहिलें त्यागची बोलिला, । कीं, त्यागावें शब्दादि विषयांला, । पुन्हा रागद्वेष त्या बोलतां प्राप्त जाला । भोग त्या विषयांचा. ॥ १७३९ ॥ कीं विषयच टाकी । त्यास रागद्वेष नुपजे तिहीं लोकीं, । विषय सेवितांच रागद्वेष कीं, । म्हणूनी भोग मागुती चकारें बोलिला. ॥१७४०॥ कीं, आपण सर्वथा । टाकावीच भोगाची कथा, । आतां प्रारब्ध नव्हे अन्यथा, । तरी भोगावेंही त्यागूनियां दों गोष्टींतें. ॥ १७४१ ॥ भाव ऐसा धरूनी । म्हणे, शब्दादि विषयांतें त्यागुनी, । आणि रागद्वेषांतें टाकुनी । विषय भोगूनीही अभ्यास. ॥ १७४२ ॥ इत्यादि साधनेंकरूनी । ब्रह्म व्हावया योग्य होतो म्हणोनी, । साधनें आणीक दों श्लोकेंकरूनी । बोलेल त्यांत हा एक श्लोक. ॥ १७४३ ॥

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥**

स्थळ एकांत सेवी, । आणि लघु अन्नें जेवी, । लघुशब्दें दोंकडे लावी । अर्थ येथें भगवंत. ॥ १७४४ ॥ लघु म्हणजे हलू म्हणावें, । तें दोंकडे हलूपण गणावें, । एक जातीनें हलू तें लघु जाणावें, । दुसरें पोटांत हलू वाटे जेवणें ये रीती. ॥ १७४५ ॥ कीं, जें जातीनें जड । खातां होय अवघड, । तें अन्न तो न भक्षी सुघड, । कीं तें विघ्न करील अभ्यासीं. ॥१७४६॥ म्हणूनी लघु अन्नेंची जेवी, । तींही मर्यादेत भोजनातें ठेवी, । जड नव्हे आणि तृप्ति होय तितकें सेवी । जातीनेंही जें लघु अन्न. ॥ १७४७ ॥ ऐसा एकांत सेवी, । आणि लघु अन्न ये रीती जेवी, । आणि वाचा, शरीर, मन, ठेवी । करूनी नियम. ॥ १७४८ ॥ योगास अनुकूळ जितकें, । बोलणें त्याचें तितकें, । 'अभ्यासास उपयोगी मज इतकें । ते बोलिलें, आतां वृथा बोलों नये,' नियम ऐसा. ॥ १७४९ ॥ स्नानशौचादिकांकारणें गमन, । देहनिर्वाहार्थ भोजनशयन, । यावेगळें सर्वदा स्थिरासन । अभ्यास करी शरीरीं, नियम ऐसा. ॥ १७५० ॥ ऐसाची आपल्या मना । वृथा करूं नेदी कल्पना, । अभ्यासार्थ देहनिर्वाहार्थ रचना । विचारूनी करवी कल्पनेची. ॥ १७५१ ॥ ये रीती वाचा, शरीर, मानस, । नियत करूनी, मांडी अभ्यास, । त्या साधकातें जगन्निवास । म्हणे ध्यानयोगपर म्हणोनी. ॥ १७५२ ॥ ध्यानयोगपर । म्हणजे सगुण ध्यानीं तत्पर, । कीं, ज्या सगुणातें ध्यातो, तो

**सर्वेश्वर** । उद्धरील मज अनायासें. ॥ १७५३ ॥ द्वादशीं "**ये तु सर्वाणि कर्माणि । मयि संन्यस्य मत्पराः**" म्हणे चक्रपाणी, । "**मां ध्यायंत उपासते**" ऐसी वाणी । त्याच श्लोकीं देवाची. ॥ १७५४ ॥ कीं ध्यातो सगुणत्वेंकरूनी, । आणि उपासितो आत्मत्वें मातें, म्हणोनी । "**तेषामहं समुद्धर्ता**" म्हणे द्वादशीं, तें सुचवुनी । "**ध्यानयोगपरो नित्यं**" म्हणतो प्रस्तुत. ॥ १७५५ ॥ कीं या सगुणध्यानेंचीकरूनी । अनायासें ज्ञानपरिपाक पावन म्हणोनी । ध्यानयोगची पर मानूनी । असतो, म्हणे भगवंत. ॥ १७५६ ॥ द्वादशीं "**मां ध्यायंत उपासते**" म्हणोनी । बोलिला सगुणध्यान आत्मत्वेंकरूनी, । तें येथें बोले सुचवुनी । **ध्यानयोग**-शब्दें. ॥ १७५७ ॥ सगुणध्यानीं आत्मयोग, । तो म्हणावा ध्यानयोग, । दृष्टीस कनकाकृतींत संयोग । कनकाचा जे रीती. ॥ १७५८ ॥ तैसें बुद्धीस ध्यान सगुण । न स्फुरे विनानिर्गुण, । जैसी सुवर्णप्रतिमा विनासुवर्ण । दृष्टीस न दिसे. ॥ १७५९ ॥ कनकीं दृष्टीचा संयोग । पाहतां कनकमूर्ति, ऐसा बुद्धीचा योग । स्वरूपीं सगुणध्यानीं तो ध्यानयोग, । तोच **पर** म्हणजे मुख्य त्यातें. ॥ १७६० ॥ ज्या प्रयोजनीं जो असे, । त्यास ज्यास्तव त्याची सिद्धि दिसे, । तेंची त्याच्या मनीं सदा वसे । परत्वेंकरूनी. ॥ १७६१ ॥ जों जों आत्मत्वें साकारध्यान, । तों तों बिंबे सर्वात्मक ज्ञान, । तो त्याच सगुणध्यानाचा प्रताप, ऐसें समाधान, । ध्यानयोगपरत्व तयाचें ये रीती. ॥ १७६२ ॥ कीं योगची माझी कार्यसिद्धी, । ऐसिया ध्यानयोगास ज्याची बुद्धी । मुख्य प्राप्तिसाधन मानी, कीं समृद्धी । स्वसुखाची याचीकरितां. ॥ १७६३ ॥ आणि वैराग्यातें समुपाश्रित । म्हणजे बरविया प्रकारें वैराग्याचा आश्रित, । मन कधीं नव्हे ज्याचें आसक्त । विषयसुखवांछेंकरूनी. ॥१७६४॥ ऐसें एकांत स्थळ, लघुभोजन, । आणि ध्यानयोगें वैराग्याचेंही अवलंबन, । आणि वाचा, शरीर, मन, । अवलंबन यांच्या नियमाचें. ॥ १७६५ ॥ ऐसें ज्या ज्या गोष्टींचें अवलंबन, । ते ते गोष्टी बोलिला मधुसूदन; । आतां त्यागितो जें जें, तें तें जगज्जीवन । बोलवसे या श्लोकीं. ॥ १७६६ ॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥**

स्वदेहीं जे अहंता, । आणि देहसंबंधियांची ममता, । 'देह मी, तीं माझीं',

१. अ० १२, श्लोक ६. २. अ० १२. श्लो० ७.

**म्हणूनी तत्त्वतां** । मानीत होता, तें सोडी. ॥ १७६७ ॥ **किंबहुना स्त्रीपुत्रादिक** । परिग्रह पशुभृत्यादि अनेक । सर्वही सोडी, कांहीं एक । न ठेवी नांवें परिग्रहाच्या. ॥ १७६८ ॥ देहबळ, धनबळ, । आणि विद्येचें बळ प्रबळ, । वादें जिंकों पाहे भूमंडळ, । इत्यादि बळें सकळ जो टाकी. ॥ १७६९ ॥ जो ज्या बळातें मानी, । तो त्या बळें होय अभिमानी, । त्या अभिमानें अपमानी । भलतियातें. ॥ १७७० ॥ त्यागी इत्यादि सकळ, । या भावें म्हणे 'टाकीं बळ,' । आणि 'गर्वरूप विद्यादि मूळ । तो टाकी'. ॥ १७७१ ॥ अथवा मी ज्ञानी परम, । मज कळलें सर्वही ब्रह्म, । इतरं ज्ञानियांस कांहीं तरी असे भ्रम, । मी सर्वज्ञ सर्व जाणें.' ॥ १७७२ ॥ ज्ञानी ऐसाही होउनी । शब्द बोले अभ्यासानें टाकुनी, । तो ऐसाच गर्विष्ट होय, म्हणोनी । अभ्यासनिष्ठाची निगर्वता हे वर्णिली. ॥ १७७३ ॥ इत्यादि सर्व गर्व सोडी, । सकळ अविद्यासंस्कार खोडी, । निरहंकारत्वें मोडी । संस्कार पहिले. ॥ १७७४ ॥ टाकी सकळही काम, । क्रोधाचें न वागवी नाम, । ऐसा अभ्यासनिष्ठ आत्माराम । सर्व टाकी. ॥ १७७५ ॥ आतां जे अहंकारादि संग, । आणि कामक्रोधादि षड्वर्ग, । त्यांत लोभमोहमदमत्सरत्याग । बोलतां राहिला. ॥ १७७६ ॥ यावेगळे अविद्यामूळ । जे त्यागायोग्य दोष सकळ, । त्याग त्यांचा सुचवी **घननीळ** । **शांत** म्हणतां. ॥ १७७७ ॥ जोंवरी संसारवासना, । तोंवरी हे दोष नाना, । सर्वदा मनीं कल्पना । कामक्रोधलोभमोहमदमत्सरांची. ॥ १७७८ ॥ जोंवरी विषयवासनासमीर, । तोंवरी अंतःकरणनीर । कामादितरंगरूपें गंभीर । क्षोभलें असे. ॥ १७७९॥ होतां नित्यानित्यश्रवणमनन, । विवेक उपजे सहस्रानन[2], । सहस्रां वदनीं गिळी पवन । विषयलालसेचा. ॥ १७८० ॥ तेव्हां हृदयगंगाजळ । राहतां परम निश्चळ, । नव्हे तरंगरूपें चंचळ । शांत म्हणावें तेधवां. ॥ १७८१ ॥ जो शांत बोलिला ये रीती, । सोडोनी अहंमत्वादि कृती, । तो योग्य होतो म्हणे **श्रीपती** । **ब्रह्म** व्हावया. ॥ १७८२ ॥ **"ब्रह्मभूयाय कल्पते"** । म्हणोनी **भगवद्वाणी** बोलते, । जेव्हां 'शुद्धबुद्धि या रते । योजितां स्वरूपधारणेकरूनी. ॥ १७८३ ॥ **"बुद्ध्या विशुद्धया युक्तो"** या श्लोकेंकरूनी । **"धृत्यात्मानं नियम्य च"** म्हणोनी, । ज्याचा अभ्यास बोलिला, तो योगारूढ होउनी । **ब्रह्म** व्हावया योग्य होतसे. ॥ १७८४ ॥ आत्मा चिन्मात्र

---

१. साठीं, (त्यांना) मिळावें म्हणून. २. हजार मुखांचा सर्प, शेष. ३. मागें श्लोक ५१ पहा.

केवळ, [1] तेंची चैतन्य जरी नसतें स्वयें सकळ, । तरी चिन्मात्र अनुभवातेंच केवळ । ब्रह्मानुभव अंगीकारिजेता. ॥ १७८५ ॥ ब्रह्म अनादि जैसें, । त्याचें प्रपंचाकार होणेंही तैसें, । म्हणूनी जों स्वयें तोची प्रपंच, ऐसें । अनुभवा नये, तों तो ब्रह्म केंवी जाला? ॥ १७८६ ॥ अतएव वेदीं, शास्त्रीं, पुराणीं, । आणि पाहतां उपदेशकर्तयाची वाणी, । ब्रह्म केवळ जाणावें, आणी । सर्वही ब्रह्म जाणावें, ऐसा सिद्धांत. ॥ १७८७ ॥ जरी ऐसें वेदीं, शास्त्रीं, पुराणीं, । तरीच सप्तमाध्यायीं चक्रपाणी । **“ते[2] ब्रह्म तद्विदुः कृत्स्नं”** म्हणोनी वाणी । बोलिला आपण. ॥ १७८८ ॥ कीं जे सुकृती । ब्रह्म जाणती, । आणि ते **‘कृत्स्नं’** म्हणजे सर्व ये रीती । जाणती म्हणे भगवंत. ॥ १७८९ ॥ ऐसेंच चतुर्थीं भगवंत । म्हणे, सर्व भूतें आपणांत । देखसी, तें ज्ञान संत । तुज उपदेशिती. ॥ १७९० ॥ एवंच जरी प्रपंच-भेद । असता, तरी तितकीच प्राप्ति बोलते वेद, । तत्त्वतां ब्रह्मप्रपंच अभेद, । तेंव्हां त्याच अनुभवें ब्रह्म होणें. ॥ १७९१ ॥ याचकरितां प्रस्तुतीं, । सिद्धि पावला, तोही ब्रह्म पावतो जे रीती, । ते तैसी रीति तूं जाण, म्हणूनी श्रीपती । आरंभीं अर्जुनाप्रति बोलिला. ॥ १७९२ ॥ कीं सिद्धि पावला, । म्हणजे, ज्ञानी जाला, । तथापि ‘सर्व आपण’ ऐसा बोध नाहीं बाणला, । तों उँरी[3] आहेच ब्रह्मप्राप्तीची. ॥ १७९३ ॥ ते प्राप्ति अभ्यासेंकरूनी होते, । त्या अभ्यासास साधनसंपत्ति लागते, । ते ऐसी तेंव्हां **“ब्रह्मभूयाय कल्पते”**,। म्हणजे ब्रह्म व्हावया योग्य होतो. ॥ १७९४ ॥ कीं, दृश्य चराचर, । हें कार्य, यांत कारण आपण परात्पर, । या अनुभवायोग्य होतो, म्हणूनी सर्वे-श्वर । म्हणे **“ब्रह्मभूयाय कल्पते”**. ॥ १७९५ ॥ हें ऐसें म्हणे ज्याला, । तो जेंव्हां ब्रह्म जाला, । स्थिति कैसी बाणते त्याला? । तें बोलतो आतां या श्लोकीं. ॥ १७९६ ॥

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**

**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥**

जो ब्रह्मभूत । ब्रह्मची जाला निश्चित, । तो प्रसन्नात्मा अत्यंत । न करी शोक, न इच्छी किमपिही. ॥ १७९७ ॥ अर्थ ऐसा पूर्वार्धाचा, । कीं प्रसन्न

---

१. अ० ७, श्लो० २९. २. तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया । उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव । येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ४।३४-३५. ३. उणीव.

आत्मा ज्या ब्रह्मभूत योगियाचा, । तो शोक न करी कासयाचा, । आणि अपेक्षा न धरी किमपिही. ॥ १७९८ ॥ स्थिति ऐसी अद्भुत । पावे योगी ब्रह्मभूत, । प्रसन्न आत्मा म्हणजे चित्त, । जें या योगियाचें. ॥ १७९९ ॥ रजतमें होतें क्षोभलें, । तेंच त्यांवेगळें जालें, । ब्रह्म सर्वत्र देखों लागलें, । मग कां नव्हे तें प्रसन्न ? ॥ १८०० ॥ चित्तास चेतवी चैतन्य, । त्यास त्या आत्मयासारिखें अन्य । प्रिय नाहीं किमपिही, तें अनन्य । प्रपंचीं दिसे, तेव्हां प्रसन्नता चित्तातें. ॥ १८०१ ॥ जळाकारणें तळमळी, । ते जळीं पडे मासोळी, । तें उदकची नाना कल्लोळीं । देखे, तेव्हां कां न पावे प्रसन्नता ? ॥१८०२॥ प्रिय चित्तास चित्स्वरूप, । तेंची दिसों लागे नानारूप, । मग प्रसन्नता त्याची अमूप । कोण गणी ? ॥ १८०३ ॥ प्रिय सर्वांपरीस । चित्तास जो आत्मा चैतन्यरस, । सर्व त्या रसाचेच देखे तरंग सुरस, । तें कां प्रसन्न मग नव्हे ? ॥ १८०४ ॥ क्षोभास मूळ द्वैत, । तें नासलें बिंबतां अद्वैत, । तेव्हां योगी ब्रह्मभूत, । कां प्रसन्नचित्त मग नव्हे ? ॥ १८०५ ॥ स्वप्नीं आपलेंची मन । जालें गज, व्याघ्र, तस्कर, दुर्जन, । जागरीं तें सर्व चिंतन । क्षोभ न करी चित्तातें. ॥ १८०६ ॥ स्वप्न स्मरे जागृत, । तों तें जग आत्मभूत, । तेव्हां प्रसन्न त्याचें चित्त । कां नव्हे ? ॥१८०७॥ म्हणे, 'पाहा स्वप्नरचना, । माझिया मनाची कल्पना, । आणि मारक गजव्याघ्रादि नाना । सचेतन माझ्याच आत्मस्वरूपें. ॥ १८०८ ॥ कीं ते गजव्याघ्रतस्कर, । मज वाटले जे भयंकर, । माझीच कल्पना चराचर, । आणि मीच आत्मा तयांचा. ॥ १८०९ ॥ गजव्याघ्रतस्करजन । मज भय देत होते दुर्जन, । त्यांस कोण्या जीवें सचेतन । केलें मजवांचुनी ? ॥ १८१० ॥ नव्हे ईश्वरकल्पना, । कीं, स्वकर्में जीव ते नाना, । पावोनी कर्मानुरूप देहरचना, । सजीव देहधारी वर्तले. ॥ १८११ ॥ हा प्रपंच ईश्वरकृत, । ईश्वराचे जीव बहुत, । त्यांकरितां देह ईश्वरकल्पित । सुखी दुःखी चालती बोलती. ॥ १८१२ ॥ ऐसेच सुखी दुःखी जन । चालती बोलती सचेतन, । ते दृश्यकल्पना स्वप्नीं माझें मन, । तेव्हां सचेतन तें माझ्या जीवेंकरूनी.' ॥ १८१३ ॥ ज्या जळीं प्रतिबिंबलें रविमंडळ, । तें जळ होतां चंचळ, । तेथूनी प्रतिबिंबाचें तेज झळझळ । भिंतीवरी करितसे. ॥ १८१४ ॥ सूर्य एक गगनीं, । दुसरा प्रतिबिंबला जीवनीं, । त्याचें तेज तिसरें दिसे नयनीं । भिंतीवरी झळझळितां. ॥ १८१५ ॥ जैसे ईश्वराचे अंश प्रतिबिंब, । ते जीव, ज्यांस सत्त्वोपाधि-

उदकांचा अवलंब, । तैसे त्याचेही चिदंशकदंब । सचेतन करिती स्वप्नींच्या देहातें. ॥ १८१६ ॥ येविषयीं प्रमाण । श्रीमद्भागवत महापुराण । दशमस्कंधीं ब्राह्मण । श्रुतदेवक नामें वदे हा श्लोक. ॥ १८१७ ॥

भागवतश्लोकः—यथा शयानः पुरुषो मनसैवात्ममायया ।
सृष्ट्वा लोकं परं स्वाप्नमनुविश्यावभासते ॥

जैसा निजेला पुरुष शयनीं, । मनची त्याची माया, त्या स्वप्नमायेंकरूनी । लोक आणीकची एक निर्मुनी, । प्रवेशोनी त्यांत, आपणच भासतसे. ॥१८१८॥ तो स्वाप्नलोक पर, । पर म्हणजे इतर, । कीं, हा लोक सचराचर । जो ईश्वर कल्पी, यावेगळा तो. ॥ १८१९ ॥ तें वेगळेंच चराचर, । जें निजोनी कल्पी नर, । या चराचरीं प्रवेशला ईश्वर, । त्या चराचरीं तो जीव. ॥ १८२० ॥ चिदंशरूपें ईश्वर । या लोकीं प्रवेशला, तैसा नर । सजीव चैतन्यें तें चराचर । जीवत्वी प्रवेशोनी. ॥ १८२१ ॥ लोक निर्मिल्या उपरी । जो प्रवेशे चराचरीं, । तो प्रतिबिंबरूपेंची, दुसरी । गोष्टी येथें चालेना. ॥ १८२२ ॥ एवं ये रीति जागृत होउनी । स्वप्न स्मरे स्वप्नदृष्टीकरूनी, । कीं, मनची स्वप्नदृष्टी म्हणोनी । मनेंची करूनी देखे प्रसन्नचित्त. ॥ १८२३ ॥ ऐसा ब्रह्मभूत। अनुभव पावला अद्भुत, । तथापि देहप्रारब्धाचा असे निश्चित । दग्धपटरूपें इंद्रियें. ॥ १८२४ ॥ तो देह, तो इंद्रियसमुदाय, । आणि विश्व अवघें, चिन्मय, । परी हा अनुभव अद्वय । ज्या चित्तास, तेच अविद्यावृत तत्पूर्वी. ॥ १८२५ ॥ ज्याणें वेगळें एक शरीर । मानिलें, आणि वेगळें चराचर, । आत्मा ज्याला ठावा नव्हता परात्पर, । तेंच चित्त सर्व ब्रह्म अनुभवूं लागलें. ॥ १८२६ ॥ जैसें स्वप्न कल्पणार मन, । जें स्वप्न शरीर आणि स्वप्न नयन, । तें जागरीं करी चिंतन । स्वप्नप्रपंच आणि प्रपंचाचें. ॥ १८२७ ॥ ऐसें ब्रह्मभूताचें चित्त, । जें पूर्वी संसारचक्राचें निमित्त, । तेंच आतां प्रसन्न अत्यंत, । या भावें प्रसन्नात्मा देव म्हणे. ॥ १८२८ ॥ कीं प्रसन्नचित्त । तो कीं जो ब्रह्मभूत, । म्हणजे ब्रह्मात्मभावें अद्भुत । 'सर्व आपण' म्हणूनी अनुभव जयाचा. ॥ १८२९ ॥ प्रसन्नचित्त त्याचें । हें विवरण प्रसन्नात्मशब्दाचें,'। आतां "न शोचति न कांक्षति" या दों पदांचें । ऐसें व्याख्यान. ॥ १८३० ॥ कीं, तो शोक करीत नाहीं, । अथवा अपेक्षीतही नसे कांहीं, । म्हणजे प्रारब्धें भोग भोगितांही । शोक न करी, कीं, 'मज विरक्तास हें कां?' ॥ १८३१ ॥ देहप्रारब्धभोगीं प्रवृत्त । जाला, तरी त्यानिमित्त । शोक न

करी, आणि चित्त । न अपेक्षी निवृत्ति वनवासादि. ॥ १८३२ ॥ कीं, ब्रह्मची आपण प्रवृत्ती, । ब्रह्मची आपण निवृत्ती, । म्हणोनी न करी त्याची मनोवृत्ती । शोक, आणि न धरी अपेक्षा. ॥ १८३३ ॥ जो ब्रह्मभूत, । तो शोकअपेक्षाविवर्जित, । म्हणोनी, म्हणे अच्युत । त्याचा अर्थ उचित येथें ये रीती. ॥ १८३४ ॥ शोक, हानि जालिया, न करी; । अपेक्षा धनादिकांची न धरी, । अर्थ ऐसा करावा, तरी । साधकदशेंतही होतेंच यातें. ॥ १८३५ ॥ त्या साधकदशेंतही । हा शोक त्यास नाहीं, । आणि अपेक्षा न धरी कांहीं, । त्या दशेंतही साधक. ॥ १८३६ ॥ परी साधक टाकीं प्रवृत्ती, ॥ आणि साधक धरी निवृत्ती, । म्हणूनी प्रवृत्तियोगें त्याची वृत्ती । शोक करी, धरी अपेक्षा निवृत्तीची. ॥ १८३७ ॥ हें जरी नसे साधकास, । तरी न घडे स्वरूपअभ्यास, । एवं शोक उपजवी प्रवृत्ति त्यास, । अपेक्षा उपजवी निवृत्ती. ॥ १८३८ ॥ सिद्धास तद्विलक्षण । हें बोलों ये लक्षण, । कीं, तो स्वयें सर्वविचक्षण । ब्रह्मभूत योगी. ॥ १८३९ ॥ आतां दुःखस्पर्शें शोक न करी, । आणि सुखस्पर्शें इच्छा न धरी, । अर्थ ऐसा करावा जरी, । तरी हेंही होतें साधकदशेंत. ॥ १८४० ॥ जो 'दुःख कां जालें?' म्हणूनी रडे, । आणि 'सुख हो,' म्हणोनी इच्छेंत बुडे, । त्यासही जरी समाधि सांपडे, । तरी स्वयें पर्वत तरे समुद्रांत. ॥ १८४१ ॥ दुःख भोगितां जरी वाटती कष्ट, । तरी, 'होणार हें' म्हणे, 'माझें अदृष्ट,' । आणि सुखभोग न मानी इष्ट, । न अपेक्षी आणिका सुखातें. ॥ १८४२ ॥ हेंही साधकलक्षण, । सिद्ध बोलावा तद्विलक्षण, । एवं हाच अर्थ, कीं, ब्रह्मभूत विचक्षण । प्रवृत्तिशोक निवृत्त्यपेक्षा धरीना. ॥ १८४३ ॥ आतां सुखदुःखयोग । न कळे सिद्धास भोग, । हा शास्त्रविरुद्ध प्रसंग । स्थळस्थळीं दूषिला. ॥ १८४४ ॥ शास्त्रसिद्ध विचार । मागें या टीकेंत वारंवार । सिद्ध जाला एतत्प्रकार, । कीं, सुखदुःखभोग जीवन्मुक्तासही. ॥ १८४५ ॥ भोगें प्रारब्धाचा क्षय, । भोग सुखदुःखानुभव, ऐसा निर्णय; । जों सुखदुःखाचा नव्हे प्रत्यय, । तों तो भोगची बोलवेना. ॥ १८४६ ॥ हें याही अध्यायांत । पुढें बोलेल भगवंत; । आतां बोलणें हें प्रस्तुत, । कीं, शोक-आणि अपेक्षारहित सिद्ध कैसा? ॥ १८४७ ॥ तरी . सुखदुःख प्रत्यय । न घडेची सिद्धास, हा अल्पदृष्टीचा निर्णय; । कीं, विनाभोग न घडे क्षय । प्रारब्धाचा. ॥ १८४८ ॥ आतां सुखदुःख प्रत्यय असोनी, । न करी

शोक, न धरी अपेक्षा, म्हणोनी । जो अर्थ करावा, तो जाउनी । त्याच्या साधकदशेतें स्पर्शतो. ॥ १८४९ ॥ हें ब्रह्मभूताचें लक्षण । वर्णावें साधकांहूनी विलक्षण, । एवं प्रारब्धदृष्टी विचक्षण । शोक न करी, विषय भोगितां. ॥ १८५० ॥ आणि वनवास, । अथवा आश्रमसंन्यास, । याची अपेक्षा ब्रह्मभूतयोगियास । नाहीं, याचा अर्थ ऐसा. ॥ १८५१ ॥ या पूर्वार्धपर्यंत । क्रम ऐसा बोलिला भगवंत, । कीं, स्वधर्मे जो शुद्धचित्त, । तो नैष्कर्म्यसिद्धि म्हणिजे आत्मज्ञान पावतो. ॥१८५२॥ ऐसा नैष्कर्म्यसिद्धि पावला, । अभ्यासें ब्रह्म होणें असेच त्याला, । म्हणूनी देव बोलिला, । कीं, तोही ब्रह्म कैसा पावतो? तें आईक. ॥ १८५३ ॥ मग बोलोनी त्याचा ऐसा क्रम, । शेवटीं पूर्वश्लोकीं बोलिला पुरुषोत्तम, । कीं, जो ऐसा साधकोत्तम, । तो "**ब्रह्मभूयाय कल्पते.**" ॥ १८५४ ॥ म्हणजे ब्रह्म व्हावया । तो योग्य होतो, धनजया! । साधनसपत्ति ऐसी जया । प्राप्त होते, ॥ १८५५ ॥ तो ब्रह्म जालिया उपरी, । त्याला **ब्रह्मभूत** म्हणे या श्लोकीं हरी, । तो प्रसन्नात्मा शोक न करी, । कांहीं न इच्छी, ऐसें पूर्वार्धीं या बोलिला. ॥ १८५६ ॥ क्रम ऐसा येथपर्यंत, । एकापुढें एक बोलिला भगवंत; । आतां जालियाही ब्रह्मभूत, । असेच अद्भुत प्राप्ति भक्तीची, ॥ १८५७ ॥ ऐसें उत्तरार्धे देव । बोलों पाहतो देवाधिदेव, । आणि ब्रह्मभूत तो तों स्वयमेव । जाला, हें भक्तिप्रसंगीं बोलेल. ॥ १८५८ ॥ कीं, ज्या अनुभवीं योगी ब्रह्मभूत, । त्याच अनुभवीं स्वभक्तीही अद्भुत, । म्हणूनी बोलतो अच्युत । या श्लोकाच्या उत्तरार्धे. ॥ १८५९ ॥

उत्तरार्ध—**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥**

अगा! ब्रह्मभूत योगी जो जाला ब्रह्म, । तो सर्वत्रही स्वयें सम, । आणि भूतांचे ठायीं परम । भक्ति माझी पावतो. ॥ १८६० ॥ "**समः सर्वेषु भूतेषु**" म्हणोनी । "**ब्रह्मभूतत्व**" या दों पदेंकरूनी । बोलोनी भक्ति येथुनी । सांगतो कीं, "**भूतेषु मद्भक्तिं लभते पराम्**". ॥ १८६१ ॥ सर्वांच्या ठायीं सम, । म्हणजे सर्व मायिक जें विषम, । त्या विषमांत सम जें ब्रह्म, । तें स्वयें जो जाला. ॥१८६२॥ तरंग सर्व विषम, । त्यांत सागरची एक सम, । परी तरंगही महिमा पावे परम, । जो समरसे सागरीं सर्वसमीं. ॥ १८६३ ॥ ऐसा देहधारी विषम। त्यांत सम एक जें ब्रह्म, । त्याचें जो पावला ऐक्य परम, । तोही सम सर्वांविषयीं बोलावा. ॥ १८६४ ॥ ऐसा तो ब्रह्मभूत, । अनुभव ज्याचा ऐसा अद्भुत, । तो देखतो कीं, सगुण भगवंत । हींची भूतें. ॥ १८६५ ॥

**भगवत्**पदें षड्गुण । तो चराचर भूतरूपच सगुण । भूतांच्या ठायीं **मद्भक्ति** पावतो म्हणतां खूण, । स्वयें **भगवंत** ऐसी सुचवी. ॥ १८६६ ॥ कीं **मद्भक्ति** म्हणजे मी भगवंत, । त्या माझी भक्ति पावे **ब्रह्म**भूत, । यावरूनी **बोले अनंत**, । कीं **मद्भक्ति** म्हणजे **भग**वद्भक्ती. ॥ १८६७ ॥ आणि **भगवन्नामें**ची **हे गीता । भगवद्गीता** म्हणूनी प्रसिद्धता, । आणि श्रीभगवानुवाच ऐसें तत्त्वतां । भगवत्पदेंची वक्तृत्व **गीते**चें. ॥ १८६८ ॥ तो स्वयें म्हणे, **"भूतेषु मद्भक्तिं लभते"** । आणि **परा** उत्कृष्टा, कीं, पक्कज्ञानें लभ्य होते, । ऐसी **भग**वद्वाणी बोलते । **भग**वद्भक्ति **ब्रह्म**भूतातें. ॥ १८६९ ॥ कीं, जों नव्हे **ब्रह्म**भूत, । तों हे न घडे परा भक्ति अद्भुत, । जो जाला सकळ भूतें स्वयें, तोची निश्चित । मद्भक्ति सर्वा भूतीं पावतो. ॥१८७०॥ **"भूतेषु"** म्हणतां सर्वा भूतीं, । **"मद्भक्ति"** म्हणतां भक्ति **भग**वंतीं, । म्हणजे षड्गुणत्व जें **अ**नंतीं, । तें भूतेंची हीं. ॥ १८७१ ॥ तरी अवघीं अनंत नांवें श्री**नि**वासाचीं, । सर्वही मुक्तिप्रदची साचीं । तथापि **'श्रीभगवानुवाच'** म्हणुनीच **व्यास**ाची । वाणी प्रतिपदीं बोलते. ॥ १८७२ ॥ कीं, वैभव षड्गुण, । हीं भूतेंची आपण सगुण, । उपदेशांत ऐसी खूण । **भग**वंत या **गी**तेंत बोलतो. ॥ १८७३ ॥ म्हणूनी नाम **भगवद्गीता**, । न म्हणती कोणी **कृ**ष्णगीता, । अथवा **गो**विंदगीता, अनंतगीता, । अच्युतगीता, न म्हणती पुराणें. ॥ १८७४ ॥ अतएव या **गी**तेमध्यें **भग**वंत । ज्ञानी आणि भक्त तोची थोर म्हणतो अत्यंत, । एवं उत्तम भक्त तोची जो **भागवत** । **भग**वद्रूप जग आपणामध्यें पाहतो. ॥ १८७५ ॥ षड्गुण हा प्रपंचची निश्चित, । तो भग म्हणावा; आणि तत्प्रकाशक अनंत, । तो स्वआत्मा बोलावा **भग**वंत; । भग तरग, तो सिंधू. ॥ १८७६ ॥ षड्गुण हेंची जग, । याचें नांव **भग**, । षड्विध साकार हा नग, । कनक **भग**वत आत्मा सर्वांचा. ॥ १८७७ ॥ सागराचे जैसे तरंग, । सुवर्णाचे जैसे नग, । तैसें भग नाम हें जग । शरीर **भग**वंताचें. ॥ १८७८ ॥ सागर तरंगवंत, । आणि सुवर्ण अलंकारवंत, । तैसा चिदात्मा **भग**वंत, । उत्तम भागवत उपासक जो ऐसा. ॥ १८७९ ॥ तंतु वसे पटीं, । कीं मातीच वसे घटीं, । सुवर्ण वसे मुकुटीं, । तैसा भूतीं वसे **भग**वंत. ॥ १८८० ॥ **भग**वंत ऐसा सर्वभूतीं, । म्हणूनी त्यास **वासु**देव म्हणती, । अत एव सप्तमीं **"वासुदेवः सर्वमिति । स म-**

---

१. अ० ७, श्लो० १९.

हात्मा सुदुर्लभः" म्हणे भगवंत. ॥ १८८१ ॥ ऐसेंच वासुदेव द्वादशाक्षर । मंत्र बोले, उपासना हे निरंतर, । भगवत्पदें वासुदेवपदें सविस्तर; । जगा भगवंतीं, जगीं भगवंत, देखती. ॥ १८८२ ॥ सागर जैसा तरंगवंत, । तैसा आत्मा उपासकाचा भगवंत, । आणि त्या तरंगामध्यें आद्यंत । सिंधु, तैसा तोच वासुदेव या जगीं. ॥ १८८३ ॥ चिदात्मयावेगळें नसे, । आणि वेगळेंसें जग दिसे, । ज्यांत, भगनामक जग ये रीती गवसे, । तो भगवंत. ॥ १८८४ ॥ भगनामक चराचर ये रीती । वसे ज्यांत, त्यास भगवंत म्हणती, । तरी त्याही भगनामकीं जो जगत्पती । वसे म्हणूनी वासुदेव. ॥ १८८५ ॥ सोनें वसे नगीं, । सागर वसे तरगीं, । ऐसा भगवंत तो भगनामक जगीं । वसे, म्हणूनी वासुदेव. ॥ १८८६ ॥ भगवत्पद वासुदेवपद । दों पदीं मंत्र ऐसा विशद, । तोंडीं प्रणव आणि नमःशब्द ऐसा बंध । द्वादशाक्षर मंत्र हा. ॥ १८८७ ॥ ध्रुवास नारदें उपदेशिला, । तो या मंत्राच्या प्रतापें ध्रुवपद पावला, । आणि ध्रुवपदीं जपों लागला । ध्रुव याच मंत्रातें. ॥ १८८८ ॥ याचा भाव ये रीती, । कीं, साधक हा मंत्र जपती, । ते ब्रह्मभूत ध्रुवपद स्वयें होती, । आणि सर्वभूतीं पावती, या भक्तीतें. ॥ १८८९ ॥ ध्रुवपद म्हणजे पद शाश्वत, । तें ब्रह्म जाला ब्रह्मभूत, । तेथें त्या अनुभवीं अद्भुत । भगवद्भक्ति सर्वभूतीं पावतो. ॥ १८९० ॥ या भावें सप्तमीं श्रीपती । म्हणे, "मां प्रपद्यते वासुदेवः सर्वमिति" । यांत या मंत्राचा अर्थ ये रीती । सुचवी देव. ॥ १८९१ ॥ "बहूनां जन्मनामंते । ज्ञानवान्मां प्रपद्यते । वासुदेवः सर्वमिति" ऐसें बोलते । भगवद्वाणी या अर्थी. ॥ १८९२ ॥ कीं बहुतां जन्माचिया अंतीं । मातें भजे, 'वासुदेवः सर्वमिति" । 'मातें' म्हणतां जगत्पती । सुचवी भगवत्पदातें. ॥ १८९३ ॥ कीं, वक्ता भगवद्गीतेचा । मी स्वये भगवंत साचा, । 'मातें भजें,' म्हणतां याचा । अर्थ सुचवी कीं 'भजें भगवद्रूपातें. ॥ १८९४ ॥ भजतो मातें । म्हणजे भगवद्रूपें जगातें, । त्या जगीं देखे चिदात्मयातें । तेंची सकळही वासुदेव. ॥ १८९५ ॥ सर्वही जग, । त्याचेंची नांव भग, । तें वासुदेवची, जेंवी नाना नग । सर्व सोनें. ॥ १८९६ ॥ हेंची विशद नवमीं । राजविद्या राजगुह्य बोलतां स्वामी । दावी अर्जुनास आत्महेमीं । जगनग

---

१. अ० ९, श्लो० २-१०.

भगनामक. ॥ १८९७ ॥ **"मत्स्थानि सर्वभूतानि । न चाहं तेष्ववस्थितः"** म्हणोनी । आणि **"न च मत्स्थानि भूतानि"** । हेमअलंकारन्यायें उपदेश हा. ॥ १८९८ ॥ भूतें असती ब्रह्मीं, । जैसे अलंकार हेमीं, । तैसीं भूतें मजमाजी, परी मी । भूतीं नसे, जैसें नगीं नसे सुवर्ण. ॥ १८९९ ॥ कीं, जरी असे नग सुवर्णावीण, । तरी त्यामध्यें असे म्हणों ये सुवर्ण, । तेव्हां जे हेमीं आहे म्हणावें भूषण । दिसतें म्हणूनी, परी तेंही नसे. ॥ १९०० ॥ सृष्टि, स्थिति, संहार, । ये रीती जे वारवार, । **भग**शब्दवाच्य हा सर्व प्रकार, । त्यांत **भ**गवंत आत्मा आपला. ॥ १९०१ ॥ ऐसी अघटित घटना । सकळही हे विश्वरचना, । सर्व **भ**गवताची कल्पना, । एक ऐश्वर्यगुण षड्गुणांत. ॥ १९०२ ॥ अत एव **"पश्य मे योगमैश्वरं"** म्हणोनी । नवमीं शेवटीं बोलोनी । **योगऐश्वर**शब्देंकरूनी । ऐश्वर्यगुण सा गुणांतील बोलिला. ॥ १९०३ ॥ **ऐश्वर्य** सामर्थ्यास बोलावें, । तें **योगऐश्वर**शब्दें म्हणावें, । षड्गुणांत ऐश्वर्य हें गणावें. । ऐसी अघटित घटना तेंची सामर्थ्य. ॥ १९०४ ॥ कांहीं नसोनी हें ढिसाळ । कल्पिलें भग हें विशाळ । नाना देश, नाना काळ, । सर्व माया, सत्य **भ**गवंत आत्मा सर्वांचा. ॥ १९०५ ॥ हें जगची ऐश्वर्यगुण; । धर्म, यश, श्री, ज्ञान, वैराग्य संपूर्ण; । या साही गुणांची खूण, । भग म्हणोनी. ॥ १९०६ ॥ प्रथमाध्याय मगळाचरणीं, । आणि नवमीं राजविद्याप्रकरणीं, । अर्थ **भ**गवत्पदाच्या चरणीं । **भ**गवंताच्या अर्पिला. ॥ १९०७ ॥ पुन्हा बोलतां विस्तार । ग्रंथ वाढतो अपार, । विशद विचारणे हा विचार । तिहीं तेथें पाहावा. ॥ १९०८ ॥ अनुभवावयाची हे रीती, । की, जे षड्गुण हे ओळखिले सर्वभूतीं, । त्यांत जे आत्मभक्त अनुभविती । सर्वत्र सर्वभूतीं **भ**गवतातें. ॥ १९०९ ॥ परी यांतही एक उरी । ज्ञानाची देखिली, ते त्याउपरी । त्यातें भक्तीनें विदित होते बरी, । तेव्हां ज्ञान संपूर्ण अनुभवा आलें म्हणावे. ॥ १९१० ॥ आतां यानतर जो श्लोक, । त्या श्लोकीं बोलेल **उत्तमश्लोक**, । त्या श्लोकीं प्रवृत्तीचें निमित्त सुश्लोक । परिसोत आतां याउपरी. ॥ १९११ ॥ कीं, स्वकर्मे पावला चित्तशुद्धी, । त्यास बोलिली नैष्कर्म्यसिद्धी, । ते सिद्धि बोधाचीच समजली बुद्धी, । परी अभ्यासें असे पावणें ब्रह्मत्व. ॥ १९१२ ॥ म्हणूनी त्याचा अभ्यास । बोलोनी, बोलिला **श्री**निवास, । कीं, या साधनीं ब्रह्म

---

१. अ० ९, श्लो० ४–५. २. अ० ११, श्लो० ८.

व्हावयांस । योग्य होतसे. ॥ १९१३ ॥ तो मग बोलिला ब्रह्मभूत, । कीं, चराचर आपणची ऐसें बिंबलें निश्चित, । त्या अनुभवीं उपजे अद्भुत । भगवद्भक्ति सर्वभूतीं. ॥ १९१४ ॥ आचरावें म्हणतां स्वकर्म । येथवरी आला ऐसा क्रम, । त्यांत ब्रह्मभूतांसही प्राप्ति उत्तमोत्तम । भगवद्भक्ति सर्वभूतीं. ॥ १९१५ ॥ हे भक्ति लाधल्याउपरी, । राहिली हेची जाणणियाची पैरी, । कीं, साक्षी आणि निराकार हरी । नाहीं समजला. ॥ १९१६ ॥ षड्गुणरूपें भूतजात, । त्याचा प्रकाशक आत्मा तोच भगवत, । परी तो निर्गुण गुणातीत । आकारमात्रींच सगुणपण तयाचें. ॥ १९१७ ॥ एक नाना अवतार । ते सगुणपण कळले, किंवा विश्वाकार । सगुणसाक्षी आणि निराकार । हें तत्त्व कळणें, हे उरी. ॥ १९१८ ॥ सर्वभूतीं भगवद्भक्ती । आत्मत्वें उपजतां अनुरक्ती, । त्या सगुणत्वाची अभिव्यक्ती । होते, म्हणूनी आरंभिला हा श्लोक. ॥ १९१९ ॥

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ५५ ॥

पूर्वोक्त योगी ब्रह्मभूत । जो सर्व भूतीं पावला भक्ति अद्भुत, । त्या भक्तीकरूनी मातें तो निश्चित । मग जाणतो. ॥ १९२० ॥ कीं, आत्मत्वें निर्गुणाचे ज्ञान । जाले, तेव्हा कळले अधिष्ठान, । त्या विवर्त अधिष्ठानैक्यें परिज्ञान । जाले सगुणपणाचे सर्वभूतीं. ॥ १९२१ ॥ तेथें उपजली भक्ती, । त्या सगुणपणीं अनुरक्ती, । त्या भक्तीनें अधिष्ठानींही अभिव्यक्ती । मग सगुणत्वाची जाणतो. ॥ १९२२ ॥ पहिलें अधिष्ठान निर्गुण, । तदैक्यें विवर्तरूपें प्रपंचीं सगुण, । इतकेंची जाणे, परंतु नेणे खुण, । कीं, अधिष्ठानींच असे सगुणपणही. ॥ १९२३ ॥ कीं निर्धर्म निर्गुण, । तेथें प्रथम मायायोगें सगुणपण; । अवतारी तो सर्वज्ञ निपुण, । अवतार त्याचे सर्वही. ॥ १९२४॥ निराकार जैसे निर्गुण, । निराकारची तैसें सगुण, । सर्वज्ञत्व सर्वसाक्षित्व हेंची खूण । विशेषे तया सगुणत्वीं. ॥ १९२५ ॥ ऐसें बोलती श्रुती, । आणि त्याही सगुणास 'वेद्य' म्हणती, । आणि अद्वैतानुभवानंतरची निरूपिती । ज्ञान ज्ञेय या सगुणाचें.॥१९२६॥ तात्पर्य ऐसें श्रुतीचें, । म्हणूनी या गीतेमध्ये महत्त्व सगुणभक्तीचें, । प्रस्तुतीं हे बोलणें श्रीमतीचें । यास प्रमाण हे श्रुती. ॥ १९२७ ॥

---

१. मकार, रीन, तन्हा. २. एकदरं भूतमात्रे.

**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः ।**
**स एव वेद्यं न च तस्य वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं पुराणम् ॥**

पाणिपाद म्हणजे करचरण । नसोनी, वेग आणि ग्रहण, । नसोनी चक्षु कर्ण, । पाहतो ऐकतो. ॥ १९२८ ॥ आणि हस्ताविण । ग्रहीता म्हणजे करी ग्रहण, । आणि पाय नसोनी वेगपण । कर्म पायांचें. ॥ १९२९ ॥ हें निर्गुणाहीकडे । लक्षणद्वय घडे, । परी दर्शन श्रवण म्हणतां विघडे । अर्थ निर्गुणपणाचा. ॥ १९३० ॥ "अचक्षुः पश्यति । अकर्णः शृणोति" । ऐसें स्पष्ट बोले श्रुती, । हें कदापि निर्गुणीं लागेना. ॥ १९३१ ॥ आणि न म्हणवे साकार, । कीं, कर, चरण, नेत्र, कर्ण, आकार । निषेधूनी मायावृत्तिधर्म यथाप्रकार । दर्शनश्रवण श्रुति बोले. ॥ १९३२ ॥ ज्या मायेपासुनी । जीवांच्या संसारधर्मांकारणें म्हणोनी । पंचभूतें, इंद्रियें, अहंकार, निर्मुनी । सृष्टिचक्र प्रवर्तविलें, ॥ १९३३ ॥ तेच मायेकरूनी । सगुण सर्वज्ञतेनें प्रगट होऊनी, । आकारकरचरणादि न धरूनी । साक्षी सर्व पाहतो. ॥ १९३४ ॥ दर्शनश्रवणादि धर्म । ज्या मायेचे, ते माया उत्तम । अवलंबूनी, निराकार तो सगुण सर्वोत्तम; । अपाणिपाद म्हणोनी वेद वर्णिती. ॥१९३५॥ अपाणि म्हणजे करावांचुनी, । ग्रहणकर्म करितो ग्रहीता म्हणोनी, । वेद बोलती कीं घेणार कर नसोनी, । म्हणजे याचमध्यें सर्व असे. ॥१९३६॥ जेंतें त्याचमध्यें असे, । यालागीं सर्व त्याणेंची घेतलें दिसे; । तें ग्रहणकर्म घडतां, न दिसे । पाणींद्रिय ग्रहणसाधन. ॥१९३७ ॥ ग्रहणसाधन नसोनी, । ग्रहणकर्म घडतें, म्हणोनी, । साक्षी जाणे, यावरूनी अपाणि । आणि ग्रहीता श्रुति म्हणे. ॥१९३८॥ तैसाच अपाद आणि जवन, । जवन म्हणजे सवेग ज्याचें गमन, । अर्थ ऐसा, कीं, जेथवरी धांवे मन, । त्यापुढें तो साक्षी मनाचा. ॥ १९३९ ॥ हें न धांवतां वेगपण, । आणि न घेतां ग्रहण, । बोलिलें, यावरूनी निर्गुण । बोलोत, परी विरुद्ध. ॥ १९४० ॥ बोलोनी ते विरोधप्रकार । दूषिता, होतो ग्रंथविस्तार, । न बोलतां बहु फार, । निवडतें एकच दों गोष्टीनें. ॥ १९४१ ॥ चक्षुरिंद्रियावांचुनी । पाहतो, म्हणोनी । श्रुति म्हणे, आणि कर्ण नसोनी । आयकतो, श्रुति म्हणे. ॥ १९४२ ॥ जेथें हें दर्शनश्रवण, । तेथें प्राप्त जालेंच सगुणपण; । जें स्वयें निर्धर्म निर्गुण, । हे दर्शनश्रवणधर्म कैंचे तया? ॥ १९४३ ॥ आणि अग्र्यपुरुष म्हणोनी । श्रुति बोले, याहीवरूनी, । सगुणाची अग्र्यपदेंकरूनी, । कीं सर्वांहूनी आरंभीं प्रगटतो. ॥ १९४४ ॥ ई-

शरोपाधि माया.। प्रलयकाळीं ब्रह्मीं जाऊनी लया, । पावते पुन्हा उदया । सर्वसृष्टीच्या अग्रभागीं. ॥ १९४५ ॥ तेंच निर्गुणीं सगुणपण, । आणि अनादि तो सगुण,। म्हणोनी तो पुरुष पुराण म्हणजे। सगुणपण पुरातन अनादि. ॥ १९४६ ॥ एवंच साक्षी सगुण, । आणि ज्यास निराकारपण, । प्रस्तुतीं गीता बोले तोच अवतरोनी म्हणे आपण, । कीं, 'त्या मातें भक्तीनें जाणतो.' ॥१९४७॥तरी जें तत्त्व जाणावें, । तें ज्ञेय वेद्य म्हणोनी म्हणावें, । आणि ज्ञेय तों निर्गुणची बोलावें, । ज्ञेयपण कैंचें सगुणातें ? ॥ १९४८ ॥ ऐशी शंका उपजे जया, । हे श्रुति तेही विशद बोलते तया, । कीं, हें निराकारत्व ज्या देवराया । तोची वेद्य. ॥ १९४९ ॥ 'स एव वेद्यं' म्हणोनी । श्रुति या तीं पदींकरूनी । 'तोच वेद्य म्हणे,' यावरूनी । निरसिला हाही संशय. ॥१९५०॥ परंतु वेद्य म्हणजे ज्ञेय, । तें गुरुमुखेंची जाणावें, ऐसा निश्चय । येथें गीताकार बोलतो निर्णय । "भक्त्या मामभिजानाति" म्हणोनी. ॥ १९५१ ॥ कीं भक्तीकरूनी मातें जाणत असे, । येथें गुरुगम्यत्व तों न दिसे, । म्हणूनी कोणी येथें ऐसे । सशंक होती. ॥ १९५२ ॥ तरी अविद्यानिवृत्ति करूनी, । गुरूनें नैष्कर्म्यसिद्धि देउनी, । 'अभ्यास करीं,' म्हणोनी । बोध केला. ॥ १९५३ ॥ तेथूनी गुरूचा उपदेश राहिला, । गुरुसेवेनेंची अभ्यास फळला, । जेव्हां ब्रह्म व्हावया योग्य जाला, । मग जाला ब्रह्मभूत. ॥ १९५४ ॥ त्यावरी तो ब्रह्मभूत । सर्वभूतीं भक्ति पावला अद्भुत, । भूतें भगशब्दें वाचकें, आणि भगवंत । आपण चिदात्मा, ऐसें अनुभवूं लागला. ॥ १९५५ ॥ पहिलें आपणची निर्गुण ब्रह्मभूत, । मग आत्मप्रतीतीकरूनी आपणची भगवंत, । आत्मत्वें सर्वभूतीं प्रीति अद्भुत । पावला, तिचेंची नांव ते भक्ती. ॥ १९५६ ॥ त्या भक्तीच्याही परिपाकेंकरूनी । आपणची सगुण साक्षी म्हणोनी, । निराकार आत्माच सगुणत्वें ओळखोनी, । कृतकृत्य होतो. ॥ १९५७ ॥ ऐसें जें ज्ञेय सगुणत्व, । तेथें देखे आत्मत्व, । भक्तिपरिपाकें कळे हें तत्त्व, । येथें गुरुरूप वेगळें लागेना. ॥ १९५८ ॥ हें भगवद्वाक्यावरूनी । "भक्त्या मामभिजानाति" म्हणोनी । सिद्ध जालें येच रीतीकरूनी, । हें प्रस्तुत श्रुतिही बोलते. ॥ १९५९ ॥

**श्रुति—स एव वेद्यं न च तस्य वेत्ता ॥**

तोची वेद्य म्हणजे ज्ञेय तत्त्वतां, । परी त्यास नसे म्हणे वेत्ता, । म्हणजे त्यास नाहीं कोणी जाणता, । ऐसें श्रुति म्हणे. ॥ १९६० ॥ परंतु पाहतां

विचाररीती, । विरुद्ध बोलिलीसी वाटे श्रुती; । त्या विरोधपरिहारीं, जें **गी**तेंत प्रस्तुतीं, । तें सिद्ध होतें. ॥ १९६१ ॥ विरुद्धपण ये रीती, । कीं, वेद्य म्हणते जेव्हां श्रुती, । तेव्हां वेत्ता कोणी सुमती । असेल, हें सिद्ध. ॥ १९६२ ॥ वेत्ता नाहीं जया, । वेद्यत्व कैंचें तया? । विरोध ऐसा; आतां विरोधास या । प्रस्तुत **गी**तावाक्य परिहरी. ॥ १९६३ ॥ कीं जो ब्रह्मभूत, । तोची सर्वभूतीं आत्मत्वभक्ति अद्भुत । पावोनी, सगुणसाक्षी आत्माच आपला निश्चित । म्हणोनी जाणतो. ॥ १९६४ ॥ तेव्हां वेद्य आपण, । त्या वेद्यपणीं हारपे वेत्तेपण, । श्रुति येथें बोले हे खूण । **"न च तस्य वेत्ता"** म्हणोनी. ॥ १९६५ ॥ आणि तो अग्र्य पुरुष बोले श्रुती, । **भ**गवंत म्हणे **'भक्त्या मामभिजानाति'** । 'मातें जाणतो,' म्हणतां, 'मी सगुण **श्री**पती । त्या मातें जाणतो.' ॥ १९६६ ॥ 'मातें' म्हणतां निर्गुणातें । जाणतो, म्हणतो अर्जुनातें, । ऐसें म्हणतां, व्यर्थ होतें । ब्रह्मभूतत्व पूर्वोक्त. ॥ १९६७ ॥ ब्रह्म कळलं निश्चित, । तो जाला ब्रह्मभूत, । आतां 'मातें जाणतो,' म्हणतो **भ**गवत, । हें सगुणत्व, ऐसें जें श्रुति बोले. ॥ १९६८ ॥ आतां अनतत्वादि लक्षण । जाणतो म्हणतो म्हणावे **क**मलेक्षण, । तरी अनतत्वादि लक्षण कळल्याविण । ब्रह्मभूत कैसा तो जाला? ॥ १९६९ ॥ सत्यज्ञानानंतलक्षण । न कळतां, कैसें कळे निर्गुण? । एवं **"भक्त्या मामभिजानाति"** म्हणतो **क**मलेक्षण । हें अपाणिपाद सगुणत्व. ॥ १९७० ॥ श्रुति म्हणे 'अग्र्यपुरुषाते,' । **भ**गवत म्हणे 'माते', । ऐसें श्रुति**गी**ताएकवाक्यत्व होते, । आणि पूर्वोक्त विरोधपरिहार. ॥ १९७१ ॥ कीं जो ब्रह्म जाला, । सर्वभूतीं आत्मत्वें भक्ति ज्याला, । तो त्या भक्तीनें जाणतो मला, । **दे**व म्हणे. ॥ १९७२ ॥ ब्रह्म जाला, तो जाला निर्गुण, । तो भूतांच्या ठायीं मद्भक्ति पावतो म्हणे षड्गुण, । त्यावरूनी भूतें षड्गुण ऐसी खूण । त्या भक्तीनें 'मातें जाणतो;' म्हणे या श्लोकीं. ॥ १९७३ ॥ तेव्हां हें आपलें सगुणपण । आपण तो म्हणून सुचवी श्रीकृष्ण सगुण, । या अर्थास संमत श्रुतिप्रमाण, । कीं 'निराकार सगुण आणि वेद्य. ॥ १९७४ ॥ वेद्यपण सगुणाते बोलोनी, । श्रुति म्हणे 'वेत्ता नाहीं' म्हणोनी; । येथें **गी**तेतही 'ब्रह्मभूत योगी भक्तीकरूनी । जाणतो' म्हणतां, तोची अर्थ. ॥ १९७५ ॥ कीं आपणास सगुणत्वें जाणे, । तेव्हां वेद्य आपणच, ऐसें बाणे; । मग वेत्ताच नाहीं, यावरूनी **वे**द म्हणे, । **'न च तस्य वेत्ता'** म्हणोनी. ॥ १९७६ ॥ एवं सगुणत्वसाक्षित्व मायेंकरूनी, । त्या मायेचाही प्रकाशक आत्मा आपलाच म्हणोनी । जाणे अनुभवी, याच-

करूनी । 'मातें जाणे' देव म्हणे. ॥ १९७७ ॥ कीं साक्षित्वीं आपण । जें अखंडत्वें देखतोची स्फुरण, । त्यातेंची मायायोगें सर्वत्र साक्षिपण, । त्या मातें जाणतो, हा अर्थ या वाक्याचा. ॥ १९७८ ॥ एवं ज्या आत्मत्वीं निर्गुणत्व । ब्रह्मभूत देखे, त्याचेंची सगुणत्व । भक्तीकरूनी जाणे, हें तत्त्व । देव बोले प्रथमचरणीं या श्लोकाच्या. ॥ १९७९ ॥ "**भक्त्या मामभिजानाति**" । प्रथमचरणीं ऐसें बोले **श्री**पती, । परंतु म्हणतां '**अभिजानाति**' । सुचवी कांहीं विशेष. ॥ १९८० ॥ '**जानाति**' म्हणतां ऐसा अर्थ होतो, । कीं, भक्तीनें मातें जाणतो, । ऐसें असोनी देव म्हणतो । '**अभिजानाति**' म्हणोनी. ॥ १९८१ ॥ या **अभि**शब्देंकरूनी । मातें '**सर्वत्र जाणतो**' म्हणतो, म्हणोनी । सगुणातेंची अधिष्ठानत्व सुचवूनी । देव बोले. ॥ १९८२ ॥ **अभि** म्हणजे सर्वत्र ब्रह्मभूत । मज सगुणातें जाणतो, म्हणे भगवंत; । सर्वत्र हे चराचररचना निश्चित, । या आकारीं मज सगुणातें जाणतो. ॥ १९८३ ॥ जो जो चराचराकार, । त्या त्या आकारीं मी सगुण निराकार, । कल्पूनी तो तो प्रकार । साक्षी पाहतो. ॥ १९८४ ॥ जैसा नृत्य करितां नट, । तो आणि त्याचा एक पट, । त्या पटें दावी नाना खटपट, । नर असोनी, दाखवी भाव नारीचे. ॥१९८५॥ त्या नारीवेशांत सर्वत्र । तो नरची आणि त्याचा पटमात्र, । तैसें चराचर जें विचित्र, । त्यांत ईश्वर कीं माया तयाची. ॥ १९८६ ॥ जैसा तो नट स्वयें पुरुष । जाणोनी बुद्धिपूर्वक दावी स्त्रीवेष, । तैसा निराकार साक्षी परमपुरुष । जाणोनी जगदाकारें कल्पी आपणातें. ॥ १९८७ ॥ देहास षड्भाव जे विकार, । ते स्वस्वरूपीं साक्षी सगुण तो निराकार । कल्पी जाणोनी नाना आकार, । गर्भापासुनी जों नाश होय त्या देहाचा. ॥ १९८८ ॥ ऐसीच ब्रह्मांडकोटिरचना । अघटित या निराकार सगुणाची कल्पना; । तो जें न कल्पी, तें होईल हें घडेचिना; । तेव्हां त्यावीण रिता ठाव कोण? ॥ १९८९ ॥ या अर्थी '**अभिजानाति**' । म्हणूनी म्हणे जगत्पती, । '**अभि**' सर्वत्र, या शब्दाची टीका ये रीती । प्रथम चरणीं. ॥ १९९० ॥ ऐसें **अभि** म्हणजे सर्वत्र । मातें जाणतो म्हणे कमलनेत्र, । कीं, सर्व जे रचनाविचित्र, । त्या रचनेमध्यें मज जाणतो. ॥ १९९१ ॥ जो सर्वत्र ऐसें सगुणत्व । जाणे, त्यास बाणे सगुणाचेंही अनंतत्व, । आणि सगुणाचें काय तत्त्व? । तेंही तत्वतां तो जाणतो. ॥ १९९२ ॥ कीं सर्वत्र जों न पाहे, । तों सगुण अनंतत्वाचा अनुभव न लाहे; । आणि सर्वी सर्वत्र सगुण पाहताहे; । कळतांच निजतत्त्व सगुणाचें. ॥ १९९३ ॥

याालागीं सर्वत्र जाणतो म्हणोनी । प्रथम चरणीं बोलोनी, । आतां म्हणतो द्वितीयचरणेंकरूनी । कीं अनंतत्व सगुणत्व तोची जाणतो. ॥ १९९४ ॥

**द्वितीयचरण—यावान्यश्चास्मि तत्त्वतः ॥**

जितका आणि जो मी असें, धनंजया ! । मज तितकिया आणि तया । तत्त्वता जाणतो, म्हणजे, तत्त्वदृष्टीकरूनियां । मी किती ? आणि कोण ? ऐसें हें जाणतो. ॥ १९९५ ॥ मी जितका म्हणजे अनंत, । त्या मज अनंतत्वें जाणतो निश्चित, । आणि जो मी ऐसें म्हणजे गुणरहित । निर्गुणची मी असें सगुणपणांतही; ॥ १९९६ ॥ त्या मज **तत्त्वता** म्हणजे तत्त्वरीती, जाणतसे, । कीं, तत्त्व दों परी दिसे, । एक सत्य, एक मिथ्या नाना भेदें वसे, । त्यास त्यामध्यें नसोनी. ॥ १९९७ ॥ त्या नाना असत्याचें मूळतत्व । प्रथम ईश्वरोपाधि शुद्ध सत्त्व, । तें उत्तमोत्तम तथापि मिथ्यात्व । त्या सत्त्वाचें चुकेना. ॥ १९९८ ॥ त्या सत्त्वेंकरूनी । सगुणनिराकारत्व सुचवुनी, । पूर्वश्लोकोक्त ब्रह्मभूतही मातें जाणतो म्हणोनी, । प्रथम चरणीं या श्लोकीं **'भक्त्या मामभिजानाति'** देव म्हणे. ॥ १९९९ ॥ द्वितीय चरणीं म्हणतो, । कीं, सगुणपणींही भक्त तो, । जो मी असें त्या मातें जाणतो, । असणें तें निर्गुणपण. ॥ २००० ॥ मायायोगें निर्गुण । बोलावें ब्रह्म सगुण, । ते माया मिथ्या, तीस कैंचें असणेपण ? । निर्गुण सत्यभाग तोची असें. ॥ २००१ ॥ जेंवी पाहतां अलंकार, । असे सोनें, नसे आकार; । तैसा सगुणत्वींही मी सर्वेश्वर । निर्गुणची असें. ॥ २००२ ॥ जो मी असें, धनंजया ! । तो तत्त्वता जाणतो मज तया; । सत्यभाग, मिथ्याभाग, या तत्त्वद्वया । विचारूनी जाणतो; हा अर्थ **तत्त्वता**शब्दाचा. ॥ २००३ ॥ तत्त्वता दोंही तत्त्वांकडे । पाहतां मिथ्याभाग उडे, । तो नाहींच ऐसें म्हणतां, सांपडे । असणें तया सत्यभागाचें. ॥ २००४ ॥ या द्वितीयचरणीं ये रीती । बोलिला श्रीरुक्मिणीपती, । कीं, सगुणत्वीं आपणातें सुमती । अनंतत्वें निर्गुणत्वें जाणतो. ॥ २००५ ॥ ऐसें अनंतत्व निर्गुणत्व आपलें । जाणतो, म्हणोनी, या द्वितीय चरणीं बोलिलें; । तो कोण ? तरी सांगितला प्रथम चरणीं पहिलें । **'भक्त्या मामभिजानाति'** म्हणोनी. ॥ २००६ ॥ भक्तींकरूनी सुमती । मातें जाणतो, म्हणे श्रीपती; । मातें म्हणजे मज सगुणातें ये रीती । प्रथम चरणीं बोलिला. ॥ २००७ ॥ मातें म्हणतां निर्गुण म्हणावें जरी, । तरी हाच ब्रह्मभूत म्हणूनी वैखरी । । पूर्वश्लोकीं बोलिला हरी, । तो 'निर्गुणा मातें जाणतो' म्हणेल हें न घडे. ॥ २००८ ॥ एवंच अपाणिपाद । जो सगुण

होऊनी निराकार गोविंद, । त्या मातें जाणतो मुकुंद । जो ब्रह्मभूत पूर्वी वर्णिला. ॥२००९॥ पूर्वश्लोकीं ब्रह्मभूत । सर्व भूतीं भक्ति पावतो अद्भुत, । म्हणूनी बोलिला अच्युत, । तो मातें म्हणजे निराकार सगुणातें. ॥ २०१० ॥ आणि मातें जाणतो भक्तीकरूनी, । **"भक्त्या मामभिजानाति"** म्हणोनी, । बोलिली जे सर्वभूतीं भक्ति पावतो ज्ञानी, । ते भक्तीनें मातें जाणतो, म्हणे येथें. ॥ २०११ ॥ ते भक्तीनें जाणतो कैसा? । म्हणसी, तरी मी जितका आणि आहें जैसा । म्हणोनी, पूर्वश्लोकीं भक्ति सूचवूनी ऐसा । सगुण मी त्या मातें जाणतो, देव म्हणे. ॥ २०१२ ॥ इतका श्लोकद्वयार्थ । पुन्हा बोलणें लागला एतदर्थ, । कीं, पूर्वोक्त भक्तीनें कैसा हा परमार्थ । सगुणीं आनंदत्वाचा आणि निर्गुणत्वाचा ?॥२०१३॥ हें कळावें म्हणोनी, । म्हणतां **'अभिजानाति'**, **अभि**शब्देंकरूनी । सर्वत्र मज सगुणातें जाणतो, ऐसें सुचवुनी । भक्तीनें सगुणत्वीं अनंतत्व निर्गुणत्व बोध बोलिला. ॥ २०१४ ॥ कीं सर्वत्र पाहतां सगुण । जें सर्वपण, त्यासही नसे अंतपण, । यावरूनी जाणतो खूण । अनंतत्वाची, ऐसें देव सुचवी. ॥ २०१५ ॥ कीं ज्या ब्रह्मीं प्रगटे माया । काळें अनंतत्व जैसें तया, । काळें अनंतत्व उदया लया । मायेचियाही. ॥२०१६॥ जैसें काळें ब्रह्म अनादि स्वयें, । आणि काळें अनंतही निश्चयें, । तैसी माया. सृष्टिस्थितिसंहाररूपत्रयें । अनादि आणि अनंतही. ॥ २०१७ ॥ हा आदि-अंतरहित प्रवाह, । पुन:पुन्हा प्रकृतिपुरुषांचा विवाह; । म्हणूनी काळेंकरूनी जैसा निर्वाह, । ऐसाच देशेंकरूनीही. ॥ २०१८ ॥ एक काळें अनाद्यनंत-पण, । दुसरें देशेंकरूनी बोलती निपुण, । त्यांत काळें आद्यंतहीनत्वाची खूण । हे, कीं, कधींपासूनी कोण काळवरी? हें नसे. ॥ २०१९ ॥ दुसरी आदि, दुसरा ऐसा अंत, । कीं अमुकिया स्थळापासूनी अमुकिया स्थळापर्यंत, । हीं दोन्ही नसे, तें अनादि अनंत । देशेंकरूनी बोलावें. ॥ २०२० ॥ तरी ब्रह्म अनाद्यंत बीज मायेचें, । म्हणूनी काळेंकरूनी जैसें त्याचें । अनादित्व अनंतत्व, तैसें त्या शक्तीचें । अनादित्व अनंतत्व देशेंकरूनीही. ॥ २०२१ ॥ कीं ब्रह्म कोठोनी कोठपर्यंत? । ऐसी आदि आणि नसे अंत, । म्हणूनी देशेंकरूनीही अनादि अनंत । मायेचिया बीजाचें. ॥ २०२२ ॥ कोठोनी कोठ-पर्यंत । बीजास ये रीती नसे जेंवी आदि अंत, । तैसीच मायाही अनादि अनंत, । जे, उदय पावोनी, लय त्या बीजीं पावते. ॥ २०२३ ॥ कीं वस्तु-स्वभाव हा ब्रह्मीं, । म्हणूनी उदय लय मायेचा तया निर्धर्मी, । सिद्धांत ऐसा निगमागमीं, । त्या स्वरूपीं नसे स्वरूपभेद. ॥ २०२४ ॥ कीं पिकाची भूमि

जेथें, । धान्य आणि तृण उपजे तेथें, । ऊखर भूमीस न पिके, ऐसा येथें । ब्रह्मीं मायेचा न बोलवे उदयलय. ॥ २०२५ ॥ मध्यें एकदेशी माया प्रगटे, । तितकेंच ईश्वरत्व उमटे, । तितकियाचमध्यें विश्व आणि तेथूनी तुटे। साक्षित्व ईश्वराचें. ॥ २०२६ ॥ बोलतां ऐसें मुखें, । उरलें ब्रह्म ऊखरभूमिकेसारिखें, । जेथें माया त्याहूनी पारिखें । उरलें ब्रह्म, ऐसें लागतें.॥२०२७॥ आणि त्या निर्गुणीं इच्छा न दिसे, । वस्तुस्वभावें माया होतसे, । ते मायेसची सत्ता गवसे, । कीं, ते एके स्थळीं उपजों शके स्वइच्छेनें. ॥ २०२८ ॥ आतां चित्सत्तास्वरूप ब्रह्म, । परी तें मायेवेगळें निर्धर्म, । त्या ब्रह्मीं नसे इच्छारूप धर्म, । कीं, एकदेशी माया तें उपजवी. ॥ २०२९ ॥ मायेचा प्रादुर्भाव । आणि लयही तेथेंची हा वस्तुस्वभाव, । त्या वस्तुस्वभावीं कोण ठाव । माया प्रसवाचा आणि वंध्यापणाचा? ॥ २०३० ॥ ऐसे उदंड दोष लागती । एकदेशी माया बोलतां ये रीती, । एवं ब्रह्म आणि माया आणि ईश्वर मायापती । आदि अंत इतकियांसही न बोलवे. ॥ २०३१ ॥ एवंच कोठोनी कोठपर्यंत? । हीं ब्रह्मीं जैसा नसे आदि अंत, । तैसी माया आणि तिच्या योगें सगुण भगवंत । तोही अनंत सगुणत्वीं बोलावा. ॥ २०३२ ॥ तो अनंत साक्षी द्रष्टा, । दृश्यां अनंतां ब्रह्मांडांचा स्रष्टा, । पंक्ति अनंता उत्कृष्टा । ब्रह्मांडांचिया तो करी. ॥ २०३३ ॥ आपणास आपण । कल्पी चराचराकार सगुण, । आपण निर्गुण सगुण त्रिगुण, । हा अखंड अनुभव जयाचा.॥२०३४॥ म्हणूनी वेदीं पुराणीं । ऐसें, कीं, अनंतां ब्रह्मांडांचिया श्रेणी । मागें या यथार्थदीपिकेमध्यें वाणी । त्या वाक्यविवरणींही चालिली. ॥ २०३५ ॥ बोलतां तेंची वारंवार, । होतो बहुत ग्रंथविस्तार, । प्रस्तुत म्हणे जगदाधार । याच भावें 'अभिजानाति' म्हणोनी. ॥ २०३६ ॥ अभि म्हणजे सर्वत्र । जे भूतसृष्टि सर्वही विचित्र, । त्या भूतीं, म्हणे कमलनेत्र, । सर्वत्र मज सगुणातें जाणतो. ॥ २०३७ ॥ सर्वत्र ऐसा तो जाणतो, । ज्यास सर्व भूतीं योग भक्तीचा बाणतो, । त्या भक्तीनें मातें सर्वत्र जाणतो, म्हणतो, । आणि जाणतो मी जितका असें; ॥ २०३८ ॥ कीं सगुणपणें सर्वत्र ज्यास पूर्वी पाहे, । त्या सर्वांसही अनंतत्व आहे, । तेव्हां त्यास अंत केंवी साहे? । जो स्रष्टा कल्पक साक्षी तयाचा. ॥ २०३९ ॥ ब्रह्मांडांच्या अनंत पंक्ती, । त्या सर्वां भूतीं भगवद्भावें भक्ती, । त्यांचा साक्षी कल्पक, तयाची अभिव्यक्ती । त्या सर्वां भूतीं सर्वत्र. ॥ २०४० ॥ सातां आवरणासहित । ब्रह्मांड एक आठवी चित्त, । त्यापुढें साक्षी अनंत, । त्या अनंतीं तैसेंची त्यापुढें ब्रह्मांड दुसरें. ॥ २०४१ ॥

ऐसी दाही दिशांकडे रचना, । पंक्ति ब्रह्मांडांचिया नाना, । तो साक्षी निराकारमूर्तीची अनंत कल्पना । अनंता आपणावरी कल्पी. ॥ २०४२ ॥ तरंग एक व्यापिला, । त्या तरंगापुढें तो समुद्र उरला, । त्या सागरींच त्याहीपुढें देखिला । दुसरा तरंग. ॥ २०४३ ॥ उरला व्यापूनी एक लहरी, । त्याच सागरीं लहरी दुसरी, । तेही व्यापूनी उरला, तों तिसरी, । ते लहरीही पुढें समुद्र. ॥ २०४४ ॥ एकदेशी दृष्टांत, । एवं ब्रह्मांडें ऐशा साक्षिस्वरूपांत, । तें कोठूनी कोठपर्यंत । अंत ऐसा न दिसे तया ईश्वरासही. ॥ २०४५ ॥ कीं आदि अंत सर्वथा नसे; । जें नसे, तें कोठोनी गवसे, । डोळसाही वंध्यापुत्र न दिसे । म्हणूनी काय तो अंध? ॥२०४६॥ ब्रह्मांडासही नाहीं अंत, । जें नाहींच, तें न देखे अनंत, । या गोष्टीनें तो भगवंत । कोण म्हणों शके, नव्हे सर्वज्ञ म्हणोनी? ॥ २०४७ ॥ ऐसीं भगवद्रूपें भूतें, । ब्रह्मांडें अनंतें अद्भुतें, । तीं भगवद्रूपें ध्यातां बहुतें, । त्या भक्तीनें सर्वत्र त्यातें अरूपत्वेंही जाणतो. ॥ २०४८ ॥ म्हणूनी म्हणे श्रीपती, । कीं, '**भक्त्यामामभिजानाति**' । **अभि** म्हणजे सर्वत्र जाणतो ये रीती । मग म्हणे '**यावान्यश्चास्मि तत्त्वतः.**' ॥ २०४९ ॥ कीं भक्तीनें सर्वत्र जाणे, । तेव्हां मी जितका असें तें बाणे, । एवं भक्तीनें सर्वत्र जाणतां म्हणे । अनतत्व माझें जाणतो.॥२०५०॥ ऐसें '**अभिजानाति**' म्हणोनी । म्हणतां, या **अभि**शब्देंकरूनी । सर्वत्र सर्वत्वाच्या अनंतत्वावरूनी । स्रष्टा अनंत ऐसें जाणतो, हा अर्थ. ॥२०५१॥ आणि द्वितीयचरणीं **स्वामी** । म्हणे '**यावान्यश्चास्मि**' । कीं अनंतां ब्रह्मांडीं जितका जो असें मी, । तितकिया त्या मातें अरूपत्वें जाणतो. ॥ २०५२ ॥ तरी जितका म्हणजे अनंत, । तें अनंतत्व आपलें अत्यंत, । कैसें जाणतो? म्हणेल कुंतीसुत, । तरी प्रथमचरणींच तें बोलिला कीं, **भक्त्या मामभिजानाति.**' ॥ २०५३ ॥ म्हणजे सर्वत्र मातें जाणतो, । कीं, सर्वही अनंततत्वेंची पाहतो, । त्या सर्वीं सर्व जितका मी, तितकियास तो । अनंतत्वें सगुणा अरूपातेंही जाणतो, अर्थ ऐसा. ॥ २०५४ ॥ आणि सर्वभूतीं जे भक्ती, । त्या भक्तीनें माझी सगुण निराकार व्यक्ती । जाणतो, त्या सगुणींही अभिव्यक्ती । चित्स्वरूपी अनंताचीच देखतो. ॥ २०५५ ॥ कीं भूतरचनाही अनंतकल्पना । ते न स्फुरे त्या चित्प्रकाशाविना, । आणि ज्या सगुणा अनंताची ते कल्पना । त्याचें सगुणपणही त्यावेगळें न स्फुरे. ॥ २०५६ ॥ एवं सर्व प्रकाशची चित्स्वरूप, । त्या चित्प्रकाशेंच स्फुरे सगुणपणही अरूप, । आणि ब्रह्मांडतरंग नानारूप । त्याच चित्सागरें कळती. ॥ २०५७ ॥ तेव्हां

तो चित्समुद्रची असे, । इतर कांहींच त्यावेगळें नसे, । तोची असे, नसे जें जें त्याकरितां दिसे, । ऐसें तत्त्वता जाणे सगुणही. ॥ २०५८ ॥ अपाणिपाद सगुण । तोही पाहतां त्याची ही खूण । उडे सगुणत्वाची, उरे निर्गुण, । कीं नसे माया, असें तें ब्रह्म. ॥२०५९॥ यालागीं दुसरिया चरणीं । 'यश्चास्मि' म्हणे चक्रपाणी, । कीं, सगुणा मातें जाणोनीही, त्या सगुणीं । जो मी असें, त्या मातें जाणतो. ॥ २०६० ॥ अतएव दुसरिया चरणाच्या अंतीं । तत्त्वता म्हणे जगत्पती, । कीं, मायातत्त्वें सकळही नसती, । असे तें तत्त्व सत्य चित्स्वरूप. ॥ २०६१ ॥ एवंच सगुणभक्त । तथापि सगुणीं निर्गुणची देखे अव्यक्त, । तत्त्वता जाणोनी अनुरक्त । सगुणीं म्हणूनी हा भाव. ॥ २०६२ ॥ येथपर्यंत तत्त्वनिर्धार । केला, यांत भक्तीचाच बडिवार, । जो अठरा अध्यायांत वर्णिला वारंवार, । तो तत्त्वरीती स्पष्ट येथें बोलिला. ॥ २०६३ ॥ सप्तमीं भक्त जो ज्ञानी, । तोच थोर सर्वा भक्तांहुनी, । ऐसें बोलोनी, द्वादशीं जे नुसते ज्ञानी । त्यांहुनी भक्त योगवित्तम सम्मत देव म्हणे. ॥ २०६४ ॥ ऐसा सप्तमीं द्वादशीं । जो ज्ञानयुक्त सगुणभक्तिमहिमा उपदेशी, । तो ऐसी यानिमित्त, ऐसें अष्टादशीं । स्पष्ट सिद्धांतरूपें बोलिला. ॥ २०६५ ॥ कीं जो ब्रह्मभूत, । ब्रह्माद्वैत अनुभवी अद्भुत, । तोही सर्व भूतीं भक्ति करितो, म्हणे अच्युत । पूर्वश्लोकीं उत्तरार्धीं. ॥ २०६६ ॥ "**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा**" या श्लोकेंकरूनी । "**सर्वभूतेषु मद्भक्तिं लभते परां**" म्हणोनी, । स्पष्ट भगवंत बोले, यावरूनी । द्वादशीं योगवित्तम संमत भक्त म्हणे. ॥ २०६७ ॥ आणि सगुणभक्तीचें महत्त्व । सगुणपणाचें अगम्य तत्त्व, । भक्तीकरूनी सगुणीं निराकारत्व । जाणतो, म्हणे या श्लोकीं. ॥ २०६८ ॥ "**भक्त्या मामभिजानाति**" । भक्तीनें मातें जाणतो म्हणे श्रीपती, । तो तों जो पूर्वश्लोकीं ब्रह्मभूत सर्वा भूतीं । भक्ति पावतो म्हणोनी बोलिला. ॥ २०६९ ॥ जाणोनी निर्गुणातें, । ब्रह्मभूत होऊनी भक्तीतें । सर्व भूतीं पावला तो मातें । जाणतो, म्हणे. ॥ २०७० ॥ येथें निर्गुणा मातें । जाणतो, ऐसें बोलवेल कवणातें? । कीं आधीं जाणोनी निर्गुणातें, । मग ब्रह्मभूत म्हणजे ब्रह्मच जाला. ॥२०७१॥ तो निर्गुणातें मागुतीं । भक्तीनें जाणतो, ये रीती । बोलेल सर्वज्ञ रुक्मिणीपती । हें काय घडे? ॥ २०७२ ॥ आतां याहीवरी । जे अभिमानें कोणी वैखरी । चाळितील, ते खरी । न मानितील संत निर्मत्सर. ॥ २०७३ ॥ अतएव याच अध्यायाच्या अंतीं । गीतार्थनिरूपणाचा महिमा श्रीपती । बोलेल, तेथें म्हणेल

---

१. अ० ७, श्लो० १७. २. अ० १२, श्लो० २.

ये रीती । कीं भक्ति थोर या गीतेंत. ॥ २०७४ ॥ भक्तच श्रवणाधिकारी, । आणि गीतार्थ सांगणारे, तिंहीं बरी । विशद करूनी भक्तीची थोरी, । अर्थ या गीतेचा सांगावा. ॥ २०७५ ॥ "ये इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति । भक्तिं मयि परां कृत्वा" म्हणूनी श्रीपती । बोलेल, याची व्याख्यानरीती । तेथेंची विशद होणार. ॥ २०७६ ॥ मथितार्थ या लोकीं । बोलेल भगवंत इतकाच कीं, । जो हें गुह्य मद्भक्तांपासीं या श्लोकीं । भक्ति थोर करूनी सांगेल. ॥ २०७७ ॥ त्याहूनी प्रिय कोणी मला । न होणार, आणि मागें नाहीं जाला; । श्लोकद्वयें ऐसी वचनमाला । गुंफील याच अध्यायांत भगवंत. ॥ २०७८ ॥ एवच भक्ति थोर या प्रस्तुतीं ऐसी म्हणोनी । बोले, तेच विशद करूनी । जो भक्तापाशीं सांगेल, त्याहूनी । प्रिय मज कोणी नसे, म्हणे देव, ॥ २०७९ ॥ एवच 'भक्ति थोर करूनी,' । हें स्ववाक्य अवलंबुनी । सांगेल तो प्रिय अत्यंत मज, म्हणोनी । देव म्हणे. ॥ २०८० ॥ कीं निर्गुणवादाभिमानी । तो जन या गोष्टीते न मानी, । हें सर्वज्ञशिरोमणी जाणोनी । 'मद्भक्तेष्वभिधास्यति' म्हणेल. ॥ २०८१ ॥ कीं त्या भक्तापाशीं ये रीती । अर्थ सागता, त्याची मती । क्षोभोनी, अर्थास अन्यथा गती । लावील, हे टीका न कळतां. ॥ २०८२ ॥ ऐसें भगवद्वाक्याचें बळ, । आणि सैन्य युक्तीचें प्रबळ, । आणि टीका करावयाची सूचनाही केवळ । गीताकारची तो करितसे; ॥ २०८३ ॥ कीं, भक्ति थोर करूनी । भक्तांपाशीं गीता वाखाणावी, म्हणोनी । म्हणे स्वये भगवत, यावरूनी । अर्थ ऐसा वर्णिला. ॥ २०८४ ॥ नसे येथें क्लिष्ट कल्पना, । नव्हे विपरीत अर्थरचना; । हेही जयास मानेना, । त्यास मध्यस्थ निर्मत्सर हसतील. ॥ २०८५ ॥ अभक्तांची भीड काय? । कीं जें बोलतो विश्वकाय, । त्यास विपरीत कल्पना करूनी, हाय! हाय! । न वाचोत ते अभक्त हे टीका. ॥ २०८६ ॥ दिवांध होती कष्टी, । न पाहती सूर्यास दृष्टी, । म्हणोनी त्याच्या तेजें सृष्टी । काय न प्रकाशेल? ॥ २०८७ ॥ आतां उत्तरार्धे देव । काय बोलतो देवाधिदेव, । आणि अर्थ त्याचा तो स्वयमेव । काय वाखाणितो, तो पाहों. ॥ २०८८ ॥ क्रमेंची येथपर्यंत । प्राप्ति एकापुढें एक बोलिला भगवत, । शेवटीं भक्तीनें तो अरूप सांक्षी जाणे अनत, । आणि सगुणत्वीं निर्गुणची जाणे, ऐसें बोलिला. ॥ २०८९ ॥ जोंवरी देह प्रारब्धाचा जितो, । तोवरी या प्राप्तीनें असतो, ।

१. अ० १८, श्लो० ६८.

ब्रह्मभूत होऊनी करितो । सगुणभक्ती. ॥ २०९० ॥ भक्त ऐसा निपुण । ज्या सगुणाचा, त्याची ही खूण । जाणतो, कीं, आहे तें शुद्ध निर्गुण । सगुणपणींही तत्त्वता. ॥ २०९१ ॥ क्रम ऐसा आला येथवरी, । आतां ऐसें तत्त्व जाणोनी, त्याउपरी । प्रारब्ध सरतां, त्याची हरी । गति सांगतो उत्तरार्धे. ॥ २०९२ ॥

उत्तरार्ध—**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥**

अगा! जितांच जाला जो ब्रह्मभूत, । सर्वभूतीं भक्ति पावला अद्भुत, । मी सगुणत्वीं अनंत आणि निर्गुण ऐसें निश्चित । तत्त्वता जाणोनी, मजमध्यें प्रवेशतो. ॥ २०९३ ॥ ऐसें बोलिला सर्वेश्वर, । परंतु '**ततः**' म्हणजे त्यानंतर, । ऐसें बोलोनी, मागुती 'तदनंतर । प्रवेशतो' म्हणे पुनरुक्ती. ॥२०९४॥ तरी '**ततः**' म्हणजे त्यानंतर । पूर्वोक्त तत्त्व जाणोनी मग म्हणे सर्वेश्वर । प्रवेशतो, तो प्रवेश अनंतर । म्हणिजे अंतरहित प्रवेश तो. ॥ २०९५ ॥ चिदंश पूर्वींच ब्रह्मभूत, परी । प्रारब्धभोगाची होती उरी, । म्हणूनी भोक्ता चिदंश संसारी । भोगकाळीं जळीं प्रतीबिंबे बुद्धीच्या. ॥ २०९६ ॥ जेव्हां सुखदु:खभोग, । तेव्हां बुद्धींतची प्रतिबिंबयोग, । कीं, चिदंशावांचूनी भोगसंयोग । न घडे जडांशा मनआदिकां ॥ २०९७ ॥ निर्णय हा त्रयोदशीं,[1] । निर्णय हा पंचदशीं, । '**ममैवांशो जीव**'[2] येथूनी उपदेशी, । हेंची भगवंत. ॥ २०९८ ॥ कीं जडवर्गास जो जीववी जीव, । तो अंश माझा, म्हणे देव, । भोक्ता तोची स्वयमेव, । मोक्षही तयातें. ॥ २०९९ ॥ ज्यास दु:खसंबंध, । त्यालाच संसाराचा बंध, । ज्यास बंध, तोची अंध । अविवेंकरूनी.॥२१००॥ एवं अज्ञानबंध जया, । मोक्षही बोलावा तया, । भोग मोक्षही न बोलवे जडमात्रास या, । आणि भोग नसे व्यापका चिद्रूपासही. ॥ २१०१ ॥ यालागीं ज्ञानियासही प्रारब्धभोग । न घडे विना चिदंशयोग, । बुद्धीस जेव्हां चिदंशसंयोग । ब्रह्मात्मता अंतरे तेधवां. ॥ २१०२ ॥ प्रारब्ध सरलियावरी । मोक्ष सगुण अथवा निर्गुण, परी । भोग नाहीं तदुपरी, । निरंतर मग तो प्रवेश. ॥ २१०३ ॥ प्रवेशतो मग निरंतर, । निरंतराचेंचि नांव अनंतर, । या अर्थीं बोलेल सर्वेश्वर । '**विशते तदनंतर**' म्हणोनी. ॥ २१०४ ॥ **ततो** म्हणजे त्याउपरी । जितांच तत्त्व जाणिलियावरी, । प्रवेशतो, म्हणे हरी, । ऐसें प्रवेशणें तें अनंतर. ॥ २१०५ ॥ तदनंतर म्हणजे जें अनंतर, ।

---

१. अ० १३, श्लो० २७. २. अ० १५, श्लो० ७.

कीं, तें प्रवेशणें विना अंतर, । प्रारब्धभोग सरल्यावरी म्हणे सर्वेश्वर । प्रवेशांत अंतर असेना. ॥ २१०६ ॥ होता प्रारब्धें देह जीवंत, । तेव्हांही प्रवेशला होताच, तरी ब्रह्मभूत । परंतु भोगकाळीं बुद्धींत । प्रगट होत होता चिदंश तो. ॥ २१०७ ॥ तरंग सागरीं मुरे, । ऐसी ब्रह्मीं बुद्धि शिरे; । परंतु प्रारब्धवायु जेव्हां संचरे, । तेव्हां तरंग उठे मागुतीं बुद्धीचा. ॥ २१०८ ॥ उठे बुद्धीची लहरी, । तेव्हां प्रतिबिंबे चिदंश तीभीतरीं, । भोग सरे तोंवरी । चिदंश पडे वेगळा. ॥ २१०९ ॥ ज्ञानदृष्टी ज्ञानी । ये वेळे भोक्ता प्रगटला म्हणोनी । जाणती, हें वर्म अज्ञानी । न जाणती, ऐसें पंचदशीं देव म्हणे. ॥ २११० ॥

पंचदशाध्यायश्लोक—**उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।**
**विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥**

मागें या श्लोकाची टीका । विशद समर्पिली श्रीशेषपर्यंका, । प्रस्तुत प्रसंग हाच इतुका, । कीं, भोक्तयातें न देखती मूढ, देखती ज्ञानी. ॥२१११॥ भोग आतां भोगितो, । आतां गुणान्वित तो, । जैसा जैसा असतो, । तैसा तैसा ज्ञानदृष्टी पाहती. ॥ २११२ ॥ म्हणे भगवंत ये रीती, । एवं ज्ञानी यातें भोगितां पाहती, । मूढ देहात्मता मानूनी भोगिती । प्रारब्धफळें. ॥२११३॥ प्रस्तुतीं ऐसा प्रसंग, । कीं, प्रवेश अंतररहित बोले श्रीरंग, । कीं, सरतां प्रारब्ध, तो निःसंग । प्रवेशतो ऐसा कीं अंतर नसे. ॥२११४॥ प्रारब्ध असतां जो प्रवेश, । तो भोगकाळीं चिदंशास लेश । अंतर करी म्हणूनी हा गुह्योपदेश । प्रारब्ध सरल्यानंतर प्रवेशाचा. ॥ २११५ ॥ अंतर नसे जैसें, । तें प्रवेशणें अर्जुना! तैसें, । बोले भगवंत ऐसें । म्हणतां '**विशते तदनंतरम्.**' ॥ २११६ ॥ एवं '**ततो**' म्हणजे त्याउपरी, । प्राप्तीची सीमा जालियावरी, । प्रवेशतो ऐसा तदंतरीं, । कीं जैसें निरंतर. ॥ २११७ ॥ जे क्षणीं प्रारब्ध सरे, । भोगणें कांहीं नुरे, । तेव्हां चिदंश कां संचरे । उपाधींत ? ॥२११८॥ निर्गुण मोक्षीं शुद्धसत्त्व, । तेंही नुरे उरे निर्गुणची तत्त्व, । सगुणमोक्षीं भगवत्स्वरूपत्व । शुद्धसत्त्वास भक्तांच्या. ॥ २११९ ॥ भक्तास सगुण साकारीं भक्ती, । त्या भक्तीनेंची हे सगुण अभिव्यक्ती, । अंतींही त्यास साकारव्यक्ती । सारूप्यमोक्षीं हा सिद्धांत. ॥ २१२० ॥ चित्प्रतिबिंबास बिंबीं प्रवेश, । प्रारब्ध सरतांच, ऐसा कीं अंतर नव्हे लेश, । म्हणूनी म्हणे हृषीकेश । '**विशते**

---

१. अ० १५, श्लो० १०. २. 'ज्ञानियातें' असा पाठ आढळतो.

**तदनंतरं'** म्हणोनी. ॥ २१२१ ॥ संसारभोग ज्या चिदंशाला, । प्रवेश अंतररहित बोलिला त्याला, । आणि भक्ति सगुणीं बोलतां सुचविला । सगुण-मोक्ष. ॥ २१२२ ॥ ज्ञानियास जो स्वसुखानुभव, । कैवल्यमोक्षीं नुरे तें वैभव, । जरी चुकला पुनर्भव । सुखानुभव गेला थिता हातींचा. ॥ २१२३ ॥ सगुणमोक्षीं शुद्ध सत्त्व । पावोनी भगवत्स्वरूपत्व । सर्वदा सगुण निर्गुण महत्त्व । अनुभवी भक्तियोगें. ॥ २१२४ ॥ ज्यास सगुणाची भक्ती, । त्या ज्ञानियास हे सगुणमुक्ती, । येविषयीं श्रुतीची उक्ती । आणि चतुर्दशीं भगवंतही बोलिला. ॥ २१२५ ॥ चतुर्दशीं प्रथम श्लोक, । तेथें म्हणे उत्तमश्लोक, । कीं, हें ज्ञान जाणोनी मुज्ञ लोक । परम सिद्धीतें पावले. ॥ २१२६ ॥ दुसरिया श्लोकीं श्रीपती । याच ज्ञानें म्हणे माझी साधर्म्यगती । पावले, ते जगत्सृष्टिकाळीं न उपजती, । व्यथा न पावती संहारीं जगाच्या. ॥ २१२७ ॥ एवं ज्ञानी निर्गुण उपासिती, । ते निर्गुणातेंच पावती; । ज्ञानी आणि सगुण जे सेविती, । ते भक्त पावती साधर्म्य. ॥ २१२८ ॥ साधर्म्य म्हणजे सधर्मता, । सधर्मता म्हणजे सगुणता, । एवं ज्ञानेंची मोक्ष अवघेही तत्त्वतां, । परी सगुणभक्तातें सगुणमोक्ष. ॥ २१२९ ॥ चतुर्थाध्यायांत । ऐसें बोलिला भगवंत, । कीं जे जैसे भजती मातें, मी अनंत । तैसाच त्यांतें भज-तसें. ॥ २१३० ॥ "**ये**[1] **यथा मां प्रपद्यंते**" या श्लोकेंकरूनी । "**तांस्त-थैव भजाम्यहं**" म्हणोनी । केला ऐसा सिद्धांत नेमुनी, । कीं, जैसे भजती, तैसा त्यांतें मी पावतों. ॥ २१३१ ॥ आतां काय बोलोनी, बहुत? । जो भक्ति पावला ब्रह्मभूत, । मोक्ष सगुणची अद्भुत । तया योगिया भक्तातें. ॥ २१३२ ॥ धन्य ज्ञानियाची भक्ती । धन्य भक्तांची सगुणमुक्ती, । मोक्षांतही अखंडानंदरूपें अनुरक्ती । श्रीचरणीं श्रीपतीच्या. ॥ २१३३ ॥ आतां यानंतर श्लोक, । तो कां बोले उत्तमश्लोक । निमित्त त्याचें सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥२१३४॥ जें ज्याचें स्वकर्म, तें त्याला । मोक्षहेतु, ऐसें मागें बोलिला, । त्यावरूनी मो-क्षपर्यंत आला । हा प्रसंग. ॥ २१३५ ॥ तों साधनें आणि प्राप्तीही क्रमें । ज्या बोलिल्या पुरुषोत्तमें, । त्या ऐकिल्या पांडवोत्तमें, । बुद्धि भरली अनु-भवीं. ॥ २१३६ ॥ पुढें युद्ध करावें, । आणि राज्यसुख भोगावें, । हें या अनुभवास पांडवें । मानिलें विघ्न. ॥ २१३७ ॥ कीं हा अनुभव अकर्म, । यास विघ्नकारक सर्व कर्म, । आणि ज्या प्राप्तीकारणें करावे स्वधर्म, । ते प्राप्ति

---

१. अ० ४, श्लो० ११.

मी पावलों. ॥ २१३८ ॥ आतां याच अभ्यासीं कां न पडों ? । याच अनुभव-सुधासागरीं कां न बुडों ? । यास विघ्नकारक, त्यांत कां सांपडों ? । कां करूं कर्मे लौकिकें, वैदिकेंही ? ॥ २१३९ ॥ कीं आतां पडिलों कर्मी जरी, । अनुभव कैंचा हा तदुपरी ? । हें शाश्वतपद कोणे परी । मग कर्मप्रवाहीं मी पावेन ? ॥ २१४० ॥ ऐसा शंकला पार्थ, । कीं कर्मप्रवाहीं कैंचा परमार्थ ? । तो हा भाव समजोनी समर्थ । बोलतसे या श्लोकीं. ॥ २१४१ ॥

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥**

अगा ! ज्यास आश्रय माझाच केवळ, । तो कर्मे करी जरी सकळ, । माझ्या प्रसादें तो पावतो जें अढळ । पद, अशाश्वत, आणि अविनाशी. ॥ २१४२ ॥ म्हणसी करितां कर्माचरण, । कैसा तुझा आश्रय करिती निपुण ? । तरी तूतें सांगतों त्याची खूण, । आइक या श्लोकीं. ॥ २१४३ ॥

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥**

अगा ! बुद्धीकरूनी । सर्व कर्मे माझे ठायीं समर्पूनी, । आणि मीच थोर वाटे ऐसा मत्पर होउनी । सर्वदा माझे ठायीं लावीं चित्त. ॥ २१४४ ॥ परंतु तू जालासी ज्ञानी, । म्हणी त्या बुद्धियोगातें सांडोनी, । उगाच कर्म मात्र समर्पुनी । सोडिसी अद्वयानुभव. ॥ २१४५ ॥ आणि जिज्ञासु जनासारिखें चित्त । उगेंची माझ्या ठायीं लाविसी चित्तवृत्त, । तरी तूं ज्ञानी अनुभवी जालासी या निमित्त । बुद्धियोगाचा आश्रय करूनी होईं ऐसा. ॥ २१४६ ॥ अगा ! बुद्धीचा आणि बुद्धिप्रकाशाचा । योग आयताची कीं साचा, । जैसा दृष्टीचा आणि रज्जूचा । योग असोनी, अज्ञानें सर्प दिसे. ॥ २१४७ ॥ होतां अज्ञाननिवृत्ती, । जातां दृष्टीमधील भ्रांती, । सर्प देखतांही आयती । दृष्टि लागलीच होती रज्जूनें. ॥ २१४८ ॥ ऐसी अविद्या बुद्धींत होती, । तरी चैतन्यास स्पर्शलीच होती मती, । परी अज्ञानें बुद्धींत होती जड भ्रांती, । जडीं चैतन्य न दिसे तें तीस. ॥ २१४९ ॥ परंतु रज्जुसर्पाचा दृष्टांत । सर्वत्र उपयोगीं नव्हे अत्यंत, । कीं, दोर देखतां, मग त्यांत । सर्प दिसेना. ॥ २१५० ॥ ज्ञान जालियाउपरी । प्रारब्धें देह जोंवरी, । अद्वैतसाक्षात्कारसंपन्नासही परी । प्रपंच दिसतसे. ॥ २१५१ ॥ म्हणोनी दृष्टांत आणिक नाना । येथें बोले वेदवेदांतरचना, । कीं, सोनें कळोनीही जना । न मोडी

मिथ्या अलंकार. ॥ २१५२ ॥ सुवर्णाचें केळ, । त्यांत दृष्टि द्रिसोनी सोनें निखळ, । बाळ म्हणे हें कदळीफळ. । सोनेंची अवघें प्रौढातें. ॥ २१५३ ॥ तथापि दृष्टि तों स्पर्शली हेमीं, । तें कळो न कळो, ऐसी ब्रह्मीं । बुद्धि स्पर्शोनी, मग स्थावरजंगमीं। ज्ञानियाची आणि मूढाची प्रवर्तते. ॥ २१५४ ॥ याचें नांव बुद्धियोग, । बुद्धीस चैतन्याचा संयोग, । त्या बुद्धियोगें कर्मयोग । करीं, म्हणे देव अर्जुनातें. ॥ २१५५ ॥ कीं तो बुद्धियोग सर्वांस असे, । परी त्याचा आश्रय अज्ञानियांस नसे, । ज्यास तो बुद्धिचैतन्ययोग दिसे, । त्या ज्ञानियानें आश्रय करावा तयाचा. ॥ २१५६ ॥ 'मच्चित्त होय, माझ्या ठायीं कर्में अर्पुनी' । म्हणतां, म्हणे तीं अर्पावीं बुद्धीकरूनी, । परी बुद्धीकरूनी कोणी, कोण तत्त्व समजोनी, । अर्पावें म्हणेल; ॥ २१५७ ॥ तरी 'बुद्धियोगमुपाश्रित्य' म्हणोनी । म्हणतां, कर्मीं चित्स्वरूप लक्षूनी, । कर्में अर्पावीं, म्हणोनी । सुचवी तत्त्व. ॥ २१५८ ॥ यांत कर्में करितां स्फुरे ऐसें जरी, । तरी तें उत्तमच परी, । न स्मरेच, तरी त्याउपरी । अर्पितां तरी ब्रह्मभावें स्मरावें. ॥ २१५९ ॥ "बुद्धियोगमुपाश्रित्य" म्हणोनी । म्हणतां ये रीती करूनी । देव बोले सुचवुनी । गूढ भाव. ॥ २१६० ॥ कीं "ब्रह्मार्पणं ब्रह्महवि"[1] । या श्लोकीं चतुर्थाध्यायांत बरवी । हे रीति उपपादिली, येथें नवी । गोष्टी नसे बोलिला. ॥ २१६१ ॥ तत्रापि 'बुद्धियोगमुपाश्रित्य' म्हणोनी । ह्मणे भगवंत येथें उपशब्देंकरूनी, । उप म्हणजे समीप आश्रय अवलंबुनी, । म्हणे कर्में अर्पुनी होय मच्चित्त. ॥ २१६२ ॥ उप शब्दाचा अर्थ समीप, । म्हणजे बुद्धींत सर्वदा स्फुरे स्वरूप, । याचा आश्रय समीप ऐसा, कीं, तें अरूप । स्मरत असावें सर्वदा. ॥ २१६३ ॥ तेंची कर्मी पाहावें, । त्या चिद्रूपेंची मातें ध्यावें, । चिद्रूपेंची गावें, स्मरावें, । पाहावें सर्वत्र चिद्रूप. ॥ २१६४ ॥ परी हेंच मज तारक न म्हणोनी, । उगाच आश्रय धरूनी, । कर्में करितो विसरूनी, । तो दूरीं पडिला त्या बुद्धियोगास. ॥ २१६५ ॥ आश्रय धरूनी नित्य स्मरे, । तरी बुद्धियोग तो सर्वदा स्फुरे । स्फुरतां स्फुरतां बुद्धि मुरे । त्या आयत्या बुद्धियोगीं. ॥ २१६६ ॥ ऐसा बुद्धियोगाचा आश्रय, । तो म्हणावा उपाश्रय, । याही भावें म्हणे विश्वाश्रय । 'बुद्धियोगमुपाश्रित्य' म्हणोनी. ॥ २१६७ ॥ बुद्धियोगाचा ऐसा आश्रय धरूनी, । बुद्धीकरूनी कर्में मज समर्पूनी, । मच्चित्त होय तूं, म्हणोनी । गूढ भावें देव म्हणे. ॥ २१६८ ॥ कीं बुद्धियोगाच्या

---

१. अ० ४, श्लोक० २४.

आश्रयें । कर्में दिसती चिन्मयें, । तीं आपल्या चरणीं समर्पावीं धनंजयें, । लक्षूनी चिन्मय आपणातेंही. ॥ २१६९ ॥ कीं क्षीराब्धिरसनासंयोग । तैसा बुद्धिचैतन्याचा योग; । तेव्हां कर्मबुद्बुदाचें मिथ्या सोंग, । चैतन्य अवघें. ॥ २१७० ॥ तैसेंची भगवद्रूप, । त्याही रूपीं तेंची अवघें अरूप; । हेमच हेममूर्ति, तैसें चित्स्वरूप । भगवद्रूप, ज्या रूपीं कर्में अर्पावीं. ॥ २१७१ ॥ या भावें **"चेतसा सर्वकर्माणि । मयि संन्यस्य"** म्हणतो चक्रपाणी, । कीं, बुद्धीनें ऐशा अनुभवें स्वचरणीं । समर्पावीं सर्व कर्में. ॥ २१७२ ॥ आणि मच्चित्त होय, म्हणे देव, । कीं, बुद्धियोगीं जें स्फुरे, तें स्वयमेव । मीच असें सगुणही देवाधिदेव, । म्हणूनी मत्पर होऊनी, होई मच्चित्त तूं. ॥ २१७३ ॥ कीं मीच पर म्हणजे थोर ज्याला, । मत्पर म्हणावें त्याला, । परतु अद्वैतरीतीं पाहतां राहिला । अपर कोण. ॥ २१७४ ॥ ऐसें मानील अर्जुन झणी, । म्हणूनी मत्पर होई म्हणतो चक्रपाणी, । कीं कारण सर्वा जगाची खाणी । आपण विद्योपाधी सर्वांहूनी थोर याकरितां. ॥ २१७५ ॥ 'आपण चैतन्य' ऐसी खूण, । अखंडत्वें स्मरे मीच सगुण, । म्हणूनी कारण चैतन्य मीच, ऐसें निपुण । मातें कारण जगाचें जाणती. ॥ २१७६ ॥ चिदात्मता आधीं स्फुरे, । मग जड देहात्मता भलता स्मरे, । परी हें न कळोनियां, अविवेकरितां घसरे । जो तो कारणपणापासुनी. ॥ २१७७ ॥ तैसा नव्हे आपण, । विद्योपाधि सगुण । सर्वदा स्फुरे चिदात्मपण । मज सर्वेश्वरातें. ॥ २१७८ ॥ याच कारणें दशमीं । **विभूति**अध्यायांत तुज मी, । जगदादि जे जे देवऋषि, त्यांचा स्वामी । आणि आदित्यांचा, ऐसें बोलिलों. ॥ २१७९ ॥ **"न मे विदुः सुरगणा"** या श्लोकीं[1] वचना । तुज बोलिलों अर्जुना, । कीं, माझा प्रादुर्भाव कोणास कळेना, । मी आदि देव ऋषींचाही यास्तव. ॥ २१८० ॥ कश्यपादि ऋषि सकळ । आणि ब्रह्मादि देव सृष्टीचें मूळ, । या सकळांचा आदि केवळ । मी अनादि जगदात्मा. ॥ २१८१ ॥ बापाचा जन्मदिवस पुत्र । न देखे, याचें काय हो! विचित्र? । न देखती जन्मदिन सर्वत्र । नातू, पणतू, आज्यापणज्याचा. ॥ २१८२ ॥ जो सर्वांचा आदिदेव, । त्याचा कोण जाणे कधीं प्रभव? । प्रभव म्हणजे प्रादुर्भाव, । उद्भव उपाधीचा तोच सगुणाचा. ॥ २१८३ ॥ तो म्हणे, कीं, जो सर्वांचा आदिदेव, । तो मी विद्योपाधी देवाधिदेव, । चिदात्मस्फूर्ति नित्य स्वयमेव । माझे ठायीं याकरितां. ॥ २१८४ ॥ अगा! चैतन्य सर्वही, परी । अविवेकें

१. अ० १०, श्लो० २.

पडिले सर्व दूरीं; । सर्वांस सर्वदा चित्स्फूर्ति असती, तरी । सर्वही असते नित्यमुक्त. ॥ २१८५ ॥ यालागीं तोची चैतन्य, । कीं, चिदात्मता ओळखे धन्य; । तथापि नाशतां अविद्या ओळखती अन्य, । मज स्वयें अनन्य स्फूर्ति सर्वदा. ॥ २१८६ ॥ यालागीं मी चैतन्य, । जें बुद्धियोगीं स्फुरे अनन्य, । यास्तव मजसमान नाहीं कोणी अन्य, । म्हणूनी मत्पर होय, भाव ऐसा. ॥ २१८७ ॥ "**बुद्धियोगमुपाश्रित्य**" । मत्पर होय म्हणतां, ऐसें पांडित्य । गीताकारासच करणें लागलें अगत्य । टीकाकाररूपेंकरूनी. ॥ २१८८ ॥ कीं आत्माच सगुण भगवंत, । ऐसें याच भावें बोले श्रीमंत, । द्वितीयस्कंधीं श्रीभागवत । शुक बोले श्लोक हा. ॥ २१८९ ॥

**एवं स्वचित्ते स्वत एव सिद्ध आत्मा प्रियोऽर्थो भगवाननंतः ।**
**तं निर्वृतो नियतार्थो भजेत संसारहेतूपरमश्च यत्र ॥**

**एवं** म्हणजे ऐसें । कीं पूर्वीं आपण बोलिलों जैसें, । विरक्त होऊनी राया! परीक्षिती! तैसें, । त्या हरीतें भजावें सर्वथा. ॥ २१९० ॥ तो कोठें? म्हणसी जरी, । तरी स्वचित्तीं स्वतःसिद्ध हरी, । जो आत्मा चित्ताच्या अंतरीं, । सर्वांहूनी जो प्रिय. ॥ २१९१ ॥ कीं हा प्रिय आणि अर्थ, । वरकडें प्रियें अवघीं अनर्थ, । जीं नसोनी त्या चैतन्यदोरीं व्यर्थ । जडसर्ग अनर्थ पुत्रवित्तादि. ॥ २१९२ ॥ तोच भगवान् षड्गुण, । कीं सगुणीं स्वतःसिद्ध त्याचें स्फुरण, । तोची अनंत, निर्गुण, सगुण, । त्यातें भजावें राया! परीक्षिती! ॥ २१९३ ॥ अगा! तोची साकार, । तोची सगुणत्वींही निराकार, । संसारहेतु अहंकार, । उपरम त्याचा त्या स्वरूपीं. ॥ २१९४ ॥ संतुष्ट यथालाभें असोनी, । आणि नियत प्रयोजन करूनी, । त्या आत्मया भगवंतातें भजावें, म्हणोनी । भागवतीं बोले श्रीशुक. ॥ २१९५ ॥ प्रस्तुतीं गीताकार । बोले पार्थास तोची प्रकार, । कीं बुद्धियोगाचा आश्रय करूनी, मत्पर । होउनी, होय मच्चित्त तूं सर्वदा. ॥ २१९६ ॥ एवंच कर्में करितां अनुभव । अंतरेल, म्हणेल म्हणूनी पांडव, । शंका त्यास, पूर्वश्लोकीं वदे देव, । कीं मदाश्रितपदें मत्पर हो, कर्में करूनीही. ॥ २१९७ ॥ तरी कर्मीं कैसा तुझा आश्रय? । म्हणूनी म्हणेल धनंजय, । तदर्थ बोलिला भक्तप्रिय, । कीं मत्पर ऐसा मदाश्रित कर्में अर्पूनी. ॥ २१९८ ॥ या गीतेंत सर्वत्र । कर्मार्पणविधि बोले कमलनेत्र, । परंतु जे नव्हती सगुणकरुणापात्र, । ते म्हणती ज्ञानियांस हें नलगे. ॥ २१९९ ॥ तरी चतुर्थाध्यायांत देव । स्पष्ट बोलिला देवाधिदेव; ।

"**गतसंगस्य मुक्तस्य**" या श्लोकीं स्वयमेव । हेंच बोलिला. ॥ २२०० ॥ द्वादशीं निर्गुणोपासक ज्ञानी, । त्यांहूनी योगवित्तम आणि संमत म्हणोनी । भक्तांस बोलिला, कीं, ज्ञानी होउनी । उपासिती सगुण. ॥ २२०१ ॥ त्याचा भजनप्रकार । बोलतां म्हणे श्रीगीताकार, । कीं, ते सर्व कर्मे अर्पिती वारंवार । माझे ठायीं मत्पर होउनी. ॥ २२०२ ॥ आणि अनन्ययोगेंकरूनी । मातें ध्याती, उपासिती, म्हणोनी । द्वादशीं बोलिला, कीं, स्वभक्त आणि ज्ञानी । तरीच ते अनन्ययोगें मज ध्याती. ॥२२०३॥ आणि ज्ञानी भजती निर्गुण, । त्यांहूनी हे तरीच योगनिपुण, । आणि तरीच त्यांहूनी मज संमत म्हणे षड्-गुण, । कीं जरी ज्ञानी भक्त हे. ॥ २२०४ ॥ ऐसे ज्ञानी भक्त । अनुभवी आणि सगुणीं अनुरक्त, । ऐसें वर्णूनी बोले नित्यमुक्त, । कीं, कर्मे समर्पूनी मज भजती. ॥ २२०५ ॥ द्वादशीं "**ये तु सर्वाणि कर्माणि । मयि संन्यस्य मत्पराः**" म्हणे चक्रपाणी, । प्रस्तुतीं या अष्टादशीं वाणी । त्याचीच बोलते. ॥ २२०६ ॥ **चेतसा सर्व कर्माणि । मयि संन्यस्य मत्पराः**" म्हणे चक्रपाणी । प्रस्तुतीं अष्टादशीं हे वाणी । कर्मार्पणींच. ॥ २२०७ ॥ परंतु कर्मे अर्पी ये रीती, । आणि अपरोक्षानुभव जाणे सुमती, । म्हणूनी इतर देवांसम श्रीपती । क्षणी मानील अर्जुन. ॥ २२०८ ॥ म्हणूनी **मत्पर**-शब्द । येथें योजी मुकुंद, । कीं, सर्वांहूनी थोर एकची गोविंद, । या भावें कर्मे समर्पावीं. ॥ २२०९ ॥ कीं समर्पणाचा प्रकार । ऐसा बोले श्रीकृष्ण गीताकार, । श्रीमद्भागवतीं हाची विस्तार । जनकनवयोगिसंवादीं. ॥ २२१० ॥

**कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वानुसृतस्वभावात् ।**
**करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥**

काया, वाचा, मन, इंद्रियें, बुद्धी, । आणि आत्मा म्हणजे चित्त ऐसी प्रसिद्धी, । या इतकियांकरितां कर्मांची समृद्धी, । ते अर्पावी नारायणाकारणें. ॥ २२११ ॥ तो नारायण कोण? म्हणोनी । कैसिया कारणें अर्पावीं कर्मे करूनी? । तरी '**परस्मै नारायणायेति**' या वचनीं । निर्वाह या गोष्टीचा. ॥ २२१२ ॥ "**परस्मै नारायणाय । इति समर्पयेत्**" ऐसा अन्वय, । सर्वांत पर त्या नारायणाकारणें, ऐसा निश्चय । हृदयीं धरूनी अर्पावें. ॥ २२१३ ॥ श्लोकार्थ एतत्प्रकार, । परंतु नाहीं केला विशद विचार, । कीं, मागें याच टीकेंत अर्थविस्तार । या श्लोकाचा वर्णिला. ॥ २२१४ ॥ एवंच

१. अ० ४, श्लो० २३. २. अ० १२, श्लो० १-७. ३. अ० १२, श्लो० ६.

ऐसें श्रीमद्भागवतीं । कीं "परस्मै नारायणाय इति" । प्रस्तुतीं गीताकार श्रीपती । म्हणे, "मयि संन्यस्य मत्परः." ॥ २२१५ ॥ कीं थोर मी जगदाधार, करूनी ऐसा निर्धार, । अर्पूनी कर्मविस्तार, । होई मच्चित्त सर्वदा. ॥ २२१६ ॥ ऐसा मच्चित्त होसी, । तरी कर्मे करूनीही त्या पदातें पावसी, । अनुभव पावलासी तेथें धारसी, । ऐसा श्लोकद्वयार्थ, भावार्थ, मथितार्थ. ॥ २२१७ ॥ कर्मे करितां अनुभव । हा अंतरेल, ऐसा पांडव । शंकित जाला; म्हणूनी माधव । परिहार दों श्लोकीं बोलिला. ॥ २२१८ ॥ हें ऐके अर्जुन, । परी युद्धीं सादर नव्हे मन;[1] आधींच आळसी, त्यास अनुमोदन । वडिलीं दिधलें निद्रेचें. ॥ २२१९ ॥ तो न्याय येथें जाला, । आधींच युद्ध टाकणें ज्याला, । भगवत्कृपेनें त्याला । अनुभव जाला अचाट. ॥ २२२० ॥ तो म्हणे मी जालों प्रबुद्ध, । आतां करीन जेव्हां युद्ध, । चित्त मागुती अशुद्ध । होईल समरीं. ॥ २२२१ ॥ करितां नाना युद्धक्रिया, । आणि करितां शत्रुक्रियांची प्रतिक्रिया, । तेव्हां या अनुभवप्रिया । कोठे पाहूं? ॥ २२२२ ॥ कर्मी अकर्मपण । होय करितां कृष्णार्पण, । परंतु कर्माचा सहज गुण, । कीं, संकटीं पाडूनी अंतर पाडी अनुभवीं. ॥ २२२३ ॥ या भावेंकरूनी । मी युद्ध न करीं, म्हणोनी । अर्जुन शंकला मनीं; । म्हणूनी सर्वसाक्षी बोलतो हा श्लोक. ॥ २२२४ ॥

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥**

अगा! होसी जेव्हां मच्चित्त, । म्हणजे माझे ठायीं जेव्हां अर्पिसी चित्त, । तेव्हां जें जें विघ्न योगभ्रंशातें निमित्त, । त्यापासूनी तूं सूटसी. ॥ २२२५ ॥ तूं मच्चित्त जाल्यावरी, । या सर्व कर्मविघ्नांच्या सागरीं । तरसील, कीं, मी नाना परी । तारीन तूतें. ॥ २२२६ ॥ अगा! नव्हे हा मिथ्या स्तव, । गोष्टी हे जाण वास्तव, । तरसील तूं माझ्या प्रसादास्तव । सर्वां दुर्गां दारुणां विघ्नांतें. ॥ २२२७ ॥ या कर्ममार्गी दारुण । विघ्नें पदोपदीं क्षणक्षण, । परी त्यास लंघावयास कारण । प्रसाद माझा. ॥ २२२८ ॥ त्या प्रसादास कारण । अगा! अर्जुना! मच्चित्तपण, । म्हणजे चित्तास माझें स्मरण, । यालागीं तरसी मच्चित्त सर्वां दुर्गांतें. ॥ २२२९ ॥ ऐसें बोले जगद्भर्ता, । हेचि द्वादशीं बोलिली वार्ता, । कीं, "तेषामहं समुद्धर्ता" । तेंच अष्टादशीं बोलतो.

---

१. अ० १२, श्लो० ७.

॥ २२३० ॥ जैं सगुणभक्त ज्ञानी, । योगवित्तम संमत निर्गुणोपासकांहुनी, । त्यांचा उद्धर्ता मी, म्हणोनी । द्वादशीं बोलिला. ॥ २२३१ ॥ ज्ञान जालियावरी । निर्गुणोपासना त्याची वर्णी हरी, । आणि ते मातेंची पावती, परी । क्लेश अधिकतर, म्हणे तयांतें. ॥ २२३२ ॥ कीं त्यांचा उद्धार । त्यांच्याच अभ्यासानुसार, । म्हणूनी करितां अभ्यास फार । त्रिलबें बाणे निर्गुण, परंतु अधिक कष्टती. ॥ २२३३ ॥ आणि भक्तांसही योग अभ्यास, । तरी दों पक्षांत अधिकतर निर्गुणपरांस, । आणि भक्तास बोलिला जगन्निवास, । कीं "**तेषामहं समुद्धर्ता**". ॥२२३४॥ कीं जे सगुणभक्त ज्ञानी, । तेही अनन्ययोगेंचीकरूनी । ध्याती परम तत्पर कर्मे अर्पुनी, । म्हणूनी मी उद्धर्ता होतों भक्तांचा. ॥ २२३५ ॥ "**ये तु सर्वाणि कर्माणि । मयि संन्यस्य मत्पराः**" म्हणे चक्रपाणी । हे द्वादशीं जैसी भगवद्वाणी । अष्टादशीं पूर्वश्लोकीं तसींच. ॥ २२३६ ॥ "**चेतसा सर्वकर्माणि । मयि संन्यस्य मत्परः**" म्हणे चक्रपाणी; । या श्लोकीं "**मच्चित्तः सर्वदुर्गाणि । मत्प्रसादात्तरिष्यसि**" म्हणतसे ॥ २२३७ ॥ "**तेषामहं समुद्धर्ता**" द्वादशीं, । "**सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि**" अष्टादशीं, । अर्जुन भक्त आणि आपणच उपदेशी । अपरोक्ष साक्षात्कारातें. ॥ २२३८ ॥ एवं जे अपरोक्षज्ञानी, । ज्ञानपरिपाकार्थ त्या साधकांनीं । कर्मे अर्पूनी शार्ङ्गपाणी । भक्तीनें भजावा. ॥ २२३९ ॥ तरीच ज्ञानपरिपाक सत्वर । होईल; मग सिद्धांत, तो सर्वेश्वर । सेवितां, मुक्तीपरीस आदर । उपजेलच त्याच्या भक्तीचा. ॥ २२४० ॥ निर्गुणोपासकां उपासना । ज्ञानावांचूनी तों होईना, । तथापि क्लेश त्या जना । अधिकतर, कीं टाकिती भक्तीतें. ॥ २२४१ ॥ 'ज्ञान जालियावरी । अभ्यासास नाहीं उरी', । ऐसें बोलती, ते पडले दूरी । अनुभवातें. ॥ २२४२ ॥ एवच द्वादश अष्टादश यांसी । एकवाक्यता जाली ऐसी, । "**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि**" । या श्लोकीं याच अर्धपर्यंत. ॥ २२४३ ॥ आतां उत्तरार्ध किन्निमित्त । भगवन्मुखें होतो प्रवृत्त, । त्याचें निमित्तही स्थिरचित्त । परिसावें श्रोतयांनीं. ॥ २२४४ ॥ माझे ठायीं अर्पितां कर्म, । मच्चित्त होसी करितां स्वधर्म, । तेव्हां लंघिसी कर्मविघ्नें, हें वर्म । या अर्धपर्यंत भगवंत बोलिला. ॥ २२४५ ॥ तथापि वाटलें पांडवा, । कीं, हा सिद्ध अनुभव सांडावा, । मग कर्मविघ्नें लघूनी, साधावा । प्रसाद या देवाचा. ॥ २२४६ ॥ तरी या अनुभवीं देतां बुडी, । कां न पडे याच्या प्रमादाची उडी? । म्यां युद्धच करावें, ही आवडी । कां या देवाधिदेवानें? ॥२२४७॥

बिंबावया हा अनुभव । अभ्यासाचें साधितां वैभव, । नव्हे काय याच्या प्रसादाचा उद्भव? । तेव्हां न म्हणेल काय मच्चित्त मजला? ॥ २२४८ ॥ मच्चित्त मत्प्रसादेंकरूनी । दुर्गें विघ्नें तरसी, म्हणोनी । स्वयें म्हणतो; या वचनीं । विश्वास माझा. ॥ २२४९ ॥ तरी अभ्यास करितां मच्चित्त । होईल, कीं, हाच आत्मा यातें स्मरेल चित्त, । क्षणक्षणा तेव्हां निमित्त । प्रसादाचेंची अभ्यास तो. ॥ २२५० ॥ आतां अभ्यासाचीकारणें । शस्त्र हातीं न धरणें, । नियम ऐसा अंतःकरणें । अर्जुनें केला. ॥ २२५१ ॥ तो सर्वसाक्षी देव । समजोनी देवाधिदेव, । तो बोले तों स्वयमेव । उत्तरार्धें बोलतो. ॥ २२५२ ॥

## अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥

अगा! इतकियापरी । बोल आमुचा तूं न आइकसी, तरी । वायां जासी हे खरी । वैखरी जाण. ॥ २२५३ ॥ अर्थ इतकाच, परी । कां वांयां जाणार याउपरी? । ऐसें विचारितां, हरी । प्रसंग प्रारब्धाचा बोलतो. ॥ २२५४ ॥ कीं प्रारब्धाचें बळ । सर्वांहूनी प्रबळ; । प्रारब्धही स्वयें दुर्बळ, । परी प्रबळ ईश्वरशक्तीनें. ॥ २२५५ ॥ कर्म, क्रियमाण, संचित, । त्यांचें प्रारब्ध निर्मितो अच्युत; । प्रारब्ध जालें, तें भोगावें निश्चित; । हा प्रवाह सर्वथा मोडेना. ॥ २२५६ ॥ मोडे ईश्वराचें ईश्वरपण, । तरी हा मोडे कर्माचा गुण; । अभंग सृष्टिप्रवाह त्रिगुण; । अभंग वस्तुस्वभाव हा ब्रह्मीं. ॥ २२५७ ॥ या सृष्टिप्रवाहास नसे आदी; । कर्मफळ सांखळीही अनादी, । कर्मभोगाचकरितां जनकादी । राज्य करिती विरक्त. ॥ २२५८ ॥ प्रारब्ध भोगिल्यावीण । न होय सर्वथा क्षीण; । भोग भोगितांच ज्ञानी प्रवीण । समाधिमुख अभ्यासें साधिती. ॥ २२५९ ॥ साधक समाधितें साधिती, । सिद्ध समाधीतें सेविती, । तथापि भोगकाळीं भोगिती । आग्रह टाकूनी प्रारब्ध. ॥ २२६० ॥ प्रारब्धाशीं करी हट, । तो वायांच जाय निपट, । कीं, ईश्वरशक्तीकरूनी उत्कट । बळ प्रबळ प्रारब्धाचें. ॥ २२६१ ॥ जें आलें प्रारब्धभोगीं, । आणि स्वरूपीं सावध असे योगी, । पदच्युत न करी त्याचलागीं । प्रारब्धभोग. ॥ २२६२ ॥ तीव्र प्रवाहीं पडे, । पोंहणार पोंहे प्रवाहाचकडे, । तरी तो पोंहणार न बुडे, । हळूहळू लागे तीरातें. ॥ २२६३ ॥ जो पोंहे उफराटा, । त्याच्या नाकातोंडांत भरती लाटा, । जरी पोंहणार मोटा धाटा[1] । होय कष्टी बहु फार. ॥ २२६४ ॥ मग तें

१. मजबूत, बळकट.

पोंहणेंहीं विसरे, । जेव्हां पोटीं पाणी शिरे; । तैसा ज्ञानी अनुभवी विसरे, । हटें प्रारब्धासी मोडितां. ॥ २२६५ ॥ राजाज्ञा बंदी शिरीं, । त्यांचमध्यें पोट भरी, । तो सुखी; अन्यथा वर्ते तरी । थितें[1] जीवित्व अंतरे. ॥ २२६६ ॥ तैसें प्रारब्ध ईश्वराधीन, । तोच बोले हें वचन, । 'वायां जासी' म्हणे कमलनयन । कीं थितें[1] ज्ञान झांकेल हें तुझें. ॥ २२६७ ॥ ऐसें, स्पष्ट वचन, । परंतु प्रारब्ध नाहीं समजला अर्जुन, । म्हणे, 'कां हा करुणाघन । बोलतो ऐसें ? ॥ २२६८ ॥ मी असतों अनाथ, । तरी हा जें बोलतो जगन्नाथ, । तें खरें मानितों, कीं, स्वयें सनाथ । मज केलें या जगद्गुरूनें. ॥ २२६९ ॥ हें युद्ध तें किती ? । इतुकियासाठीं हा जगत्पती । कां मज म्हणतो ये रीती ? । कीं, वायां जासी न करितां युद्ध. ॥ २२७० ॥ टाकूनियां सकळ, । याचे धरावे चरणकमळ, । 'तें मी करीना' म्हणतां, हा मेघनीळ । करुणाशीळ कां हा विगेळ[2] वर्पतो ? ॥ २२७१ ॥ काय अगत्य झाला ? । कीं, 'हें युद्ध करीं,' म्हणतो मला. । म्हणोनी बोलावें या बोला, । तों देवच बोलिला हा श्लोक. ॥ २२७२ ॥

**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥**

अगा ! अहंकार मानसीं । धरूनी, 'युद्ध न करों' ऐसें मानिसी, । हा असाध्य निश्चय तूं करिसी, । हें सर्व फटकाळ. ॥ २२७३ ॥ तुवां निश्चय आपला । साच होईलसा मानिला, । परंतु आम्हांस ऐसा कळों आला, । कीं मिथ्या तुझा निश्चय. ॥ २२७४ ॥ शब्दीं आमच्या अनादर, । आणि आपल्या निश्चयाच्या ठायीं आदर, । तो सत्य होईल, ऐसें मानिसी दृढतर, । परी आम्ही जाणतों कीं मिथ्या. ॥ २२७५ ॥ म्हणसी, 'मी धनंजय, । कोण अन्यथा करणार माझा निश्चय ?' । तरी भोगेंच प्रारब्धकर्माचा क्षय । हा निर्णय वेदवेदांतीं. ॥ २२७६ ॥ ते प्रारब्धरूपिणी । प्रकृति पूर्वकर्मानुसारिणी, । या भावें म्हणे चक्रपाणी । कीं प्रकृतीच घडवील तुजहातीं. ॥ २२७७ ॥ परी जो अविद्यावृत असे, । तोंच तो प्रकृतींत गवसे; । ज्ञानियास प्रकृतीच नसे, । प्रकृति त्याची प्रारब्ध. ॥ २२७८ ॥ जरी जाला ज्ञानी, । तरी प्रकृतीसारिखा चेष्टतो, म्हणोनी । तृतीयाध्यायीं बोलिलें याच भावें

१. आंखूड, अल्प. २. आग.

करूनी । कीं **"सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि."** ॥ २२७९ ॥ अर्थ हाच अंतःकरणीं । धरूनी बोले **चक्र**पाणी, । कीं 'करीना म्हणतोस ते करणी । तुजहातीं प्रकृति करवील.' ॥ २२८० ॥ याभावें **जगत्पती** । म्हणे **"प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति"** । कीं **"बुद्धिः कर्मानुसारिणी"** ये रीती । बोलती शास्त्रें. ॥ २२८१ ॥ बुद्धीचेंची नांव प्रकृती, । ते पूर्वकर्मानुरूप मती, । ते तुझी शरीराकृती । नाचवील युद्धानिमित्त. ॥ २२८२ ॥ इत्यादि भाव पोटीं, । तो **भ**गवंत म्हणे, 'अगा ! किरीटी ! । हा निश्चय तुझा उडेल शेवटीं, । प्रकृति तुझी जेव्हां तूतें प्रवर्तवील. ॥ २२८३ ॥ ऐसें या भावें बोलिला **दे**व, । परंतु नाहीं समजला **पां**डव, । म्हणे, 'या निश्चयापुढें तांडव । प्रकृतीचें कायसें ?[1] ॥ २२८४ ॥ जैसे कोणी टीकाकार । **प्रकृति**शब्दें हा प्रारब्धाचा प्रकार । न जाणती, तैसा **पां**डुकुमार । हा भाव नाहीं समजला. ॥ २२८५ ॥ म्हणूनी यानंतर । अर्थ हाची स्पष्टतर । बोलतसे **सर्वेश्वर** । या श्लोकीं. ॥ २२८६ ॥

**स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।**
**कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥**

अगा ! जन्मजन्मीं संस्कारभाव । तो म्हणावा **स्वभाव,** । त्यापासूनी ज्या पूर्वकर्माचा संभव, । तें स्वभावजनित कर्म तुझें. ॥ २२८७ ॥ त्या प्रारब्धरूप कर्मेकरूनी । तूं बद्ध आहेस, म्हणोनी । जें 'न करीं,' म्हणूनी इच्छिसी मनीं, । तें अवश्य करिसील वश होऊनी कर्मातें. ॥ २२८८ ॥ येथें म्हणावें कीं स्वभावजनित कर्मे तूंच बद्ध, । परंतु **दे**व म्हणे कीं स्वभावजनित कर्मे तूं **निबद्ध,** । या एका अक्षरें केलें सिद्ध, । कीं, बद्ध तूं प्रारब्धभोगेंकरूनी. ॥ २२८९ ॥ क्रियमाण आणि संचित, । दोनी बंधकें निश्चित; । परंतु त्याचेंची प्रारब्ध अत्यंत । फळभोगरूपें बंध करी. ॥ २२९० ॥ नाना बंधनें केलीं सिद्ध, । त्या बंधनीं म्हणावा बद्ध, । त्यांत रोकडा निबद्ध । म्हणावा, ज्याणें प्रस्तुत बांधला. ॥ २२९१ ॥ ज्याचा संस्कार जैसा, । तो कर्मे आचरे तैसा, । तें क्रियमाण कर्मही फांसा;[2] । परी त्याचेंची होईल जेव्हां प्रारब्ध. ॥ २२९२ ॥ आणि प्रारब्ध होतां राहिलें, । जें अनेक जन्मींचें शेष उरलें, । तें संचितची, तेंही बंधकची बोलिलें, । परंतु बंध करणार प्रारब्ध होउनी. ॥ २२९३ ॥ ऐसें संस्कारजनित त्रिविध, । तें कर्म अवघें बंधक त्रिविध, ।

---

१. अ० ३. श्लो० ३३. २. पाश, बंधन.

त्रिविधंकर्मे बद्ध, परी सन्निध । प्रारब्ध भोगणें, त्याणें निबद्ध तो कर्ता. ॥२२९४॥ बंधची संचित, क्रियमाण, । कीं त्यांतूनी प्रारब्ध होतें निर्माण; । परी ज्ञानें यांचा नाश, ऐसें प्रमाण, । येविषयीं **ब्रह्मसूत्र.** ॥ २२९५ ॥

ब्रह्मसूत्र—**तदधिगम उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात्** ॥

तो आत्मा कळल्यावरी, । तदुत्तरकर्म म्हणजे क्रियमाण जें तदुपरी, । त्याचा लेप न घडे, कीं, करितो, परी । अकर्तात्मबोधें लिप्त नव्हे. ॥ २२९६ ॥ आणि पूर्वकर्माचा । म्हणजे संचिताचा । नाशच होणार साचा, । **ब्रह्मसूत्राचा** हा अर्थ. ॥ २२९७ ॥ एवंच जों प्रारब्ध नाहीं जालें, । तोंचवरी ज्ञानें कर्म तुटलें, । प्रारब्ध जालें, तेव्हां बोलिलें । कीं तें भोग देउनी क्षय पावे. ॥ २२९८ ॥ ऐसें संचित, क्रियमाण, । भोग नेदी प्रारब्ध जालियाविण, । तथापि या दों कर्मांचेंची होतें निर्माण । प्रारब्ध, म्हणूनी बंध दोनी हेही म्हणावे. ॥ २२९९ ॥ या दोहींकरूनीही प्राणी बद्ध, । कीं याचेंची होतें प्रारब्ध सिद्ध, । तथापि भोगेंची क्षय प्रारब्धाचा, ऐसें प्रसिद्ध, । प्रमाण येविषयींही **ब्रह्मसूत्र.** ॥ २३०० ॥

ब्रह्मसूत्र—**प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः** ॥

प्रारब्धकर्माचा क्षय । भोगेंचीकरूनी ऐसा निश्चय, । म्हणूनी प्रस्तुनीं ऐसा निर्णय, । कीं, प्राणी बद्ध अत्यंत प्रारब्धें. ॥ २३०१ ॥ तत्रापि **पार्थ** जाला ज्ञानी, । त्यास संचितक्रियमाणेंकरूनी । बंध न घडे, म्हणोनी । **झणीं** मानी **अर्जुन.** ॥ २३०२ ॥ तरी सचितक्रियमाणें होतासी बद्ध, । ते ज्ञानें बंध तुटले, हें सिद्ध; । परी प्रारब्धबंधास तू निबद्ध । आहेस; ऐसा भाव **निबद्ध**-शब्दाचा. ॥ २३०३ ॥ कीं जो बंध भोगिल्यावीण तुटे, । त्या बंधें बद्ध तो बद्धच वाटे, । कीं, जरी भाग्यें सद्गुरु भेटे, । तरी बद्धही सुटतो, म्हणूनी तो निबद्ध म्हणवेना. ॥ २३०४ ॥ ज्ञानें जीवन्मुक्तही, परी । प्रारब्ध भोगीच त्याउपरी, । बद्ध ऐशा बंधें म्हणूनी हरी । 'अर्जुना! तूं निबद्ध स्वकर्मे,' म्हणतसे. ॥ २३०५ ॥ कीं संचितक्रियमाणें होतासी बद्ध, । तरी ते ज्ञानें बंध तुटती हें सिद्ध, । परी प्रारब्ध जीवन्मुक्तासही प्रसिद्ध, । म्हणूनी प्रारब्धें बद्ध तूं **निबद्ध** अगा! **अर्जुना!** ॥ २३०६ ॥ 'बोध जाला मातें, । आतां बंधकत्व कैंचें पूर्वकर्मातें?' । झणीं धरसील या निश्चयातें, । कीं, तूं निबद्ध त्या स्वकर्मेंकरूनी. ॥ २३०७ ॥ आणि 'युद्ध न करीं' म्हणसी, । हाही मोह तुंझ्या मानसीं, । कीं ऐसा निबद्ध आणि मानिसी । आपणातें स्वतंत्र.

॥ २३०८ ॥ तरी या मोहेंकरूनी । जें इच्छिसी 'युद्ध न करीं' म्हणोनी, । तें करिसी अवश्य होउनी, । कीं, परवश होती त्या कर्मातें. ॥ २३०९ ॥ देव बोले ये रीती, । तरी युद्धीं प्रवर्तेना मती, । कीं, 'कर्म जड आणि जडची माझी प्रकृती, । यांस कैंचें बळ इतकें? ॥ २३१० ॥ कीं, यांस होऊनी वश । युद्ध करीन मी विवश.' । हा भाव समजोनी श्रीहृषीकेश, । तत्त्व याचें बोलतसे या श्लोकीं. ॥ २३११ ॥

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**

**भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥**

अगा! अर्जुना! ईश्वर । सर्वां भूतांचिया हृदयीं निरंतर । आहे, साक्षी, सर्वेश्वर, । फलभोग देणार कर्माचा. ॥ २३१२ ॥ अगा! पूर्वकर्माचें यंत्र, । त्यावरी आरूढ भूतमात्र, । हृदय बुद्धि तेंची मायासूत्र, । तो त्या सूत्रें तीं भूतें नाचवितो. ॥ २३१३ ॥ बैसवूनी यंत्रावरी । प्रतिमा नाचवी सूत्रधारी, । हृदयसूत्रांत यापरी । चालक तया हृदयसूत्राचा. ॥ २३१४ ॥ आणि पूर्वकर्म तें यंत्र, । ज्या यंत्रीं आरूढ भूतमात्र, । जैसें ज्याचें कर्म विचित्र, । तैसा नाचवी त्या देहातें. ॥ २३१५ ॥ **भूत**शब्दें देह, **हृदय**शब्दें बुद्धी, । तेची प्रकृति, तेची माया, हे प्रसिद्धी, । **यंत्र**शब्दें जे समृद्धी । पूर्वकर्मभोगाची यथाकाळें. ॥२३१६॥ बुद्धि कर्मानुसारिणी खरी, । तेची प्रकृति माया, तिचा सूत्रधारी । चाळितो, तो तीमध्येंच चालक हरी, । त्या मायेनें भूतें देहरूपेंच चाळितो. ॥२३१७॥ सूत्रधारी चाळी सूत्र. । त्या सूत्रें चळे यंत्र, । त्या यंत्रानुरूप प्रतिमामात्र । खांत्र सूत्रें नाचती. ॥२३१८॥ तसी बुद्धि मायासूत्र, । त्या सूत्रें चळे प्रारब्धयंत्र, । यंत्रानुरूप भूतमात्र । कर्में करी. ॥२३१९॥ एवंच या भावें बोलिला श्रीपती, । कीं, "**प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति,**" । म्हणजे तूतें तुझी प्रकृति । योजिल बळें, करवील युद्ध. ॥ २३२० ॥ ते प्रारब्धानुसारिणी । प्रकृति बुद्धी तुझी, म्हणोनी । 'करीना' ह्मणतोसी, तें अवश्य होउनी, । करसील युद्धा. ॥ २३२१ ॥ ऐसें देव बोलिला, । तों सशंक मागुतीं पार्थ देखिला, । कीं, 'जे कर्मानुसारिणी प्रकृति तिला । कोठोनी बळ एवढें ?' ॥ २३२२ ॥ त्या शंकेचा परिहार । देव बोलिला एतत्प्रकार, । कीं, प्रारब्ध फलभोग देणार, । ईश्वर चालक तिये प्रकृतीचा. ॥ २३२३ ॥ ते प्रकृति मायासूत्र, । तींकरूनी, चाळितां प्रारब्धयंत्र, । कर्मी वर्तवी तो भूतमात्र । ईश्वर स्वयें. ॥ २३२४ ॥ याकारणें अर्जुना! जरी । न करिसी युद्ध तूं, तरी । वायां जासी, म्हणोनी

वदला हरी, । कीं, **"अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि."** ॥ २३२५ ॥ कीं जो चाळी बुद्धिसूत्र, । जो कर्मानुरूप वर्तवी देहमात्र, । तोची मी, माझें वचन पवित्र । जरी न आयकसी, तरी जासी वायां, अर्जुना! ॥ २३२६ ॥ कीं जो राजाज्ञा पाळी, । राजद्रव्य फेडी यथाकाळीं, । आपली कुळवाडी चाळी, । कुळवाडी त्याचीच वाढते. ॥ २३२७ ॥ सुखें राजाज्ञा न पाळी, । नेदी राजधन यथाकाळीं, । आणि आपली कुळवाडी न चाळी, । कुळवाडी कैंची मग तया? ॥ २३२८ ॥ जें कुळवाडीचें साधन, । तेंची कीं फेडी राजधन, । यावेगळें जें ताडन । लेखा नसे तयाचा. ॥ २३२९ ॥ ऐसें प्रारब्ध भोगणें । तें सुखें आज्ञा ईश्वराची मान्य करणें, । स्वहित त्याचमध्यें आचरणें, । तरीच साधे आत्महित. ॥ २३३० ॥ करूनी ज्ञानाचा आश्रय, । प्रारब्धयोग टाकायाचा निश्चय । करी, त्याचा मतिभ्रंश होय । भोगकाळीं. ॥ २३३१ ॥ कीं ब्रह्मात्मत्वाचा प्रत्यय, । आणि भोग नलगे ऐसा निश्चय, । तो प्रत्यय न पावतां लय । भोग न घडे. ॥ २३३२ ॥ त्या प्रारब्धास ईश्वराचें बळ, । तें तो भोगणार केवळ, । त्याचिया बळें प्रारब्ध प्रबळ, । तेव्हां आच्छादील अनुभव तयाचा. ॥२३३३॥ कीं देहात्मत्वसंस्कार । खवळे, उठे अहंकार, । 'मी तें करीन' म्हणोनी वारंवार । स्मरों लागे त्या भोगरूपा कर्मातें. ॥ २३३४ ॥ पाकाकारणें पेटे अनळ, । त्यानें जळे ग्राम सकळ, । ऐसी बुद्धि एक भोगाकारणें चंचळ, । ते नाना वेडेचार मग करी. ॥ २३३५ ॥ वायां जाय यापरी, । जो ज्ञानी प्रारब्धाशीं हट करी; । तोची ईश्वराज्ञा म्हणोनी जरी । भोगी स्वकर्म, तरी वायां नवजाय. ॥ २३३६ ॥ भोग आणि भोगरूप कर्म । सर्वही पाहे कीं ब्रह्म, । आणि शरणागत परम । ईश्वराचा. ॥२३३७॥ तो त्यास सूत्रधारी । कर्मे भोगवी, परी । वायां जाऊं नेदी यापरी, । कीं, पोंहवी आणि बुडों नेदी तारक. ॥ २३३८ ॥ पोंहणार लावी कांसे, । मग काय उदकीं भय असे? । पाण्यांत पडलासा दिसे, । परी बुडेना तो कधीं. ॥ २३३९ ॥ त्याची न धरी कांस, । आणि तोची टाकी बळें जळीं, त्यास । मग विलंब वायां जावयास । कैंचा तेथें? ॥ २३४० ॥ या भावें देवाधिदेव । जो कर्मे भोगवी देव, । तोची बोलिला स्वयमेव । कीं, **"अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि."** ॥ २३४१ ॥ कीं बोल आमुचा जरी । न आइकसी, न भांडसी यांसी, तरी । वायां जासी, म्हणे तया श्लोकीं, परी । तेव्हां तत्त्व ऐसें प्रारब्धाचें तो नेणे. ॥ २३४२ ॥ म्हणूनी जालें अगत्य । कीं प्रारब्धाविषयीं करावें पांडित्य, ।

त्यावांचूनी अर्जुन सत्य । न मानील गोष्टी आपली. ॥ २३४३ ॥ तों प्रसंग येपर्यंत आला, । ईश्वर कर्मफलदाता हा सिद्धांत जाला, । तरी आयकोन त्याच्या बोला । कां युद्ध न करावें? ॥ २३४४ ॥ तरी तो मीच स्वयें । 'युद्ध करीं,' म्हणतों निश्चयें, । मागें बोलिलों याच निर्णयें, । कीं **"अथ चेत्त्वमहंकाराम्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि."** ॥ २३४५ ॥ कीं, माझा न आइकसी बोल, । आणि प्रारब्ध मानिसी फोल, । तरी कर्मसागर अत्यंत खोल, । त्यांत बुडसी, च्यवसी ज्ञानापासुनी. ॥२३४६॥ ज्ञान जालियावरी । मोक्ष पावेच, परी । प्रारब्धासीं हट करी जरी, । भोग ईश्वर दे तयास देहात्मसंस्कारें. ॥२३४७ ॥ समर्थाची सांपडे कांस. । तो केवळ बुडों नेदी तयास; । परंतु त्याचा आज्ञाभंग करितां, आयास । पावे आवर्ती देहात्मसंस्काराच्या. ॥२३४८॥ धरावी कांस ज्याची, । आज्ञा पाळावी तयाची, । मग कैंची वार्ता भयाची ? । शरण याकारणें जावें ईश्वरातें. ॥ २३४९ ॥ म्हणूनी जासी शरण, । आणि आत्मत्वेंची धरिसी त्याचे चरण, । तरी अनायासें तरोनी जन्ममरण, । पद पावसी, ऐसें सुचवितो या श्लोकीं. ॥ २३५० ॥

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥**

आतां सांगों बहुत काय ? । त्यातेंची तू शरण जाय, । परंतु सर्वभावें त्याचे पाय । धरीं, कीं त्याचें सर्वस्व तुज कळलें. ॥ २३५१ ॥ अगा ! अर्जुना ! विश्व सकळ । तो ईश्वर स्वयें केवळ, । कीं, समुद्रची बुद्बुद आणि कल्लोळ, । लटिकाची लोळ आकृतीचा. ॥ २३५२ ॥ अगा ! दावी नाना आकार । नट नाचतां; एतत्प्रकार । सर्वही आकार, तो निराकार । जो सर्व आणि सर्वसाक्षी. ॥ २३५३ ॥ तो स्वयें सर्व, ऐसा भाव । धरोनी, भजतो देव; । तेव्हां तुझें कर्मही तो स्वयमेव, । ऐसें देखसी. ॥ २३५४ ॥ तोची सर्व जगत्पती, । या भावें करिसी शरणागती, । तेव्हांच पावसी परम शांती । प्रसादें त्याच्या. ॥ २३५५ ॥ अगा ! प्रारब्धची भोगिती, । तथापि कामक्रोधींच बुडती,[1] । स्वप्नीं न देखती शांती, । जे शरण न जाती ईश्वरा. ॥ २३५६ ॥ तूं त्याचे स्मरशील चरण, । सर्व भावें जासील शरण, । तेव्हां तो प्रसन्न होऊनी करुण । देईल तुज थोर शांती. ॥ २३५७ ॥ कीं सर्वही तोची ईश्वर, । हा ठसा उमटे निरंतर, । तेव्हां कामादिकांचा प्रसर । उरेल

१. भोंवऱ्यांत.

कोठें ? ॥ २३५८ ॥ सर्व भावें तो मुकुंद । सेवितां, त्याचा जो प्रसाद, । त्या प्रसादें शांति, शाश्वत पद, । देह असतांच पावसी. ॥ २३५९ ॥ रहस्य ऐसें सांगतां, । अर्जुनास म्हणे, 'अगा ! भारता ! । कीं भरतवंशीं तूं पांडुसुता । जन्मलास याच कर्माकारणें. ॥ २३६० ॥ आतां 'युद्ध न करीं,' । म्हणूं नको याउपरी, । तों तो समजला ऐसें देखोन अंतरीं, । भगवंत बोलतसे हा श्लोक. ॥ २३६१ ॥

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥**

अगा ! येथवरी ये रीती । ज्ञान बोलिलों तुजप्रती, । कीं, शेवटीं प्रारब्धाची ही गती । कळावी ज्ञान जालें जयाला. ॥ २३६२ ॥ कीं ज्ञान जालिया उपरी । प्रारब्ध सरे जोंवरी, । तोंवरी त्याच देहें असावें, परी । क्षय भोगेंची प्रारब्धकर्माचा. ॥ २३६३ ॥ वेदीं आणि वेदांतीं । बोलोनी अद्वैत बोधरीती, । भोगेंची प्रारब्धक्षय बोलती । सर्वशास्त्रें. ॥ २३६४ ॥ हे सर्वशास्त्रमयी गीता, । तेथें त्रिकांड निर्णय तत्त्वता, । प्रारब्धतत्त्वही पांडुसुता ! । बोलतां राहिलें तेंही प्रसंगें बोलिलों. ॥ २३६५ ॥ ऐसें इतिशब्दें सुचवुनी । "**इति ते ज्ञानमाख्यातं**" म्हणोनी । जें गुह्य गुह्याहूनी, । तें बोलिलों म्हणतसे. ॥ २३६६ ॥ **इति** म्हणजे ऐसें येथपर्यंत । ज्ञान जें गुह्य गुह्याहूनी अत्यंत, । तें तुज बोलिलों, म्हणे भगवंत, । कीं, गुह्य शास्त्रज्ञान, अनुभव गुह्य त्याहुनी. ॥ २३६७ ॥ हें ज्ञान म्यां तुजप्रती । सांगितलें अगा ! सुमती ! । हें अशेषें विचारूनी बरवे रीती, । करीं तैसें, जैसें मानेल. ॥ २३६८ ॥ भाव ऐसा कीं प्रारब्धगती । तुज ऐसी कळली नव्हती, । म्हणूनी निश्चय तुझी मती । करीताहे कीं 'युद्ध न करावें.' ॥ २३६९ ॥ तरी तेंही कळलें तुजला । कीं, 'तोची ईश्वर बोलिला मजला, । जो हृदेशीं प्रेरक समजला । माझिया बुद्धीतें. ॥ २३७० ॥ आतां याचें वचन न करावें, । तेव्हां केवळ वायांच जावें, । तरी आज्ञा याची सद्भावें । कां न धरावी मस्तकीं ?' ॥ २३७१ ॥ ऐसें समजला अर्जुन, । ओळखिलें आपलें प्राक्तन, । आतां युद्धाविषयीं प्रतिवचन । न बोलेल ऐसें सर्वथा. ॥ २३७२ ॥ म्हणे या भावेंकरूनी । 'जाणसी तैसें करीं,' म्हणोनी । बोलोनी, आतां येथूनी । कर्मत्यागप्रसंग बोलेल. ॥ २३७३ ॥ युद्ध करणें प्रारब्धभोग, । ऐसें समजला, आतां सर्वधर्मत्याग । करावा, अनन्य भक्तियोग । येथूनी बोलों पाहतो. ॥ २३७४ ॥ कीं ज्ञान जालियावरी । ज्ञानपरिपाक व्हावा तदुपरी, । त्या प्रसंगीं हरी । बोलेल दोनी

प्रकार. ॥ २३७५ ॥ जें द्वादशीं बोलिलें स्वयें, । तेंच पुन्हा बोलतो निश्चयें, । म्हणूनी पुनरुक्तीच्या निर्णयें । विशेषगुह्य सांगतों, म्हणतों या श्लोकीं.॥२३७६॥

**सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।**

**इष्टोऽसि मे दृढमितिततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥**

अगा! शास्त्रगुह्य परम, । त्याहूनी गुह्य अपरोक्ष कळणें ब्रह्म । आतां त्या सर्वां गुह्यांत गुह्य परम । आईक, सांगतों तुज पुन्हा. ॥ २३७७ ॥ गुह्यांत गुह्य आत्मज्ञान । तें अपरोक्ष देखिलें निधान, । तरी अखंड बाणे तेव्हां समाधान, । त्यास अभ्यास पाहिजे. ॥२३७८॥ म्हणूनी अर्जुनाच्या प्रसंगें । क्रम सर्वांस उपयोगी श्रीरंगें । द्वादशीं बोलिला कृपापांगें । आम्हां सर्वांस लक्षूनी सर्वज्ञ. ॥ २३७९ ॥ "**मय्येव मन आधत्स्व**"[1] या श्लोकेंकरूनी । "**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं**" म्हणोनी । याचा मथितार्थ 'स्वरूपीं चित्त योजूनी, । स्थिर राहें' ऐसें बोलिला. ॥ २३८० ॥ कीं साधक जन्मांतरीं । योगभ्रष्ट असिला जरी, । ज्ञान होतांच तदुपरी । त्याचे स्वरूपीं चित्त धारेल. ॥ २३८१ ॥ तैसा नसेल जरी, । आतां अभ्यास मांडावा तरी, । म्हणूनी द्वादशीं बोलिला हरी, । "[2]**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि**" हा श्लोक. ॥ २३८२ ॥ कीं यानंतर । चित्त स्वरूपीं स्थिर । जरी करूं न शकसी, म्हणे सर्वेश्वर, । तरी अभ्यास करीं तूं. ॥ २३८३ ॥ अभ्यासें ज्ञानपरिपाक, । ते भक्त हो अथवा निर्गुणोपासक, । त्यांत निर्गुणपरांस अभ्यासची एक, । भक्तांस बळ भक्तीचें. ॥ २३८४ ॥ कठिण लागला अभ्यास, । तरी अभ्यासची करणें निर्गुणपरास, । श्रवणकीर्तन भक्तांस । अभ्यास सुगम होतसे. ॥ २३८५ ॥ तैसाच अर्जुन भक्त आपला, । म्हणूनी भक्तिमार्ग त्यातें उपदेशिला, । तेव्हां द्वादशीं हा श्लोक आरंभिला, । कीं, "[3]**अभ्यासेऽप्यसमर्थोसि मत्कर्मपरमो भव.**" ॥ २३८६ ॥ कीं, अभ्यासही करावया । जरी अशक्त अससी, धनंजया! । तरी माझीं कर्मेंची तूं अगा! भक्तराया! । करीं परम साधनें मानुनी. ॥ २३८७ ॥ श्रवणकीर्तनादि धर्म । हे **भागवतधर्म** भगवत्कर्म, । हेंची आपणासी परम, । [4]ज्ञानपरिपाक याचकरितां ॥ २३८८ ॥ ऐसा मत्कर्मपरम । होय म्हणोनी पुरुषोत्तम । द्वादशीं बोलिला ते भागवतधर्म । अष्टादशीं उत्तरश्लोकीं बोलेल. ॥ २३८९ ॥ "**मन्मना भव मद्भक्तो**" या श्लोकेंकरूनी । "**मद्याजी मां नमस्कुरु**"

---

१. अ० १२, श्लो० ८. २. अ० १२, श्लो० ९. ३. अ० १२, श्लो० १०. ४. यांच्या योगानेंच ज्ञान पूर्णतेला व दृढतेला येतें.

म्हणोनीं। बोलेल, हेंच द्वादशीं सुचवूनी। बोलिला कीं "**मत्कर्मपरमो भव.**" ॥ २३९० ॥ तेंची अष्टादशीं विशद। बोलों पाहतो मुकुंद,। याकारणें 'पुन्हां आईक' म्हणतो गोविंद। "**सर्वगुह्यतमं भूयः शृणु**" म्हणोनी. ॥ २३९१ ॥ कीं, ज्ञानपरिपाक पावे,। चित्त चित्स्वरूपीं स्थिरावें,। तेव्हां मुक्ति; तरी त्या स्थैर्याकारणें करावे। हे भागवतधर्म. ॥ २३९२ ॥ द्वादशीं बोलिला हे भक्ती,। अष्टादशीं विशद पुनरुक्ती,। आणि पावावया जीवन्मुक्ती। उपाय दुसराही असे ज्ञानियाला. ॥ २३९३ ॥ कीं सगुण वासुदेवची सकळ,। योग ऐश्वररूप ऐसें प्रांजळ। समजोनी, तें बिंबावया केवळ। तदाश्रित व्हावें, टाकूनी सर्व धर्मातें. ॥ २३९४ ॥ तेंही द्वादशीं देवाधिदेव। "**अथैतदप्यशक्तोसि**" या श्लोकीं वासुदेव। बोलिला, कीं, न ठाके मत्कर्म, तरी सर्व। कर्में टाकीं, आणि होईं आश्रित माझ्या ऐश्वर योगातें. ॥ २३९५ ॥ ऐसा दुसरा उपाय द्वादशीं। भागवतधर्मापुढेंची उपदेशी,। तैसेंच बोलेल अष्टादशीं। भागवतधर्मापुढेंची त्याग धर्माचा. ॥ २३९६ ॥ ऐसेंची द्वादशीं बोलिला कीं। 'मत्कर्मपर होय' "**मत्कर्मपरमोभव**" याच श्लोकीं,। त्यापुढिल्याच श्लोकीं म्हणे कीं 'टाकीं। सर्व कर्में !' ॥ २३९७ ॥ तेथें 'सर्वकर्मफलत्याग। करीं' म्हणूनी बोलतो फळभाग,। कैंचा उरला करावया त्याग। कर्म टाकितां ? हे शंका. ॥ २३९८ ॥ तरी फळशब्दें सुखस्पृहा। या अर्थी नुरे अवकाश संदेहा,। कीं, कर्म टाकूनीही विषयासक्त हा। झणीं होय. ॥ २३९९ ॥ याचा निर्णय द्वादशीं। विशद जाला, आतां अष्टादशीं। याच क्रमें गुह्य प्रकाशीं। "**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज.**"॥२४००॥ ज्या क्रमें बोलिला द्वादशीं,। त्या क्रमें तैसेंची अष्टादशीं,। विशद जो भगवंत उपदेशी,। तोची 'पुनरुक्तीनें तें' म्हणे 'पुन्हा आईक.' ॥ २४०१ ॥ तें सर्वांत गुह्यतम,। कीं, अपरोक्षज्ञानची गुह्यतम,। त्या ज्ञानें भागवतधर्म परम। गुह्यतम अर्जुना ! ॥ २४०२ ॥ आणि करूनी सर्वधर्मत्याग। धरावा जो अद्वैत सगुण ऐश्वर योग,। तोही भागवतधर्म जो भाग। केवळ अद्वैतसाक्षात्कार बिंबावयाचा. ॥ २४०३ ॥ जो नवमीं ज्ञानदृष्टीकरूनी। "**पश्य मे योगमैश्वरं**" म्हणोनी। तुज दाविला, त्याचाच आश्रय धरूनी। तोची बिंबावया त्याग सर्वा कर्माचा. ॥ २४०४ ॥ हें सर्व गुह्यतम। पुन्हा माझें वचन परम। आईक, म्हणतो सर्वोत्तम,। कीं सर्वधर्मत्याग आश्रयें याच योगाच्या. ॥ २४०५ ॥ "**एतां विभूतिं योगं च**" या श्लोकीं। दशमीं श्री-

१. अ० १२, श्लो० ११. २. अ० ९ श्लो० ५. ३. अ० १०, श्लो० ७.

कृष्ण बोलिला, कीं, । जो या विभूति आणि योग या लोकीं ।, तत्त्वतां जाणे. ॥ २४०६ ॥ तो अविकंपयोगेंकरूनी । म्हणजे स्थिर योगें योजेल म्हणोनी, । बोलिला, त्या मातें शरण ये, टाकूनी । सर्व धर्म, ऐसें बोलेल. ॥ २४०७ ॥ हे उपाय योगसिद्धीचे । जे पूर्वी बोलिले साचे, । तेच पुन्हां स्ववाचे । विशद बोलों पाहतो शेवटीं. ॥ २४०८ ॥ येथें "**भूयः शृणु**" म्हणोनी, । इतकें 'पुन्हा बोलों पाहतो' यावरूनी । या श्लोकीं बोलणें लागलें, परंतु विवरूनी । ते ते स्थळींच असे हें बोलणें. ॥ २४०९ ॥ ऐसें जें बोलों पाहे, । तें सर्वांत सार आहे, । म्हणूनी करुणापांगें पाहे । आणि म्हणे "**इष्टोऽसि मे.**" ॥ २४१० ॥ अगा ! माझा तूं इष्ट, । सखा, भक्त उत्कृष्ट, । म्हणूनी हें पुन्हा स्पष्ट । सर्व गुह्यतम सांगों पाहतों. ॥ २४११ ॥ आतां सर्व धर्मत्याग । सांगतां, तूं टाकूं पाहसी स्वकर्मयोग, । म्हणूनी शंका मानावी, तरी तो भोग । पूर्वकर्माचा अचूक होणार, बोलिलों. ॥२४१२॥ तें तुवां आइकलें । युद्ध करणें अंगीकारिलें, । आणि आम्हांस पूर्ण कळलें । कीं तूं दृढमती. ॥ २४१३ ॥ आइकोनी प्रारब्धाचा निर्णय, । बुद्धींत युद्धाचा केला निश्चय, । टळसी काय तो तूं धनंजय । आतां या आपुल्या निश्चयातें ? ॥ २४१४ ॥ युद्ध करणें प्रारब्धभोग, । आणि आतां सर्व धर्मत्याग । बाणावया सर्वात्मयोग । मी बोलतों, ऐसें समजसी. ॥ २४१५ ॥ कीं तूं अगा ! दृढमती, । या भावें 'तूं दृढमती' म्हणे श्रीपती, । आणि ऐसेंही म्हणे त्याप्रती, । कीं, "**ततो वक्ष्यामि ते हितं.**" ॥२४१६॥ कीं दृढमती तूं अत्यंत, । युद्ध करिसीच निश्चित, । म्हणूनी तुझें जें परमहित, । तें सांगतों. ॥ २४१७ ॥ कीं भागवतधर्म । सांगोनी, मग टाकीं म्हणे सर्व धर्म । तेथें पुन्हा हट करीना ऐसें वर्म । या श्लोकीं बोलिलें. ॥ २४१८ ॥ कीं, 'सर्व धर्मत्याग । मज करीं, म्हणतो श्रीरंग; । तेव्हां युद्ध स्वधर्म याचाही प्रसंग । त्यागांत आटला.' ॥ २४१९ ॥ ऐसें म्हणेल अर्जुन, । परंतु बळवंत हें याचें प्राक्तन, । त्याचा भोगविता आपण जगजीवन । हें मागें बोलिला. ॥ २४२० ॥ हट करितां प्रारब्धाशीं, । पावोनी बुद्धिभ्रंशासी, । ज्ञान आच्छादूनी तयासी । युद्धीं योजील. ॥ २४२१ ॥ तेव्हां हा वायां जाईल, । मग अहंकार युद्ध करील, । म्हणूनी युद्धनिश्चय जतन करसील, । अगा ! दृढमति ! देव म्हणे. ॥ २४२२ ॥ आतां दोनी भागवतधर्म, । त्यांत एक ज्ञान आणि कर्म, । दोहींस स्पर्शला तो, पुरुषोत्तम । प्रथम बोलतो या श्लोकीं. ॥२४२३॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥**

मी सर्वात्मा, चित्स्वरूप, । सर्वां रूपीं अरूप, । ऐसें मनें विश्वरूप । पाहें, मन्मना होय ऐसा. ॥ २४२४ ॥ मनाची जेथवरी धांव, । आणि त्यास कल्पायाची जितकी हांव, । तितका मीच, तें अवघें नांव; । मग नांव मात्र, सोनेंची अवघें. ॥ २४२५ ॥ ऐसें देखिलें न देखिलें, । आइकिलें न आइकिलें; । सर्व मीच, ऐसें तों तुज कळों आलें; । होईं आतां मन्मना. ॥ २४२६ ॥ ऐसा अनुभव ज्या मना, । सिंधु त्या लहरीचाही मी कीं, अर्जुना! । तेव्हां मनास मनपण मजवीण असेना, । होईं मन्मना ये रीती. ॥ २४२७ ॥ म्हणसील 'हें खरें, । परी मन थारेना', ऐसें बरें, । तरी आत्मप्रियाचा माझा आदरें । आत्मभावेंच होईं भक्त. ॥ २४२८ ॥ भक्ति ज्यास, तो भक्त, । त्यांत आत्मत्वें सगुणचरणीं अनुरक्त । तो लेखावा भक्तियुक्त । मुख्यत्वेंकरूनी. ॥ २४२९ ॥ कीं निर्निमित्त आत्मा प्रिय, । आणि कधीं नव्हे अप्रिय, । आणि अव्यभिचारिणी प्रीतीचा आश्रय, । आत्मत्वेंची सेवितां सगुणातें. ॥२४३०॥ भक्तीस लक्षणें असावीं तिनी, । आणि नसावे दोष तद्वैपरीत्येंकरूनी, । आत्मत्वें सगुण भजल्यावांचुनी । भक्ति ऐसी अघटित[1]. ॥२४३१॥ प्रथम लक्षण, **निर्निमित्त,** । कीं आवडीस नसावें निमित्त, । धनमानाकारणें एकचित्त । प्रेमें भजती रायासही. ॥ २४३२ ॥ निर्निमित्त लक्षण, । निमित्तें भक्ति तद्विलक्षण, । दोष भक्तीस निमित्तपण, । निर्निमित्त लक्षण भक्तीचें. ॥ २४३३ ॥ ईश्वरास मागे भुक्ती, । अथवा मागे मुक्ती, । तेव्हां ते आवडीची अभिव्यक्ती । देवाची आपणाकारणें. ॥ २४३४ ॥ कुटुंबार्थ राजसेवा । आवडीनें करी, तैसीच देवा । भजे आवडीनें, ते सेवा । आपणानिमित्त देवाची. ॥ २४३५ ॥ आवडी लटकी रायाची, । आवडी आपल्या कुटुंबाची; । तैसी आवडी आपली आपणास साची, । भक्ति देवाची आत्मार्थ. ॥ २४३६ ॥ तोच आत्मा स्वयमेव । प्रतीतीस ये कीं हाच देवाधिदेव, । मग त्या आवडीनें भजतां देव । निर्निमित्त निर्दोष ते भक्ती. ॥ २४३७ ॥ दुसरें भक्तीचें लक्षण । कीं देव अप्रिय न वाटावा क्षण, । ते **अव्यवहिता** भक्ति, तद्विलक्षण । व्यवहिता भक्ति, तो दोष न असावा. ॥ २४३८ ॥ भेदें भजतां नारायण, । शीघ्र नव्हतां कल्याण, । नावडी उपजे एक क्षण, । तेव्हां तितकेंची तें व्यवधान प्रीतीचें. ॥ २४३९ ॥ नारायण आत्माच आपुला, । ज्यास बोध ऐसा

१. अशक्य, असंभवनीय.

जाला, । मग आत्मा अप्रिय कधीं तरी त्याला । होय, तरी ते क्षणीं होय तोही अप्रिय. ॥ २४४० ॥ तरी देह जो प्रिय अत्यंत, । तोही अप्रिय अंतवंत, । जेव्हां कळे आत्मा अनंत । देहावेगळा. ॥ २४४१ ॥ किंबहुना अज्ञानी[१]। नेत्रनासिकादि देऊनी । 'मज वांचवा, रे!' म्हणूनी । म्हणे प्रीतीनें आत्मयाच्या. ॥ २४४२ ॥ नवल प्रीति आत्मयाची, । कीं ओळखी नसोनीही तयाची, । त्यासारिखी प्रीति साची । नसे ओळखीच्या देहाची आपल्या. ॥ २४४३ ॥ ओळखीचा देह तैसा नावडे, । तेथें स्त्रीपुत्रधन कोणीकडे? । एका आत्मयावांचूनी ऐसें न घडे, । कीं, आवडी सकळांपरीस ओळखीवांचुनी.॥२४४४॥ प्रिय ओळखीवीण । पदार्थ ऐसा कवण? । हें अघटित आवडीचें लक्षण, । नसे अन्यत्र आत्मयावांचुनी. ॥ २४४५ ॥ ओळखीवांचुनी आवडी, । आणि अप्रिय नव्हे कोणे घडी, । क्षण एक याची प्रीति सोडी, । ऐसा लोकत्रयांत कोणी दिसेना. ॥ २४४६ ॥ शरीर जें जो पावला, । तेथेंही तो प्रिय वाटला; । आत्मा अप्रिय कधीं कोणास जाला, । हें अघटित. ॥ २४४७ ॥ तोची आत्मा हरी, । ह्मूण ऐसी कळे खरी, । तेव्हां ह्मणावी भक्ति बरी । अव्यवहिता. ॥ २४४८ ॥ ईश्वर आणि आत्मत्व । भिन्न नसती, ऐसें कळे तत्त्व, । तेव्हां प्रीतीचें उडे व्यवहितत्व, । अव्यवहिता ते भक्ती. ॥ २४४९ ॥ ऐसें अव्यवहितत्व लक्षण, । आणि व्यवधान दोष नसे विलक्षण, । त्या आत्मप्रीतीनें कमलेक्षण । भजे, तो भक्त बोलावा. ॥ २४५० ॥ आतां **अव्यभिचारित्व** तिसरें लक्षण, । तें विलक्षण व्यभिचारदोषावीण, । भक्ति तरी घडे, कीं, जरी एकपण । कळे ईश्वराचें आपलें, ॥ २४५१ ॥ जे दों स्थळीं प्रीती, । ती व्यभिचारिणी भक्ति म्हणती, । भेदें प्रिय आपला आत्मा आणि श्रीपती, । तत्रापि अधिक आत्मा आपला. ॥ २४५२ ॥ प्रीति आपली उडे, । तरी ईश्वरीं भक्ति कां जडे? । भजणेंची तेव्हां न घडे, । कीं भजननिमित्त आपुलें एक जाण. ॥ २४५३ ॥ तो आत्माच आपला । उपास्य परमात्मासा कळला, । तेव्हां व्यभिचारदोष निःशेष गेला, । भक्ति अव्यभिचारिणी ते मग. ॥ २४५४ ॥ ऐसी भक्ति त्रिविध जया, । 'भक्त उत्तम' म्हणावें तया, । या भावें म्हणे, 'धनंजया! । होईं मद्भक्त.' ॥ २४५५ ॥ कीं ज्ञान तुज जालें, । परंतु परिपाकातें नाहीं पावलें, । यालागीं साधन बोलणें लागलें, । कीं, भक्तीसारिखें नसे इतर साधन. ॥ २४५६ ॥ म्हणसी, 'आहेंच भक्त, । विशेषें

१. एकदां भयंकर रोग झाला असतां, रोगी शस्त्रप्रयोग करून घेऊन आत्मा-प्राण-वांचविण्यासाठीं एकादा अवयवही कापून टाकण्यास तयार होतो.

जालों ज्ञानयुक्त, । हें सत्य परी ज्ञणीं नुसतें अव्यक्त । उपासिसी, सोडूनी सगुणभक्तीतें. ॥ २४५७ ॥ या भावें म्हणे, 'होईं भक्त,' । अन्यथा तो पूर्वीच भक्तियुक्त, । आतां आत्मज्ञानें होई जीवन्मुक्त । भक्तीकरूनी, हा भाव. ॥ २४५८ ॥ आत्मप्रीति सगुणीं । नसतां, प्रीति थारे निर्गुणीं, । तेव्हां भक्तांत कोण गणी ? । तो अव्यक्तोपासकची बोलावा. ॥ २४५९ ॥ भक्ति निर्गुणपणीं घडे, । परी भक्तवात्सल्य तेथें न सांपडे, । 'वात्सल्य' म्हणतांच उडे । निर्गुणत्व. ॥ २४६० ॥ एकची निर्गुणसगुणपण, । परी निर्गुणोपासकां प्राप्ति निर्गुण, । सगुणोपासकां सगुण, । कीं, ज्या रूपीं भजे, प्राप्ति त्याच्या रूपीं. ॥ २४६१ ॥ तैसाच प्रसादगुण । जेथें, तें सगुण; । तेथेंची वात्सल्यपण, । आणि स्वभाव कल्पवृक्षाचा. ॥ २४६२ ॥ भक्ति न लागे सगुणाकडे, । वात्सल्य निर्धर्मी न सांपडे; । एवं सगुण ज्या नावडे; । तों तो कल्पवृक्ष न फळे तयातें. ॥ २४६३ ॥ ज्ञान जालियाउपरी, । कां सगुण म्हणती यांवरी ? । ऐसें म्हणतील, त्याला 'हरी । कां मी उद्धरूं ?' म्हणतसे. ॥२४६४॥ द्वादशीं[1] निर्गुणोपासकांस । बहुत बोलिले आयास, । कीं, त्या निर्गुणात्मज्ञानियांस । भक्ति सगुणीं असेना. ॥ २४६५ ॥ ते मातेंची पावती, । परंतु कष्टी अधिकतर होती, । आणि भक्तांचा उद्धर्ता मी श्रीपती । म्हणे अतिसत्वर होतसें. ॥ २४६६ ॥ हें द्वादशीं विशद । वाखाणिलें प्रतिपद, । म्हणूनीं शेवटीं येथें म्हणतो मुकुंद । 'मद्भक्त होईं' म्हणोनी. ॥ २४६७ ॥ बोलोनी गुह्यें सकळ, । 'हें पुन्हा गुह्य केवळ । बोलतों,' म्हणे, कीं, प्रांजळ[2] । जें द्वादशीं बोलिलें. ॥ २४६८ ॥ देऊनी अपरोक्षानुभव, । दावूनी योग ऐश्वर सगुणविभव, । शेवटीं म्हणतो माधव । 'होईं मद्भक्त' म्हणोनी. ॥ २४६९ ॥ एवंच अर्जुन ज्ञानी, । आणि मुख्य भक्ति न घडे ज्ञानावांचुनी, । याकारणें 'मद्भक्त होईं' म्हणोनी । बोलिला, त्याचा हा अर्थ. ॥ २४७० ॥ 'मद्भक्त होईं' म्हणोनी । बोलोनी या भावेंकरूनी, । म्हणे 'मद्याजी होईं', यावरूनी । 'मदर्थ कर्में करावीं' म्हणतसे. ॥ २४७१ ॥ कीं अग्नीं होमिलेंही यजन, । आणि यजनची बोलावें पूजन, । एवं जें जें कांहीं भजन, । तें सर्व यजन बोलावें. ॥ २४७२ ॥ मथितार्थ कीं स्वधर्म । जें करिसी युद्धादि कर्म, । तें मदर्थेची करीं, हा भागवतधर्म । वारंवार मागें बोलिला. ॥ २४७३ ॥ आणि मातें नमस्कार । सर्वात्मभावें वारंवार । करीं, म्हणे, कीं, वंदनप्रकार । अर्जुनें विश्वरूपीं प्रार्थिलें. ॥२४७४॥ 'नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते'[3] या श्लोकेंकरूनी ।

१. अ० १२, श्लो० ५-७. २. उघड, स्पष्ट. ३. अ० ११, श्लो० ४०.

**'नमोस्तु ते सर्वत एव सर्व'** म्हणूनी, । सर्वत्र सर्वात्मभावें नमुनी । प्रवीण जाला, त्याला हा उपदेश. ॥ २४७५ ॥ जो आरूढ ज्या पदीं, । तो त्या पदींच, सेवी, [1]वंदी, । ज्ञानियानें श्रीगोविंदीं । भक्ति सर्वात्मभावेंची मांडावी. ॥ २४७६ ॥ गीतेंत अर्जुन ये रीती । सर्वत्र सर्वात्मभावें सुमती । वंदी, ऐसेंच गीतेवेगळें भारतीं । वंदन बोलिलें या श्लोकें. ॥ २४७७ ॥

महाभारतश्लोक—

**नमोस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे ।**
**सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटीयुगधारिणे नमः ॥१॥**

प्रथम अनंताकारणें । नमन, कीं अनंतत्वस्मरणें । वंदावा चिदात्मा अंतःकरणें । अनंतत्वें स्मरोनी. ॥ २४७८ ॥ ब्रह्मांड सप्तावरणपर्यंत, । ऐशा प्रति ब्रह्मांडीं दिसे अनंत, । परी अंडें अनंतें आणि तोही अनंत, । अंत न सांपडे कोठेंही. ॥ २४७९ ॥ अनंत नाना ब्रह्मांडरूपें, । अनंतची अधिष्ठान चित्स्वरूपें; । जेथवरी शिंपी, तेथवरी रूपें; । जेथवरी दोर, सर्प तेथवरी. ॥ २४८० ॥ नसे ब्रह्मांडांचा अंत, । तीं व्यापूनी उरला तोही अनंत, । दोहीं रूपीं तो साक्षी भगवंत, । न देखे अंत, जेंवी डोळस आकाशपुष्पातें. ॥ २४८१ ॥ एवंच मन पांगुळें अनंत उरे, । तेव्हां अनंतीं अनंतत्व स्फुरे, । या अनुभवें वंदितां मुरे । चित्सागरीं तरंग चित्ताचा. ॥ २४८२ ॥ ब्रह्मांडकोटींच्या लहरी । स्फुरती जया चित्सागरीं, । लहरी मनाचीही तदनंतरीं । तेंच वाटे. ॥ २४८३ ॥ अथवा ब्रह्मांडलहरींच्या मूर्ती । चित्सागरीं ध्यातां, चिन्मात्रस्फूर्ती । उरे, तेव्हां तदैकस्मृती । उन्मनीं लागे; ॥ २४८४ ॥ ते **शुद्ध उन्मनी**; । आणि चिद्रूपें रूपें स्फुरती मनीं, ते । **शबल उन्मनी** म्हणोनी; । म्हणती प्रवीण योगवेत्ते. ॥ २४८५ ॥ त्यांत पहिलें नमन, । जों शुद्ध उन्मनी अवस्था पावलें मन; । होतां कल्पनेचें उत्थान । नमस्कार दुसरा. ॥ २४८६ ॥ प्रस्तुतीं जों स्वरूपीं ऐसें उन्मन, । तोंवरी अनंतीं एक नमन; । करितांच आकाराचें चिंतन, । स्फुरती अनंत ब्रह्मांडें. ॥ २४८७ ॥ **सहस्र**शब्दें अनंत, । मूर्ति ब्रह्मांडपंक्ति अगणित । स्फुरती, तो सहस्रमूर्ति श्रीअनंत । **'सहस्रमूर्तये नमो'** म्हणूनी वंदावा. २४८८ ॥ तों नाना उंबरांत जैसे किडे, । प्रतिब्रह्मांडीं चहूंकडे । नाना देह, त्यांवरी पडे । उडी नमस्कारकल्पनेची. ॥२४८९॥ एकाच उंबरास नाना उंबरें, । तैसींच नाना अंडें धरिलीं ईश्वरें; । प्रतिब्रह्मांडीं शरीरें, । किडे जैसे प्रतिफळीं. ॥ २४९० ॥ कृमि ते

---

१. 'बंदी' असा पाठ आढळतो. २. 'ऐसा' असा पाठ आढळतो.

उंबरांप्रती, । परी एकामधील दुसरें न जाणती, । आणि त्या वृक्षासही नेणती, । भक्षूनी त्या वृक्षाच्या रसातें. ॥ २४९१ ॥ ऐसें अविद्यावृत । न जाणती, कीं अंडें ऐसींच बहुत; । तीं अनंतें आणि कर्ता अनंत, । हेंही कळेना. ॥२४९२॥ ज्ञानी भक्त हें जाणती, । ते अनंतत्वें जेव्हां वंदिती, । तेव्हां ब्रह्मांडांप्रती । देह स्फुरती तयांतें. ॥ २४९३ ॥ तों पाय, डोळे, शिर, मांडिया, । चित्कनकमूर्तीच अवघिया, । तेव्हां वंदावें अनंता आत्मया । "सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे" म्हणोनी. ॥ २४९४ ॥ करितां ऐसा नमस्कार, । अवघा चित्सिंधु जडतरंगाचा आकार, । सोनेंची नाना अलंकार, । तेव्हां तीं नांवें कुंडलादि सर्वही सुवर्णाचीं. ॥ २४९५ ॥ तेव्हां ब्रह्मादि नांवें । त्या अनंताचींच ऐसें म्हणावें, । या अनुभवेंकरूनी वंदावें । "सहस्रनाम्ने" म्हणोनी. ॥ २४९६ ॥ ऐसें करी नमन, । जीव नाना देहीं स्मरे मन, । तेव्हां भक्तें करावें वंदन । "पुरुषाय नमो" म्हणोनी. ॥२४९७॥ कीं नवद्वार पुरें, । आणि पुरेंची अवघीं शरीरें स्थावरें, । त्या नाना शरीरीं एकसरें । प्रतिबिंबला तो अनंत. ॥ २४९८ ॥ आकाश जैसें सर्वगत, । पुरुष तैसा सर्वत्र अनंत, । आणि ज्या घटीं जळ, तयांत । मठाकाश प्रतिबिंबे, तैसा पुरुष तो. ॥ २४९९ ॥ एवं ऐशा पुरुषाकारणें । हें नमन, ऐसें अंतःकरणें । स्मरोनी, वंदन करणें । अनंता तया. ॥ २५०० ॥ हें अनंतत्व देशेंकरूनी । वंदिलें, कीं, अंत कोणे रूपीं नाहीं, म्हणुनी । निराकार साकार रूपें दोनी । अंत न दिसे उभयत्र. ॥ २५०१ ॥ आतां काळेंकरूनी अंत । नसे, तो वंदावा अनंत, । कीं, कधींपासूनी कोण काळपर्यंत, । आदि, अंतही, अनंतीं असेना. ॥ २५०२ ॥ परी निराकार जगदाकार, । यांत शाश्वत, अशाश्वत, दोनी प्रकार; । त्यांत जग अशाश्वत, आणि जगदाधार । शाश्वत अधिष्ठान सर्वांचें. ॥ २५०३ ॥ प्रवाहरूपें अनंत । त्रिगुणसृष्टि ही अत्यंत, । कीं, कधींपासूनी कोठपर्यंत । अंत नसे जगत्प्रवाहातें. ॥ २५०४ ॥ सृष्टि होय, स्थिति असे, । प्रलय होतां कांहीं नसे, । तथापि हें चक्र भ्रमतां दिसे । अनादि आणखी अनंत. ॥ २५०५ ॥ आतां अधिष्ठानविवर्त, । यांत अधिष्ठान शाश्वत, । कीं, उत्पत्तिनाशरहित । जें एक प्रकार, तें 'शाश्वत' म्हणावें. ॥ २५०६ ॥ शाश्वतीं कालत्रय, । सृष्टि, स्थिति, प्रलय, । तो काळ आणि त्या काळें त्रिगुणमय । उपजे हें अशाश्वत सकळही. ॥ २५०७ ॥ मुख्य काळ अधिष्ठान । विभूतीअध्यायांत भगवद्वचन ।

"अहमेवाक्षयः कालो" म्हणून । काळही शाश्वत त्या रूपीं. ॥ २५०८ ॥ दुसरा विभूतिरूपेंची करूनी । "कालः कलयतामहं" म्हणोनी, । देव म्हणे हीं रूपें दोनी, । तस्माच्छाश्वत तोची आत्मा. ॥ २५०९ ॥ या भावें आत्मा शाश्वत, । त्याच्या ठायीं अवघें अशाश्वत, । तथापि सर्वेही तो स्वयें अनंत, । म्हणूनी सर्वभावें वंदावा. ॥ २५१० ॥ तरंग जरी अशाश्वत, । आणि सागरची शाश्वत, । तथापि गोड सेव्य संमत । दोन्ही रूपें क्षीराब्धी. ॥२५११॥ त्यांत देशेंकरूनी अनंत । वंदी; आतां काळरूपेंही अच्युत । अनंतत्वें वंदावा, तो शाश्वत । धरी अशाश्वता युगकोटीतें. ॥ २५१२ ॥ 'शाश्वतस्वरूपीं जो हरी । युगें सहस्रकोटी धरी, । नमो त्याकारणें,' ऐसेपरी । भगवंत भागवतें वंदावा. ॥ २५१३ ॥ हे हा नमस्कार ऐसे करूं, । म्हणूनी अर्जुनातें जगद्गुरू । प्रस्तुतीं म्हणे, कीं, "मां नमस्कुरु", । कीं विश्वरूपीं वंदी ऐसेंची अर्जुन. ॥ २५१४ ॥ ज्ञानी भक्त ये रीती । सर्वात्मभावें वंदिती, । ऐसेंच श्रीमद्भागवतीं । बोलिलें सर्वत्र वदन. ॥ २५१५ ॥

श्रीमद्भागवतश्लोक—

**खं वायुमग्निं सलिलं महीं च ज्योतींषि सत्त्वानि दिशो द्रुमादीन् ।**
**सरित्समुद्रांश्च हरेः शरीरं यत्किं च भूतं प्रणमेदनन्यः ॥**

आकाश, वायु, अग्नि, जळ, । भूमि, आणि सूर्यादि ज्योति सकळ, । प्राणी सकळ, दिशा, वृक्ष, अचळ, । नद्या, समुद्र, इत्यादि शरीर हरीचें विश्व हें. ॥ २५१६ ॥ आणखी अदृष्ट अश्रुत । सर्वेही स्वयें अच्युत, । आणि आपणची तो हरि, ऐसें अद्वैत । अनुभवीतच, भक्तें वंदावें. ॥ २५१७ ॥ पुसे जनक नवयोगियांप्रती, । पुसतां भागवतधर्मातें ये रीती, । नमस्कार सर्वात्मतेनें बोलती । जनका ब्रह्मनिष्ठानें. ॥ २५१८ ॥ जैसा आत्मसाक्षात्कार । अर्जुनातें देऊनी, आतां 'मातें नमस्कार । करीं 'म्हणतां. येथें एतत्प्रकार । भाव सहजची निवतसे; ॥ २५१९ ॥ कीं ज्ञान जाल्यिानंतर । सर्वात्मभावें निरंतर । वंदावा आत्मा सर्वेश्वर, । विश्वरूपें, काळरूपेंही. ॥ २५२० ॥ 'लुटीं' म्हणतां सहस्रार्जुना, । तो दोंच हातें लुटील, हे घडेना; । सर्वात्मता कळली त्या अर्जुना । 'मां नमस्कुरु' म्हणतां तो काय एक देशीं वंदील ? ॥ २५२१ ॥ "नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते" म्हणोनी, । 'अगा ! सर्वा !' म्हणूनी सर्वभावेंकरूनी, । जो जाला निपुण विश्वरूपीं वंदूनी, । तो काय एक देशीं वंदील ?

१. अ० १०, श्लो० ३३ २. अ० १०, श्लो० ३०. ३. 'वदी' असा पाठ आढळतो.

॥ २५२२ ॥ पूर्वार्धी भक्ति उपदेशुनी, । फळ बोलतो उत्तरार्धेकरूनी, । म्हणे 'मातेंची पावसी,' म्हणोनी । 'सत्य बोलतों, अर्जुना!' ॥ २५२३ ॥ अगा! हे प्रतिज्ञा करितों, । बाहू उचलोनी बोलतों, । 'भक्ति करितांची मातें पावसी' म्हणतों, । सत्य प्रतिज्ञा हे माझी. ॥२५२४॥ आणि म्हणे भगवंत, । कीं, तूं प्रिय माझा अत्यंत, । हें रहस्य यानिमित्त । सांगतों तूतें. ॥ २५२५ ॥ 'अर्जुना! तूं माझा प्रिय,' । म्हणे येथें रुक्मिणीप्रिय, । याहूनी महिमा वर्णील काय । सहस्रमुखही भक्तीचा? ॥ २५२६ ॥ जो लक्ष्मीस प्रिय अत्यंत, । तो स्वयें म्हणतो भगवंत, । कीं, तूं प्रिय आहेस निश्चित । अर्जुना! माझा.॥२५२७॥ आणि तूं माझा प्रिय, । ऐसें बोलतो भक्तप्रिय, । सगुणभक्तीचा निर्णय । सुचवूनी. ॥ २५२८ ॥ कीं, निर्गुणास कोणी प्रिय । नसे, अथवा न कोणी अप्रिय; । जे भजती नुसतें तोची अद्वय, । ते अभ्यासानुरूप पावती सिद्धीतें. ॥२५२९॥ जे सगुणरूपीं भजती, । त्यांचवरी सगुणाची माझी प्रीती, । एवं तूं मद्भक्त, म्हणोनी ये रीती । रहस्य भक्तीचेंच बोलिलों. ॥२५३०॥ परंतु येथें संशय, । कीं, भक्ति करितांच जाला प्रिय, । त्यास मागुती उपदेश काय । भक्तीचा? म्हणूनी हे शंका. ॥ २५३१ ॥ तरी पुत्र आवडे पितया, । आणि पिता आवडे बाळा तया, । तथापि आवडी अधिक त्या स्वतनया । लागे ऐसी स्वसेवा शिकवीच कीं. ॥ २५३२ ॥ ऐसा जरी मी प्रिय तुजला, । आणि तूंही प्रिय अगा! मजला, । परंतु अद्वैतभक्तिपथ नव्हता समजला । तुज, तो विशेषें बोलिलों ये रीती. ॥ २५३३ ॥ कीं ज्ञानपरिपाकाविना । मोक्ष न घडे अर्जुना! । म्हणूनी हे भक्तिरचना । पुन्हा विशद बोलिलों. ॥ २५३४ ॥ ऐसें सुचवी देव, । पूर्वश्लोकीं हाची भाव, । सुचवूनी, बोलिला स्वयमेव । "सर्वगुह्यतमं भूयः शृणु" म्हणोनी. ॥ २५३५ ॥ द्वादशीं बोलिलों भक्ती, । त्याची हे पुनरुक्ती, । द्वादशीं माझी ऐसी उक्ती, । कीं "अभ्यासेप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव" ॥ २५३६ ॥ ज्ञानपरिपाक व्हावयास । तुज बोलिलों प्रथम अभ्यास, । तोही करितां वाटे जरी आयास, । तरी 'मत्कर्मपरम होय' बोलिलों. ॥ २५३७ ॥ ऐसें बोलिलों द्वादशीं, । विशद तेंची अष्टादशीं । पुनः ऐक म्हणोनी तुजसीं । बोलिलों म्हणतों तें, असें देव म्हणे. ॥ २५३८ ॥ ज्या उक्तीची देव । पुनरुक्ति म्हणतो स्वयमेव, । द्वादशीं ते उक्ति "मत्कर्मपरमो भव" । "मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि." ॥ २५३९ ॥ कीं करितां मत्कर्म, ।

१. शेष मुखां. २. अ० १२, श्लो० १०.

आचरतां माझे भागवतधर्म, । सिद्धि पावसी, जे मी सर्वोत्तम । 'अभ्यासें पाव' म्हणतसे. ॥ २५४० ॥ एवं हे ज्ञानपरिपाकाकारणें । बोलिले पुनरुक्तिरूपें नारायणें, । द्वादशीं कृपाळूपणें । जे भागवतधर्म बोलिले. ॥२५४१॥ परंतु हे भागवतधर्म । स्पर्शले ज्ञान, आणि स्पर्शले कर्म, । जें बोलिला जगद्धाम । "मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु." ॥ २५४२ ॥ हे पुनरुक्ति अष्टादशीं, । याची प्रथम उक्ती द्वादशीं । "मत्कर्मपरमो भव" म्हणूनी उपदेशी । अपरोक्षबोध बिंबावया. ॥२५४३॥ दुसरा भागवतधर्म । तो नसे स्पर्शला कर्म, । सर्वही टाकणें, आणि ब्रह्म । जें सर्वरूप, आश्रय तयाचा त्या धर्मी. ॥ २५४४ ॥ ज्यास ज्ञानाची लागली गोडी, । सगुणीं अत्यंत आवडी, । त्याणें या भागवतधर्मामृतीं बुडी । द्यावी, आणि बाहेर न निघावें. ॥ २५४५ ॥ गार उदकाची उदकीं । बुडवितां हळूहळू विघरेच कीं । तैसा सर्वाकार सर्वेश, त्या उत्तमश्लोकीं । जो बुडी देतो, होय अनन्य तद्भक्त. ॥ २५४६ ॥ त्यावेगळे धर्म सकळ । टाकूनी, आश्रय त्याचचि केवळ । धरितां, बाणे पुष्कळ । सर्वात्मता समाधी. ॥ २५४७ ॥ हें द्वादशीं भगवंत । बोलिला, कीं, मद्योगाचा आश्रित । होऊनी, टाकीं निश्चित । सर्व कर्में, आणि स्पृहा सुखा तुच्छाची. ॥ २५४८ ॥ परी आधीं स्वधर्म देव । बोलिला, कीं, "मत्कर्मपरमो भव." । त्यापुढें दुसरिया श्लोकीं देवाधिदेव । म्हणे, हें न ठाके तुज जरी, ॥२५४९॥तरी माझा ऐश्वर्ययोग । त्यातें आश्रित होऊनी कर्मयोग । टाकीं, आणि करितां विषयभोग । फळ जें सौख्य, त्यातेंही. ॥ २५५० ॥ "अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं" या श्लोकेंकरूनी । "मद्योगमाश्रितः सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु" म्हणोनी । देव बोलिला, तेची पुनरुक्ति येथुनी । बोलतसे हा श्लोक. ॥ २५५१ ॥

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥**

सर्व धर्मातें त्यागुनी, । मी एकची जो सर्व होउनी, । त्या मातें शरण ये, म्हणोनी । पूर्वार्धीं देव म्हणे. ॥ २५५२ ॥ उत्तरार्धीं फळ याचें, । कीं, मी तुज सोडवीन हें साचें; । 'कोणापासूनी?' म्हणसील तरी ज्या पापाचें । बंधन तूज, त्या सर्व पापांपासुनी. ॥ २५५३ ॥ जरी पापाचें देखिलें बंधन, । तरी म्हणतो 'मी सोडवीन;' । परी पाप तैसेंची पुण्यही म्हणून । सर्वत्र वेदीं.

---

१. अ० १२, श्लो० ११.

॥ २५५४ ॥ भोग पापाचा वाईट, । पुण्याचा बरा उत्कट, । शृंखला सुवर्णाचीही संकट, । मुक्त दोहींपासूनी तोची मुक्त. ॥ २५५५ ॥ म्हणूनी पूर्वील संचित, । तें कर्म पापरूपची निश्चित, । तें ज्ञानपरिपाकें जळे, कीं, जेव्हां चित्त । चिन्मय चिद्वस्तूच्या अनुभवीं होतसे. ॥ २५५६ ॥ चित्त चिन्मय जालें, । तें चिदग्नींत बीज भाजलें, । ज्या बीजापासूनी उपजलें, । तें कर्म नानाभोगार्थ. ॥ २५५७ ॥ जळे जयाचें मूळ, । तो नासेच वृक्ष सकळ; । चित्तास जाळी ज्ञानानळ, । मग संचितफळ होईना. ॥ २५५८ ॥ ऐसें पूर्वकर्म, । त्यांत कांहीं धर्म, कांहीं अधर्म, दोनी बंधकेंची, हें वर्म, । कीं बेडी लोहाची, तैसीच सुवर्णाची. ॥ २५५९ ॥ एवं बंध जैसा पापाचा, । बंध तैसाच पुण्याचा, । म्हणूनी पापशब्द वाचक कर्माचा । उभयरूपीं. ॥२५६०॥ या कारणें श्रुती । पापची संचित क्रियमाण म्हणती, । विशद विचार हा वेदांतीं, । त्यास प्रमाण हें वेदांतसूत्र. ॥ २५६१ ॥

वेदांतसूत्र–तदधिगमे उत्तर पूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात् ॥

तो आत्मा कळलियावरी, । पुढील आणि पूर्वील पाप तदुपरी । न स्पर्शे आणि नासे, यापरी । वेदांतसूत्राचा अर्थ. ॥२५६२॥ त्यांत पुढिल्याचा नव्हे लेप, । म्हणजे पुढें होणार जें पुण्यपाप, । तें न स्पर्शे, जेव्हां चिदात्मस्वरूप । अकर्तेपणें बुद्धि पाहे. ॥ २५६३ ॥ आणि पूर्वील पाप । नासे, ध्यातां स्वस्वरूप; । ऐसा ज्ञानाचा प्रताप । काय एक आणि एकाच देहाच्या पापाचपुरता ? ॥ २५६४ ॥ ज्ञानें मुक्ति निश्चित, । आणि बंध तरी पुण्याचाही अत्यंत; । पापची नासे तेव्हां पुण्य संचित । ज्ञानियाचें उरेल, हें घडेना. ॥ २५६५ ॥ एवं हा अर्थची न घडे, । पापशब्द दोहींकडे, । कीं, ज्या पुण्यें बंधीं पडे, । तेंही पापचि बोलावें. ॥ २५६६ ॥ याच वेदवेदांतरीतीकरूनी । मी सर्वा पापांपासुनी । सोडवीन, शोक न करणें, म्हणोनी । देव म्हणे. ॥ २५६७ ॥ ज्ञान जालियाउपरी । संचितक्रियमाणापासूनी सुटका, परी । तें ज्ञान बरवें बिंबे तरी, । तदर्थची उपदेश हा अर्जुनातें. ॥ २५६८ ॥ कीं, एका मातें ये शरण, । टाकूनी सर्व धर्माचरण; । मग मी तुझें संचितक्रियमाण[1] । नाशीन, ज्ञान दृढ बिंबवुनी. ॥ २५६९ ॥ तीं सर्व पापें यापरी, । जीं वेदांतसूत्रीं ज्ञानाउपरी । न स्पर्शती आणि नाशती दों प्रकारीं । सूत्र म्हणे. ॥ २५७० ॥ एवं दोहींपासूनी ज्ञानी । सुटे, पुण्यपापरूपां पापांपा-

---

१. मुख्य तत्त्व, मुथाचा सारांश.

सुनी; । प्रस्तुतीं दोनी सुचवुनी । 'सोडवीन' म्हणे भगवंत. ॥ २५७१ ॥ क्रियमाणाचा नव्हे लेप । कर्मी स्मरतां अकर्तात्मस्वरूप; । चित्त चिन्मय होतां जळे पाप, । तें संचित म्हणावें. ॥ २५७२ ॥ दोहींपासूनी ये रीती । सोड-वीन, म्हणतो श्रीपती, । भाव कीं, बाणतां ज्ञानस्थिती । जळेल संचित आणि न स्पर्शेल क्रियमाण. ॥ २५७३ ॥ येविषयीं शोक । नको करूं, म्हणे उत्तमश्लोक, । कीं, ज्ञान बिंबतां, नुरे बंधक । कर्म कांहीं. ॥ २५७४ ॥ परी पार्थ हें वर्म नेणे, । आणि मनीं ऐसें म्हणे, । कीं, 'ज्ञान मज कैंवी बाणे ?' । सचिंत ऐसा. ॥ २५७५ ॥ येविषयीं चिंतातुर । होता अत्यंत पांडु-कुमार, । कीं, 'ज्ञान बोलिला हा सर्वेश्वर, । परी या स्वस्वरूपीं स्थिति कैसी मज बाणे ?' ॥ २५७६ ॥ तरी, स्थिति बाणली याच काळीं । ज्ञान संचित पापातें जाळी, । आणि आत्मता पाहतां प्रकृतीवेगळी । न लिंपे क्रियमाणरूपें पातकें. ॥ २५७७ ॥ मग चिंताच नलगे करणें, । परंतु ते स्थितीतें पावा-वयाकारणें, । उपाय सांगितला नारायणें, । कीं, 'एका मातें शरण ये.' ॥ २५७८ ॥ 'एकत्वें शरण मातें । येतांच, पापापासुनी तूतें । सोडवीन,' ऐसें अभय अर्जुनातें । दिधलें आधीं. ॥ २५७९ ॥ मग म्हणे उत्तमश्लोक, । कीं, 'तूं नको करूं शोक,' । भाव कीं, 'टाकीं जो हा एक । शोक चित्तांत तुज होता. ॥ २५८० ॥ ते ज्ञानाची स्थिती । तुज बाणेल, तेव्हां ये रीती । सुटसी कर्मापासूनी गा ! सुभद्रापती ! । तरी येविषयीं क्षणीं करिसी तूं शोक?' ॥ २५८१ ॥ श्लोकाचा अर्थ ये रीती, । परंतु कोणी प्रकारांतरें बोलती, । कीं, 'शोक टाकीं' म्हणतो श्रीपती । 'धर्मत्यागप्रत्यवायाचा.' ॥ २५८२ ॥ म्हणे, 'तूं सर्व धर्मातें त्यागिसी, । त्या त्यागें पाप पावसी, । तरी त्या निमित्तें मानसीं । नको धरूं शोकातें. ॥ २५८३ ॥ मी सर्वां पापांपासुनी । तूतें सोडवीन म्हणोनी, । क्षणीं तूं हा शोक मनीं । धरिसी ? अर्जुना !' ॥२५८४॥ देव म्हणे ये रीती । म्हणूनी ऐसा अर्थ करिती, । हे वाक्यार्थास कल्पिती गती, । न सांपडतां मुख्यार्थ. ॥ २५८५ ॥ "शरण ये एका मातें । त्यागुनी सर्व धर्मातें, । त्या पापें पावसी बंधातें, । मग मी सोडवीन त्यापासुनी; ॥२५८६॥ म्हणूनी 'धर्मत्यागें करूनी । जें पाप लागेल, त्यापासुनी । मी सुटेना,' ऐसा मनीं । नको करूं शोक." ॥ २५८७ ॥ अर्थ या दों ओवियांत । बोलिला ऐसें बोलतो म्हणावें भगवंत, । तेव्हां धर्मत्यागनिमित्त । जीं पापें, त्यापासूनी सोडवीन म्हणतो, म्हणों ये. ॥ २५८८ ॥ कीं घडे जरी बंधन, । तरी बंधास बोलावें मोचन, । प्रस्तुतीं बोलतो कमलनयन । सोडवीन सर्वां पापांपासुनी.

॥ २५८९ ॥ आतां, 'सर्वा पापांपासुनी । सोडवीन; याचा लेखा किती!' म्हणोनी । म्हणतो, म्हणावें ये रीतीकरूनी; । तथापि त्यागें पाप, हें तों सिद्ध होतसे. ॥ २५९० ॥ तरी पापेंकरूनी बद्ध आधीं व्हावें, । त्या बंधापासूनी मग सुटावें, । सर्वा गुह्यांत गुह्य उत्तम देवें । काय इतकेंची बोलिलें? हो! ॥ २५९१ ॥ शेवटीं शरणागती आपली । हेची काय देवें उपदेशिली? । कीं, शरण येतांच वेहिली । बंध करी आधींच पापाचा. ॥ २५९२ ॥ 'शरणागतीनें बंधन । होईल, मग त्या बंधापासूनी मोचन । करीन,' म्हणतो कमलनयन, । तरी काय अपराध अर्जुनाचा? ॥ २५९३ ॥ या पूर्विल्याच श्लोकेंकरूनी । 'प्रियोऽसि मे' म्हणोनी । 'तूं प्रिय माझा' ऐसें बोलोनी, । कां त्यास बंध होय ऐसी शरणागती बोलतो? ॥ २५९४ ॥ 'बंध जालियाउपरी । सोडवीन,' म्हणतो; परी । आधीं बंधीं पडे ऐसी हरी । कां स्वशरणागती सांगतो? ॥ २५९५ ॥ आणि बंध शरणागतीकरूनी, । कृष्ण सोडविणार त्याच बंधापासुनी, । शरणागती ऐसी काय म्हणोनी । सांगतो भगवंत अर्जुनातें? ॥ २५९६ ॥ करुनियां स्वधर्माचरण । सेवी श्रीहरीचे चरण, । तो काय म्हणवेना शरण? । कां या त्यागें प्रैत्यवाय जोडावा? ॥ २५९७ ॥ आतां भलतसा हाच अर्थ । साधून दाखवात्रा यथार्थ. । म्हणूनी जें बोलावें, तें व्यर्थ, । कीं बद्ध देखिला, तरी सोडवीन म्हणतो. ॥ २५९८ ॥ 'बंधन घडे' ये रीती । भाव दावूनी ऐसा श्रीपती । बोलतो, म्हणूनी गती । लावितांही लागेना. ॥ २५९९ ॥ कीं सर्वा पापांपासुनी । सोडवीन म्हणोनी, । म्हणतो तेव्हां पापें बधकें देखोनी, । मग सोडवीन म्हणतसे. ॥ २६०० ॥ तीं पापें इतरें । देखिलीं म्हणावीं सर्वेश्वरें, । तरी दाटूनियां त्यागें पातक खरें । अर्जुन मानूनी शंकला म्हणावें किमर्थ? ॥ २६०१ ॥ आतां पातक उपजलें, । तें देवें स्पर्शोंची नाहीं दिधलें, । ऐसें म्हणतां प्राप्त जालें । पाप या शरणागतीकरूनी. ॥ २६०२ ॥ तरी, ज्या गोष्टीनें पाप, । ते गोष्टी कृपाळू मायबाप । कां करवूनी, मग सांगे आपला प्रताप? । की, 'मी सोडवीन त्यापासूनी.' ॥२६०३ ॥ करी सर्वधर्माचरण, । त्या कर्मांचें करी समर्पण, । आणि दृढ धरी श्रीकृष्णचरण, । तरी न उपजे पाप आणि उद्धरे तत्काळ. ॥ २६०४ ॥ हें बहुधा भगवंत । या गीतेंतची बोलिला

---

१. स्वधर्मत्यागजन्य पापाचा हिशोब तो कसला? २. तावडतोब, प्रथम. ३. दोष. ४. 'बंध न' असा पाठ आढळतो.

निश्चित, । त्या अवविद्याहूनी गुह्य अत्यंत । पाप उपजे ऐसें सांगतो. ॥ २६०५ ॥ हें तों बोलणें अनुचित, । आणि ऐसें घडेना निश्चित, । कीं, बोलेल अनुचित अच्युत, । एवं अर्थची अनुचित सर्वथा. ॥ २६०६ ॥ अर्थ हाची अबाधित, । कीं, क्रियमाणसंचित । दोहींस वेद आणि वेदांत । पाप म्हणती. ॥ २६०७ ॥ ज्ञान बिंबल्याचउपरी । सुटका दोहींपासूनी दोंपरी, । कीं, योगभ्रष्ट जन्मांतरीं । पुन्हा योग साधूनी पावतो मोक्षातें. ॥ २६०८ ॥ द्विविध कर्मही नुरे, । आणि प्रारब्ध भोगें सरे, । मग तो सर्वथा न फिरे, । जन्मांतर तया कैंचें? ॥ २६०९ ॥ जो योगसिद्ध नर । त्यातें न घडे जन्मांतर; । जों असे द्विविध कर्माचा पसर । जन्मांतरही तोंवरी. ॥ २६१० ॥ एवं योगसिद्धीकरूनी । सुटका कर्मापासुनी, । म्हणूनी चिंता वाहे मनीं । ज्ञानी योग बाणायानिमित्त. ॥ २६११ ॥ चिंता मनीं असते, । तरीच बुद्धि यत्नीं प्रवर्तते; । आणि कार्यसिद्धि तरीच होते, । जरी चिंता असते अंतरीं. ॥२६१२॥ आणि चिंता ज्याची अंतरीं, । तें ज्ञान बिंबे जोंवरी, । शोक असतोच तोंवरी; । कीं, कां अद्यापि बाणेना? ॥ २६१३ ॥ शोक ऐसा मनीं । ज्ञानियांस असतो म्हणुनी । 'तूं शोक करिसी क्षणीं?' । देव म्हणे. ॥२६१४॥ कीं, 'ज्ञान बिंबल्याविना । पापा बधका कर्मापासुनी सुटका होईना; । मी त्यापासुनी सोडवीन, म्हणतों, अर्जुना! । आतां शोक तूं नको करूं,' हाची अर्थ. ॥२६१५ ॥ तें संचितक्रियमाण । न नासे ज्ञान बिंबल्यावीण, । त्याकारणें म्हणतो नारायण, । 'एका मातें शरण ये.' ॥ २६१६ ॥ 'कीं, तूं जालासी ज्ञानी, । परी तें बिंबलें पाहिजे, म्हणोनी । एका मातेंची एकत्वेंकरूनी । शरण ये.' ॥ २६१७ ॥ 'करितां प्रकृतिपुरुषांचा विवेक, । जें गुरुमुखें कळे एक । तें एकची, जग अनेक, । तो एक त्या मातें शरण ये. ॥ २६१८ ॥ तें एकत्व माझें योग ऐश्वररूप, । कीं, जडप्रपंच मी चित्स्वरूप, । जें सगुणरूप अध्यात्मदीप । नवमीं पाहें' ऐसें अर्जुना! बोलिलों. ॥ २६१९ ॥ "मत्स्थानि सर्वभूतानि । न चाहं तेष्ववस्थितः" म्हणोनी, । मागुती "न च मत्स्थानि भूतानि" । म्हणोनी वदलों कीं "पश्य मे योगमैश्वरं." ॥२६२० ॥ 'जो ऐसा एक, । कीं, एकची होऊनीही अनेक, । तो योग ऐश्वररूप मी उत्तमश्लोक, । त्या एका मातें शरण ये. ॥ २६२१ ॥ हे पुनरुक्ति अष्टादशीं, । ऐसेंची बोलिलों द्वादशीं, । शरणागतीच बोलिलों तेथें ऐसी, । अगा! अर्जुना! ॥ २६२२ ॥

---

१. अ० ९, श्लो० ४. २. अ० ९ श्लो० ५.

"अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं" या श्लोकेंकरूनी । "मद्योगमाश्रितः" म्हणोनी, । जें बोलिलों, तेंची परतोनी । बोलतों. ॥ २६२३ ॥ माझ्या योगाचा आश्रित । होई, आणि सर्व कर्मत्याग अत्यंत । करीं, म्हणूनी बोलिलों यानिमित्त, । कीं, ज्ञान दृढ त्या मद्योगाश्रयें होणार. ॥ २६२४ ॥ योग म्हणजे योग ऐश्वर, । स्वयें मीच त्या रूपीं सर्वेश्वर, । आश्रित, त्याचा दृढतर । होई, म्हणजे त्या मातें शरण ये. ॥ २६२५ ॥ जो जयाचा आश्रित, । तोच त्याचा शरणागत, । तोच अर्थ येथें बोलतों', ऐसा अच्युत । भाव दावी ॥ २६२६ ॥ "सर्वगुह्यतमं भूयः शृणु" म्हणोनी । बोलोनी, मग या, श्लोकेंकरूनी । अर्थ पूर्वोक्त बोले, दावुनी । भाव ऐसा, म्हणतां 'पुन्हा आईक. ॥ २६२७ ॥ कीं, मद्योग म्हणजे योग ऐश्वर, । त्यातें शरण ये', म्हणे द्वादशीं सादर; । अष्टादशीं म्हणे सर्वेश्वर, । 'एका मातें शरण ये' म्हणोनी. ॥२६२८॥ तेथें म्हणे, 'टाकीं सर्व कर्म,' । येथें म्हणे, 'टाकीं सर्व धर्म,' । हें शरणागतीचें वर्म, । कीं त्यावेगळीं कांहीं नाचरें. ॥ २६२९ ॥ द्वादशीं 'सर्व कर्में आणि फळ । टाकीं' म्हणे मेघनीळ, । फलशब्दें सुख विषयमूळ, । 'टाकीं' म्हणे तयातेंही. ॥ २६३० ॥ कीं विहित कर्में त्यागी, । आणि धांवे विषयालागीं, । तो आसक्त होऊनी भोगीं । उभयभ्रष्ट होणार. ॥ २६३१ ॥ येथें बोलतां राहिलें, । तें तेथें असे बोलिलें, । हें 'पुन्हा आईक' म्हणतां सुचविलें । म्हणूनी येथें धर्मत्याग मात्र बोलतो. ॥ २६३२ ॥ कीं, पूर्वसंस्कारें स्फुरे कर्म, । तो म्हणे, 'म्यां टाकिले धर्म, । आणि जें एक योग ऐश्वररूप सगुणब्रह्म । शरण मी असें, म्हणे, एका तयातें, ॥ २६३३ ॥ कीं जें दिसतें अनेक, । तें सर्वही आत्मा एक, । दृढ बिंबावया हा विवेक, । त्याच योगा ऐश्वररूपा एका शरण मी. ॥ २६३४ ॥ तदर्थ सर्व कर्म । टाकिले सर्व धर्म, । चिंतितां तो एकची परम, । तें एकत्व मज बिंबेल.' ॥ २६३५ ॥ ऐसा शरण एकातें निश्चित, । ऐसा ऐश्वर योगाचा आश्रित, । कीं, तो योग जाणतां विभूतींसहित । अचळ सर्वात्मयोग जाणतो. ॥ २६३६ ॥ हें दशमीं सिद्ध जालें, । द्वादशीं प्रसंगीं तेंची आलें, । तेंच अष्टादशींही बोलिलें, । ज्ञान बिंबावें म्हणूनी. ॥ २६३७ ॥ परी तो विभूतींसहित । जाणोनी योग, व्हावें त्याचें आश्रित, । कीं, जावें शरण त्या एकास निश्चित । त्यागोनी सर्व धर्मांतें. ॥ २६३८ ॥ विभूतींसहित योग ऐश्वर । जाणतां अद्वैतानुभव दृढतर । बिंबे, म्हणूनी सर्वेश्वर । बोलिला दशमीं विभूति सांगतां. ॥ २६३९ ॥ "एतां विभूतिं योगं

१. अ० १२, श्लो० ११. २. अ० १०, श्लो० ७.

**थं"** या श्लोकेंकरूनी । **"मम यो वेत्ति तत्त्वतः"** म्हणोनी, । **"सो-विकंपेन योगेन युज्यते"** ऐसें बोलोनी । दशमीं केली या गोष्टीची सूचना. ॥ २६४० ॥ कीं, 'ह्या विभूति माझिया, । आणि योग माझा धनं-जया! । जो जाणे, बाणे तया । अद्वैत योग अविकंपेंकरूनी. ॥ २६४१ ॥ सर्वत्र सर्वदा स्फुरे चित्स्वरूप, । आणि वाटे, कीं, नसोनी भासतें जडरूप । होऊनी सर्वरूप आत्मा अरूप, । हें रूप अविकंपयोगाचें. ॥ २६४२ ॥ विभूतींसह तत्त्वता । योग माझा पांडुसुता! । जो जाणतो, तो जाणता, । ऐसिया अविकंपयोगें योजतो.' ॥ २६४३ ॥ विभूतियोग ज्ञानफळ, । दशमीं ऐसें बोले घननीळ; । परंतु साळी गाई ज्याच्या घरीं पुष्कळ, । तो सुग्रास-भोक्ता, ऐशा न्यायें बोलिला. ॥ २६४४ ॥ परी 'त्या साळी कांडूनी, । पाक त्या तंदुलांचा करूनी, । घृतदुग्धयुक्त सुग्रास जेवितो,' म्हणोनी । बोलणेंची असे. ॥ २६४५ ॥ अथवा जो धनवंत, । तो भोग भोगितो अत्यंत, । त्या न्यायें बोलिला भगवंत, । कीं, योग जाणे अविकंपयोगें. ॥ २६४६ ॥ परंतु त्या धनें मेळवी विषय, । भोग भोगी तेव्हां, ऐसा निश्चय; । तैसा जो योग जाणे विश्वमय, । त्याला नदेकनिष्ठत्वें सिद्धि हे. ॥ २६४७ ॥ कीं, वि-भूतींसहित । जाणे योग ऐश्वर अद्भुत. । तेव्हां त्याच योगीं चित्त । अविकं-पयोगें योजतें. ॥ २६४८ ॥ कीं, जेव्हां त्याच्या स्थैर्यानिमित्त । टाकूनी सर्वा धर्मातें अत्यंत, । हें सर्वही भगवद्रूप निश्चित, । म्हणूनी असे शरण एकत्वें. ॥ २६४९ ॥ तेव्हां त्या शरणागतीकरूनी । चित्त तन्निष्ठ होऊं लागे, म्हणोनी । सुटका या कर्मापासुनी, । ध्यातां दैहिककर्मी अकर्त्तात्मत्व पाहतां. ॥ २६५० ॥ ध्यातां अद्वितीयत्व, । अनेकीं देखे एकत्व, । चित्त पावतां चिन्मयत्व, । संचितें जळती सकळही. ॥ २६५१ ॥ चतुर्थाध्यायीं चक्रपाणी । म्हणे, **"ज्ञानाग्निः सर्वकर्माणि । भस्मसात्कुरुतेऽर्जुन"** म्हणोनी, । सं-चिताविषयीं बोलिला. ॥ २६५२ ॥ त्याच मागें श्लोक, । तेथें म्हणे उत्तम-श्लोक, । कीं, ज्ञानाच्या नावेनें पातक । तरसी, म्हणूनी तें क्रियमाण. ॥ २६५३ ॥ प्रारब्धें देह संचरे. । तेव्हां चिदाकाशीं तनुघट फिरे, । त्या अनुभवीं न शिरे । कर्तृत्व कांहीं चित्तांत. ॥ २६५४ ॥ या अनुभवरीतीक-रूनी । सुटे दोहीं कर्मापासुनी. । या भावें 'सोडवीन पापापासुनी' म्हणोनी ।

---

१. अ० १०, श्लो० ११. २. तांदूळ. ३. अ० ४, श्लो० ३७. ४. 'भस्मसात्कुरुते तथा' असा खरा पाट आहे.

बोले भगवंत. ॥२६५५॥ परंतु सर्व कर्मातें । त्यागूनी, नानारूपा एका अनंतातें । जो शरण जाय, त्यातें । बाणे योग अविकंप. ॥ २६५६ ॥ विभूतींसहित योग जाणे, । त्यातें अविकंपयोग बाणे, । म्हणूनी दशमाध्यायीं देव म्हणे, । 'तो अविकंपयोग बाणे ये रीती.' ॥ २६५७ ॥ तेव्हां संचितें जळती, । क्रियमाणेंही न आतळती, । द्विविध पापबंध गळती, । बाणतां योग अविकंप. ॥ २६५८ ॥ या भावेंकरूनी । 'सोडवीन मी पापापासुनी, । शोक करिसी झणीं?' म्हणोनी । बोलिला देव ॥ २६५९॥ कीं, शोकास न उरे ठाव, । जेव्हां बिंबे सर्वात्मभाव, । या भावेंकरूनी देव । 'नको करूं शोक' बोलिला. ॥ २६६० ॥ 'कर्मत्यागनिमित्त । बंध घडेल, त्यापासूनी निश्चित । सोडवीन,' म्हणतो अच्युत । हा अर्थची न घडे. ॥ २६६१ ॥ त्याची त्यागें हे शरणागती । बोलिली श्रीमद्भागवतीं, । सर्वात्मभावें शरण येती, । त्यांस पापची नसे कर्म टाकितां. ॥ २६६२ ॥ एकादश स्कंधीं ये रीती । नवयोगी जनकरायांप्रती । तत्त्व शरणागतीचें बोलती, । त्या प्रसगीं हा श्लोक. ॥ २६६३ ॥

'श्रीमद्भागवतश्लोक—

**देवर्षिभूताप्तनृणां पितृणां न किंकरो नायमृणी च राजन् ॥**
**सर्वात्मना यः शरणं शरण्यं गतो मुकुंदं परिहृत्य कर्तम् ॥**

योगी म्हणती, अगा! जनकराया! । जो टाकूनी सकळक्रिया, । शरण ये मुकुंदा सर्वात्मया । सर्वात्मतेंकरूनी, ॥ २६६४ ॥ तो कोणाचा नव्हे विधिकिंकर, । जरी न पूजी देव, ऋषि, पितर, । तरी ऋणे त्यांच्या तो नर । बद्ध नव्हे. ॥ २६६५ ॥ तत्त्व ऐसेंची द्वादशीं । गीतेत अर्जुनातें उपदेशी, । आणि पुनरुक्तीनें अष्टादशीं । प्रस्तुतीं तत्त्व हेंची शरणागतीचें. ॥ २६६६ ॥ सर्वात्मतेंकरूनी शरण मुकुंदातें, म्हणोनी । भागवतीं बोलिले, ऐसेंची वचनीं । भगवताच्या गीतेत. ॥ २६६७ ॥ 'एका मातें शरण । ये,' म्हणे सद्गुरुचरण; । एकशब्दाचें विवरण । अनेकही जो एक आपण म्हणोनी. ॥ २६६८ ॥ 'सर्वही मी एक, म्हणोनी । ये मातें शरण ये रीतीकरूनी, । मी सर्वा पापापासुनी । सोडवीन,' म्हणे अर्जुना. ॥ २६६९ ॥ सोडवीन म्हणतां हरी, । 'मी मुकुंद' ऐसे परी । सुचवी ऐसीच वैखरी । नवयोगियांची भागवतीं या श्लोकीं. ॥ २६७० ॥ सर्वात्मतेनें शरण । मुकुंदातें, म्हणतां गीतार्थविवरण । आलें, कीं, जगद्वंद्यचरण । म्हणे 'मी सोडवीन पापापासुनी.' ॥ २६७१ ॥ 'त्या मातें ये शरण,' । कीं,

सोडवील तो मुकुंद हें व्याकरण, । आणि 'एका मातें' म्हणे कारण, । कीं, 'सर्व मी एक, त्या मातें शरण ये.' ॥२६७२॥ 'शरण सर्वात्मना' म्हणोनी । भागवतीं याच वचनीं, । कीं, सर्वही एक आत्मा ये रीतीकरूनी । शरण श्रीमुकुंदातें. ॥२६७३॥ टाकूनी सर्वही क्रिया, । शरण मुकुंदा देवराया । जातो, तो जनकराया ! । ऋणी नव्हे देवां, पितरां, कोणाचा. ॥ २६७४ ॥ हें भागवतीं स्कंधीं एकादशीं, । यास मूळ या गीतेंत अष्टादशीं । हा श्लोक जो भगवंत उपदेशी । शेवटीं सर्वा उपदेशांच्या. ॥ २६७५ ॥ हें शेवटीं अष्टादशीं, । ऐसेंच पूर्वी द्वादशीं, । विशद पुनरुक्तीनें प्रकाशी । शरणागति ज्ञानिया भक्तांतें. ॥ २६७६ ॥ एवंच या शरणागतीकरूनी । त्यागी कर्मे अपक्वही ज्ञानी, । तथापि तो प्रत्यवाय पावेल, म्हणोनी । शंकाच हे फटकाळ. ॥ २६७७ ॥ जरी अपक्व ज्ञानी । शरण सर्वात्मभावेंकरूनी । जाय, सर्वा धर्मातें त्यागुनी, । नसे त्याला त्या कर्मत्यागें प्रत्यवाय. ॥ २६७८ ॥ परंतु सर्वात्मभावें शरण । तदर्थ टाकी स्वधर्माचरण, । आणि विषयसुख इच्छी अंतःकरण, । तैसें नसावें. ॥२६७९॥ म्हणूनी द्वादशीं भगवंत । म्हणे, 'होऊनी माझ्या योगाचा आश्रित, । तदर्थ करीं तूं त्याग अत्यंत । सर्वा कर्मांचा फळाचाही. ॥ २६८० ॥ कीं विषयभोगाचें फळ । सुखची म्हणती सकळ,' । हा अर्थ या टीकेमध्यें प्रांजळ । द्वादशींच जाला. ॥ २६८१ ॥ कीं फळशब्दाचा ये रीती । अर्थ जे न करिती, । त्यांच्या टीकेस लागती । बहुत बाध. ॥ २६८२ ॥ कीं ज्ञान देऊनी हरी, । अभ्यास सांगे तदुपरी, । कर्मफलत्याग तरी । पूर्वीच चित्तशुद्धीकारणें. ॥ २६८३ ॥ कर्मांचीं फळें टाकुनी, । ईश्वरीं अर्पी कर्मे करूनी, । तोच चित्तशुद्धी पावोनी, । ज्ञान पावतो. ॥ २६८४ ॥ द्वादशीं अर्जुन ज्ञानी । त्यास अभ्यास आधीं सांगोनी, । 'अभ्यास न घडे, तरी मत्कर्मपर होईं,' म्हणोनी । देव म्हणे. ॥ २६८५ ॥ 'तेंही करूं न शकसी जरी, । तरी सर्वकर्मफलत्याग करीं,' । हें ज्ञान जालिया उपरी । हाची ज्ञानपरिपाकार्थ बोलतो. ॥ २६८६ ॥ कर्मांचा टाकणें फलभोग, । हा या समयाचा नव्हे त्याग, । एवं फलशब्दें विषयसुखभोग, । 'त्यासहित कर्मे टाकीं' हा अर्थ. ॥ २६८७ ॥ एवंच फलशब्दार्थ । विषयसुख हें यथार्थ, । या पुढिल्या श्लोकीं समर्थ । हेंची द्वादशीं बोलिला. ॥ २६८८ ॥ "श्रेयो हि ज्ञानम-

---

१. दोष. २. अ० १२ श्लो० १२.

**भ्यासात्**" या श्लोकेंकरूनी । "**ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते**" म्हणोनी, । "**ध्यानात्कर्मफलत्यागं**" ऐसें म्हणतो, यावरूनी । पूर्वश्लोकोक्त कर्मफलत्याग ऐसा वाढविला. ॥ २६८९ ॥ ज्ञान जालियाउपरी, । ध्यान बिंबलियाहीवरी, । कर्मफलत्याग बोले हरी । या भावें. ॥२६९०॥ कीं कर्माचा आणि फळाचा । फळशब्दें विषयसुखाचा । त्याग घडतो साचा । पक्वयोगियातें. ॥ २६९१ ॥ पूर्वश्लोकीं कर्मफलाचा । अर्थ हाची साचा, । परी अपक्वास ज्ञानपरिपाकार्थ या त्यागाचा । विधि बोलिला, जो या अष्टादशीं या श्लोकीं. ॥ २६९२ ॥ द्वादशीं हा निर्णय, । या टीकेंत जाला निश्चय; । ज्यांस उरेल येथें संशय, । त्यानें तेथें पाहावें. ॥ २६९३ ॥ एवं ज्ञान जालियाउपरी, । स्थिति बाणावया बरी, । सर्वात्मभावें हरी । भजावा, टाकूनी दों गोष्टींतें. ॥ २६९४ ॥ सर्व कर्मे आणि विषयभोग । या दों गोष्टींचा त्याग, । न टाकवे विषयसुखभोग, । प्रत्यवाय त्यास कर्मे टाकितां. ॥२६९५॥ हें या श्लोकीं बोलतां राहिलें, । तरी द्वादशीं असे बोलिलें, । हें त्याची पुनरुक्ति, ऐसें सूचविलें । याचीकारणें भगवंतें या प्रकरणीं. ॥ २६९६ ॥ आत्मज्ञान जालियावरी । जोंपर्यंत अभ्यास न करी, । तोंपर्यंत स्थिति बरी । ज्ञानाची न बाणे. ॥ २६९७ ॥ त्यांत जे ज्ञानानंतर । सोडिती सगुण सर्वेश्वर । आणि ध्याती नुसतें अक्षर, । त्यांस अभ्यासची साधन योगसिद्धीचें. ॥ २६९८ ॥ अभ्यासीं न थारे चित्त, । तरी श्रम मांडिती त्यानिमित्त, । आणि जे भक्त ज्ञानी, तयां अत्यंत । आयास नलगे. ॥ २६९९ ॥ त्यांत उपाय दोनी । ज्ञानपरिपाकार्थ म्हणोनी, । "**अभ्यासेप्यसमर्थोसि**" येथूनी ।"**मत्कर्मपरमो भव**"ऐसें द्वादशीं देव म्हणे.॥२७००॥ कीं करूं न शकसी अभ्यास, । तरी ते सोडीं आयास, । आणि करीं, म्हणे जगन्निवास, । कर्मे माझीं. ॥२७०१॥ जरी अभ्यासीं वाटती श्रम, । तरी होय मत्कर्मपरम, । मदर्थ माझे भागवतधर्म । करितां, योगसिद्धि सत्वर पावसी. ॥२७०२॥ जे ऐसी द्वादशीं उक्ती, । तेची "**मन्मना भव**" हे येथें पुनरुक्ती, । कीं, ज्ञानपरिपाककारणें भक्ती । करीं हे गा! अर्जुना! ॥२७०३॥ हें ज्ञानपरिपाकार्थ,। म्हणूनी येथें न बोले समर्थ, । कीं पुनरुक्ति म्हणतां जाणे पार्थ, । द्वादशीं जो समजला. ॥२७०४॥ कीं "**मत्कर्मपरमो भव**" । हें द्वादशीं माधव । बोलिला भक्तीचें वैभव, । ज्ञान बिंबावयाकारणें. ॥ २७०५॥ आतां भक्त सगुणाचा ज्ञानी, परी । ज्ञानरूपेंची भक्ति करी, । हे कर्मरूप भक्ति चित्तीं न धरी, । तरी कर्मत्यागें

---

१. अ० १२, श्लो० १०. २. अ० ९, श्लो० ३४.

आणि भोगत्यागें सिद्धि तया. ॥२७०६॥ कीं जो अद्वैत ऐश्वर योग, त्याचा आश्रय । म्हणजे सर्वही वासुदेव, ऐसा निश्चय, । जरी जडीं न स्फुरे चित्प्रत्यय, । तरी तदाश्रित होऊनी कर्मे टाकावीं. ॥ २७०७ ॥ याकारणें उत्तमश्लोक । "अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं"[1]हा श्लोक । बोले, कीं आवडोनी ज्ञानची एक, । जरी मत्कर्म करूं तूं न शकसी, ॥ २७०८ ॥ तरी सर्वकर्मत्याग । आणि जो विषयभोग । सुखरूप वाटे, तो फलभाग । टाकीं, धरूनी आश्रय माझ्या योगाचा. ॥२७०९ ॥ "अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं" या श्लोकेंकरूनी । म्हणे मद्योगाचा आश्रित ऐसा होऊनी, । "सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु" म्हणोनी । द्वादशीं म्हणे. ॥ २७१० ॥ तेंची पुनरुक्तिरूपें अष्टादशीं । भगवंत येथें उपदेशी, । कीं येथें राहिलें, तें पाहावें द्वादशीं, । आणि तेथें नसे तें येथें पहावें. ॥ २७११ ॥ याकारणें मागुनीं मागुनीं । द्वादशाष्टादशाची संगती, । बोलणें लागलें, याचा संतीं । उबग सर्वथा न मानावा. ॥ २७१२ ॥ कीं द्वादशीं त्याग सर्व कर्मांचा, । तोची अष्टादशीं सर्व धर्मांचा, । येथें त्याग विषयाच्या सुखाचा । नाहीं, जो द्वादशीं फलशब्दें बोलिला. ॥ २७१३ ॥ तरी द्वादशींची पुनरुक्ती । तेथें पहावी भगवदुक्ती, । तेव्हां जें येथें नाहीं, त्याची प्रसक्ती । जालीच द्वादशीं पाहतां. ॥२७१४॥ ऐसीच शका येथें दुसरी, । तेही द्वादशीं निरसिली बरी, । आतां शंका कैसे परी, । आणि कैसी परिहरिली द्वादशांत? ॥२७१५॥ तरी बिंबावया ज्ञानयोग, । देव बोलतो, हा त्याग । एक सर्वकर्मांचा, आणि सुखभोग । फलशब्दें तयाचाही. ॥ २७१६ ॥ तो येथें नसे, । तरी नसो, द्वादशीं असे, । तरी हे त्याग बाणती कैसे ? । तें ज्ञान न बिंबलें या. ॥ २७१७ ॥ कीं ज्ञान बिंबावयालागीं । जो ह्या दोन्ही गोष्टी त्यागी, । तो अपक्व योगी, । त्यास कैसा बाणे हा त्याग? ॥ २७१८ ॥ कीं कर्ममात्र टाकील भलता, । परी विषयसुखाची इच्छालता । न तुटे, जों न बिंबे तत्त्वता । अद्वैतसुख. ॥ २७१९ ॥ आणि ज्याची पुनरुक्ति हे अष्टादशीं, । तें पाहतां द्वादशीं, । त्याग तेथें उपदेशी । कर्मांचा आणि फळशब्दें सुखाचा. ॥ २७२० ॥ तरी अपक्व ज्ञानियाला । हा त्याग कैसा बाणतो, बोला? । संदेह ऐसा प्राप्त जाला । या त्यागप्रकरणीं. ॥ २७२१ ॥ तरी या संदेहाचा परिहार, । द्वादशीं स्वयें जगदाधार । करिता जाला तदुत्तर । दुसरिया श्लोकीं त्यापुढें. ॥ २७२२ ॥ "सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु" । म्हणूनी बोलिला

१. अ० १२, श्लो० ११.

कल्पतरू, । तों देखता जाला जगद्गुरू । या संदेहाचें स्थळ हें म्हणोनी. ॥ २७२३ ॥ तरी हा करितां त्याग, । बाणेल सर्वात्मयोग, । तेव्हां पूर्वीच जो त्यजिला विषयसुखभोग, । त्याग बिंबेल त्याचा अनायासें. ॥ २७२४ ॥ तोंपर्यंत त्या त्यागाचें । हें बीज पेरिलें, ऐसें तत्त्व याचें, । फल त्या बीजाचें तेंची साचें, । कीं ज्ञान बिबतां बिंबे हा त्याग. ॥ २७२५ ॥ म्हणूनी आधीं जगद्गुरू । म्हणे, "सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु" । हें त्यागबीज पेरूनी कल्पतरू, । द्वादशीं बोलिला हा श्लोक. ॥ २७२६ ॥

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥**

ज्या स्वरूपअभ्यासावरूनी । प्रसंगसंगतीकरूनी, । हा त्याग करीं म्हणे, त्या अभ्यासाहुनी । ज्ञान श्रेय देव म्हणे. ॥ २७२७ ॥ तरी आधीं ज्ञान होय जरी, । अभ्यास मांडावा तदुपरी, । त्या अभ्यासाहुनीही हरी । ज्ञान श्रेय कां म्हणे ? ॥ २७२८ ॥ या विरोधाचा परिहार । ज्ञानशब्दीं दावी सर्वेश्वर, । कीं एक ब्रह्म नानाकार । जाणणें, तें ज्ञान बोलावें. ॥ २७२९ ॥ व्यतिरेकें जडाहुनी । विलक्षण चिदात्मा, म्हणोनी । कळलें आणि तितकेंची समजोनी । अभ्यास मांडी. ॥ २७३० ॥ तरी नाहींच जालें ज्ञान, । कीं जडही ब्रह्म. अद्वैतज्ञान, । बोध ऐसा नव्हे, तों समाधान, । साधकाचें होईना. ॥२७३१॥ त्या अभ्यासाहुनी । ज्ञान सर्वही ब्रह्म ये रीतीकरूनी । श्रेय अत्यंत म्हणोनी । देव म्हणे. ॥ २७३२ ॥ सागरीं तरंगांचा पसर, । तैसें आत्मयांत चराचर । जो देखेल, तोची नर । ज्ञान पावला. ॥ २७३३ ॥ प्रमाण यासी हेची गीता, । कीं चतुर्थाध्यायांत पांडुसुता । खूण ऐसीच सांगे तत्त्वता । ज्ञानाची श्रीजगद्गुरू. ॥ २७३४ ॥ "यज्ज्ञात्वा न पुनर्मोहं" या श्लोकेंकरूनी । "येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मनि" म्हणोनी । देव बोलिला यावरूनी । ज्ञान म्हणजे कळणें सर्वही ब्रह्म. ॥ २७३५ ॥ आणि नुसत्या आत्मस्वरूपीं चित्तास । पुनःपुन्हां योजणें हा अभ्यास, । त्या अभ्यासाहूनीही, जगन्निवास । म्हणे, ज्ञान श्रेय ओळखणें सर्वात्मता. ॥ २७३६ ॥ कीं ज्ञान बिंबायाचें हें प्रकरण, । येथें ज्याणें ते सिद्धि, त्याला श्रेयपण, । तरी विभूतिअध्यायांत कमलेक्षणं । बोलिला, तो श्लोक या प्रसंगींही वर्णिला. ॥ २७३७ ॥ "एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति । सोऽविकंपेन योगेन युज्यते" म्हणे

१. अ० ४, श्लो० ३५. २. अ० १०, श्लो० ७.

**श्रीपती.** । विभूतिसहित योग तो हाच, ये रीती । कीं सर्वही **वासुदेव.** ॥ २७३८ ॥ त्या अद्वैतयोगीं विशेष गुण । जेथें दिसे, तेथें विभूतिपण, । आणि योगाचें काय जें लक्षण, । तें नवमाध्यायांत बोलिलें. ॥ २७३९ ॥ योग ऐश्वर नवमीं अर्जुनाला । "**पश्य मे योगमैश्वरं**" म्हणूनी दाविला, । तोची विश्वरूपीं प्रगट केला, । "**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरं**" म्हणोनी. ॥ २७४० ॥ एवंच विश्व आकार भगवंताचा, । जो सर्वात्मा ये रीती साचा, । तो योग सूचवूनी बोले वाचा । दशमीं "**एतां विभूतिं योगं च**" म्हणोनी. ॥ २७४१ ॥ कीं या विभूतीसहित । हा योग तत्त्वता जाणे निश्चित, । तो अविकंपयोगें म्हणे, भगवंत । योजतो येथें संशय असेना. ॥ २७४२ ॥ या योगाचें ज्ञान, । तें श्रेय अभ्यासाहून, । या गोष्टीचें व्याख्यान । विशद टीकेंत द्वादशीं. ॥ २७४३ ॥ एवं स्वरूपीं चित्त । स्थिर करावयानिमित्त । जो अभ्यास, त्यापरीस अच्युत । ज्ञान श्रेय म्हणतो ये रीती. ॥ २७४४ ॥ तरी विभूतीसहित । योग म्हणजे जाणे सर्वात्मता निश्चित, । तो अविकंपयोगें योजतो म्हणे भगवंत । तो अविकंपयोग बाणे ध्यानेंकरूनी. ॥ २७४५ ॥ तेव्हां सर्वात्मक ज्ञानाहीहुनी, । ध्यान श्रेय म्हणोनी, । "**ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते**" या चरणेंकरूनी । ध्यान सर्वात्मयोगाचें बोलिला. ॥ २७४६ ॥ तदर्थ सर्वकर्मफलत्याग देव । द्वादशीं याहूनी पूर्वश्लोकीं बोले स्वयमेव, । तो त्याग, आतां देवाधिदेव । ध्यान बाणतां, बाणतो म्हणतसे. ॥ २७४७ ॥ "**ध्यानात्कर्मफलत्यागं**" या चरणेंकरूनी । हा त्याग ध्यानानंतर, म्हणोनी । देव म्हणे, यावरूनी । हे सिद्धि द्वादशीं पूर्वश्लोकोक्त त्यागाची. ॥ २७४८ ॥ आणि अर्थही पूर्वश्लोकोक्त त्यागाचा । निवडतो या श्लोकेंची साचा, । कीं अर्थ सर्वकर्मफलत्यागाचा । जो उघड, तो न घडे उभयत्र. ॥ २७४९ ॥ श्रेय अभ्यासाहूनी ज्ञान, । अधिक त्याहूनीही ध्यान, । ज्या ध्यानीं समाधान । अद्वैत अपरोक्ष अनुभवाचें. ॥ २७५० ॥ त्याही ध्यानानंतर । कर्मफलत्याग बोले सर्वेश्वर, । उघड अर्थ भलता नर । जाणे, तो येथें उचित न दिसे. ॥२७५१॥ कर्माच्या फलाचा त्याग । हा उघड अर्थ, परी फलभोग, । ज्ञान नसतां, कर्मयोग । करितां, चित्तशुद्ध्यर्थ टाकिला. ॥ २७५२ ॥ कीं जिज्ञासु ज्ञानाकारणें । जेव्हां करी कर्माचरणें, । तेव्हां घडलें टाकणें । फल कर्माचें आरंभीं. ॥ २७५३ ॥ तें जालिया ज्ञान, । विबलिया अद्वैत

---

१. अ० ९ श्लो० ५. २. अ० ११ श्लो० ८. ३. अ० १०, श्लो० ७. ४. 'ही' हें शुद्धशब्दयोगी अव्यय 'हुनी' या पंचमीचे प्रत्ययापूर्वींच लाविलें आहे. ५. अ० १२ श्लो० १२.

अपरोक्षानुभवध्यान, । येथें कर्म फलत्यागाचें व्याख्यान । न लगतां, टीकाकार गजबजले. ॥ २७५४ ॥ ते या कर्मोच्या फलत्यागाचा विचार । बोलोनी गेले कीं मिथ्याची स्तुतिप्रकार, । उगेंची श्रेष्ठत्व बोलिलें त्यागाचें, ऐसा निर्धार । करूनी गेले. ॥ २७५५ ॥ कोणी अर्थची नाहीं बोलिला, । कोणी भावार्थ मात्र गोफाटिला, । जैसा तैसा श्लोक लाटिला, । परी ते वरे त्याहुनी. ॥ २७५६ ॥ कीं जे गीताशास्त्रीं ये रीती, । तत्रापि या अध्यायांत मिथ्य-स्तुती, । थोर होऊनी वाखाणिती, । नवल मोठें. ॥ २७५७ ॥ ज्या द्वादशाच्या अतीं, । "ये[1] तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते" म्हणे श्रीपती, । त्याही अध्यायांत मिथ्या स्तुती । बोलती होऊनी पंडित. ॥ २७५८ ॥ अर्थ न कळे म्हणावें, । न बोलतां बोलिले, ऐसें गणावें, । न कळतां ऐसेंची वाख्याणावें, । हे स्तुति उगीच त्यागाची म्हणोनी. ॥ २७५९ ॥ म्हणतां कर्माचें फल, । अर्थची बुडतो सकळ, । एवं फलशब्दें बोलावें प्रांजळ । विषयसुख म्हणोनी. ॥ २७६० ॥ कीं विषय मिळाले पुष्कळ. । तथापि सुख न उपजे, तेंव्हां निष्फळ, । सुख होतांच ते सफळ, । जे कांहीं मेळविलें. ॥ २७६१ ॥ म्हणतां सर्व कर्मफलत्याग, । कर्मत्यागची विषयसुखत्याग, । दोनीं श्लोकीं श्रीरंग । सर्वकर्मफलत्याग बोलिला. ॥ २७६२ ॥ पूर्वश्लोकीं म्हणे श्रीगुरू, । कीं सर्व "कर्मफलत्यागं[2] ततः कुरु" । बोले स्वरूपसुखसमाधीचा कल्पतरू, । कीं त्याग करी कर्माचा आणि विषयसुखाचाही. ॥ २७६३ ॥ पूर्वश्लोकीं त्याग करी, । इतकेंची बोले; परी । त्याग बाणे ध्यानाउपरी, । जाणोनी हें, दुसरिया श्लोकीं बोलिला. ॥२७६४॥ पूर्वश्लोकीं करी म्हणोनी, । "सर्वकर्मफलत्यागं" द्वादशीं बोलोनी, । तो ध्यानेंकरूनी बाणे ऐसें सुचवुनी, । "ध्यानात्कर्मफल-त्यागं"[3] ऐसें बोलिला. ॥ २७६५ ॥ एवंच बिबावया अनुभवज्ञान, । करावया सर्वात्मकध्यान, । द्वादशीं बोलिला जगन्निधान । त्याग कर्माचा आणि विषयानंदाचा. ॥ २७६६ ॥ हे द्वादशीं भगवदुक्ती, । येथें "भूयः शृणु" म्हणूनी पुनरुक्ती, । त्यांत एका मातें शरण ये, ऐसी भक्ती । करीं, त्यागूनी सर्वधर्मातें, म्हणतसे. ॥ २७६७ ॥ येथें फलत्यागशब्देंकरूनी । विषयसुखत्याग म्हणोनी, । बोलावा, तो तेथें बोलिला त्यावरूनी । "भूयः शृणु" म्हणतां सुचविला. ॥ २७६८ ॥ एवंच टाकूनी सर्वधर्म, । सोडोनी वेदोक्त स्वकर्म, । शरण जावें, त्याचें हें वर्म, । कीं विषयसुखेच्छा जरी टाकी.

---

१. अ० १२ श्लो० २०. २. अ० १२ श्लो० ११. ३. अ० १२ श्लो० १२.

॥ २७६९ ॥ ते सोडितांही सुटेना, । तोडितांही तुटेना, । तथापि सुख तें नलगे म्हणूनी मना, । त्याग युक्त साधकें करावा. ॥ २७७० ॥ विषयसुख-त्यागी । होउनी, मग सर्वां स्वधर्मास त्यागी, । मग सर्वात्मभावें योगी । ध्यान करितां, बिंबला देखे तो त्याग. ॥ २७७१ ॥ म्हणूनी म्हणतो गदाग्रज । कीं "**सर्वधर्मान्परित्यज्य । मामेकं शरणं व्रज । अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः**"[1] ॥ २७७२ ॥ द्वादशाध्यायोक्त अर्थ पोटीं, । तो "**भूयः शृणु**"[2] म्हणूनी शेवटीं । म्हणे, अद्वया एका मातें किरीटी ! । शरण ये, टाकूनी सर्वधर्मांतें. ॥ २७७३ ॥ बोलतां लागला उशीर, । तों शस्त्रें हाणों लागले वीर, । म्हणूनी द्वादशाध्यायार्थ यदुवीर । पोटीं धरूनी बोले "**भूयः शृणु**" म्हणोनी. ॥ २७७४ ॥ युद्धत्वरेनें गीताकार । बोलिला, तो अर्थ टीकाकार । तिहीं वाखाणावा यथाप्रकार, । कीं तांतडी तयां असेना. ॥ २७७५ ॥ तथापि ग्रंथ वाढला बहुत, । आणि पूर्वापर विचारासहित । बोलणें लागलें, म्हणूनी अत्यंत । केला संक्षेप बहुतां शब्दांचा. ॥ २७७६ ॥ तथापि ग्रंथ वाढला । आणि दों अध्यायांचा प्रसंग लागला, । याकरितां दुर्गमसा दिसों आला, । तरी क्षमा करावी श्रोतयांहीं. ॥ २७७७ ॥ कीं जे भोळे भक्त, आप्त, । ते अर्थभावार्थेंची होती तृप्त, । परी ज्यांच्या हृदयीं संदेह गुप्त, । संदेहयुक्त ते होती. ॥ २७७८ ॥ आणि जो जो बाधित अर्थ, । तो तो मानिला जिहीं यथार्थ, । आणि बोलकेही समर्थ । समाधान व्हावें त्यांचेंही. ॥२७७९॥ आणि नामें **यथार्थदीपिका** । भगवतें मांडिली हे टीका, । अर्थ बाधित तितका फिका, । न वाटतां अबाधितार्थ, केंवी रुचे ? ॥ २७८० ॥ म्हणूनी अर्थ वाटे दुर्गम, । परतु पर्यालोचनें बहुत सुगम, । भाषेमध्यें निगमागम । मूर्तिमंत दिसती. ॥ २७८१ ॥ अतिसुगम गीता, परी । अबाधित अर्थ समजे जरी, । बाधित अर्थ जनवैखरी । बोले, तो नव्हेच गीतार्थ. ॥ २७८२ ॥ करितां ते बाधपरिहार, । टीका दुर्गम वाटते फार, । आणि बोलतां अनुभवचमत्कार, । साधारणास दुर्गम वाटते. ॥ २७८३ ॥ जरी सुगम होय जे जे रीती, । ते ते रीतीनें शब्द चालती । जे अधिकारी सुमती, । सुगमची त्यांला. ॥ २७८४ ॥ जे ज्ञानी भक्त । भगवत्पदीं अनुरक्त, । त्यांचकारणें हें भगवदुक्त । गीताशास्त्र प्रगटले. ॥२७८५॥ हेंची आतां भगवंत । बोलेल, कीं येथपर्यंत । उपदेश जाला, आतां अनंत । अनधिकारी, अभि-

---

१. कृष्ण. २. अ० १८ श्लो० ६४.

**कारी बोलेल या शास्त्राचें. ॥ २७८६ ॥ त्यांत भक्तची अधिकारी, । ऐसें पुढे संसारकंसारी[1] । बोलेल रोकडें, अनधिकारी । निवडूनी बोलतो, या श्लोकें. ॥ २७८७ ॥**

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥**

अगा! ज्याच्या ठायीं नसेल तप, । त्यास हें शास्त्र अध्यात्मदीप । न सांगावें तुवां, म्हणे बाप । विधातयाचा. ॥ २७८८ ॥ **तप**शब्दाचे अर्थभेद । बहुतांपरी बोलती वेद, । त्यांत येथें **मुकुंद** । तप आलोचन बोलतो. ॥ २७८९ ॥ **आलोचन** म्हणिजे विचार, । ज्याच्या बुद्धीस समजे तत्त्वनिर्धार, । श्रवण होतांच मननप्रकार । करूं शके, तो विचारनिष्ठ जाणावा. ॥ २७९० ॥ तत्त्वविचारीं बुद्धी । प्रवर्ते ज्याची, त्यातेंची सिद्धी, । आत्मानुभवसुखसमृद्धी । होऊं शके. ॥ २७९१ ॥ परंतु इहजन्मीं, अथवा जन्मांतरीं । तपश्चर्या स्वधर्माचरणादि करी । संचितरूपें असेल, तोची करी । **गी**ताश्रवण होतांच मननानें. ॥ २७९२ ॥ एवं तपस्वी तोची खरा, । कीं स्वहितविचारशील असे बरा, । अध्यात्मशास्त्र त्याच नरा । अनुभवफळप्रद होणार. ॥ २७९३ ॥ तप आलोचनातें म्हणावें, । ये रीती तप जाणावें, । जो ऐसा नसेल त्याला न सांगावें । हें **गी**ताशास्त्र, देव म्हणे. ॥ २७९४ ॥ **आ**पस्तंबशाखा **य**जुर्वेदीं, । त्यांत **भृ**गुवल्ली उपनिषदीं । **भृ**गूतें **व**रुण प्रतिपदीं । म्हणे, तपेंकरूनी ब्रह्म जाण. ॥ २७९५ ॥ तों **भृ**गु विचार करी, । अन्न ब्रह्म म्हणूनी जाणे; तदुपरी । त्याला मागुती **व**रुणाची वैखरी । म्हणे, तपेंकरूनी ब्रह्म जाण. ॥ २७९६ ॥ तो पुन्हां विचार करी, । प्राण ब्रह्म जाणे; तदुपरी । त्याला पुन्हां गुरूची वैखरी । म्हणे. तपें ब्रह्म जाण. ॥ २७९७ ॥ ऐसाच वारंवार । **भृ**गु करी विचार, । तों पुनः पुन्हां म्हणे तत्प्रकार, । तपें ब्रह्म जाण म्हणोनी. ॥ २७९८ ॥ एवंच **तप**शब्दें विचार, । ज्या विचारें कळे निर्विकार, । जेथें नसे तो प्रकार, । तेथें **अ**र्जुना! हें तुवां न सांगावें. ॥ २७९९ ॥ कल्पवृक्षाचें बीज विमळ, । तेंही ऊखर भूमिवरी पेरितां निष्फळ, । या भावें म्हणे **ज**गन्मंगळ. । जो अतपस्क, त्याला न सांगावें. ॥ २८०० ॥ स्वहितविचार जेथें, । फळलीं सकळही तपें तेथें, । जो स्वहितविचारहीन, तो येथें । अधिकारी नव्हे हा अर्थ. ॥ २८०१ ॥ आतां

[1] विचार.

तपाचेही बहुत प्रकार, । त्यांत सात्त्विक तपें स्वहितनिष्ठाविचार, । त्यास त्याचा सत्त्वसंस्कार । सात्त्विक भक्तीच उपजवी. ॥ २८०२ ॥ त्यांत शुद्ध सत्त्वगुण, । उपाधि ज्याचा श्रीनारायण, । जो अभक्त, जो नव्हे तत्परायण; । मोक्षाधिकारी तो नव्हे. ॥ २८०३ ॥ नसे भगवद्भक्ति ज्याला, । मोक्ष अत्यंत दूर त्याला । हें अध्यात्मशास्त्र तैसियाला । सांगोनी काय? ॥ २८०४ ॥ वृष्टि पाषाणभूमीवरी, । हे गीता अभक्तां यापरी, । या कारणें म्हणे हरी । हें अभक्तांकारणें न सांगावें. ॥ २८०५ ॥ येथें म्हणे कमललोचन । कीं "नाभक्ताय कदाचन" । अभक्तांतें कदापिही नको म्हणे, हें वचन । भाव गंभीर बोलतसे. ॥ २८०६ ॥ कीं आहे सत्त्वसंस्कारी । भगवद्भक्तीस अधिकारी, । आणि संगदोषेंकरूनी करी । भजन राजस तामस. ॥ २८०७ ॥ तोही सत्संगेंकरूनी । सत्त्वोपाधि एकची सर्वेश्वर, म्हणोनी । जगत्कारण श्रीकांत समजोनी, । भगवद्भक्त जरी जाला असे. ॥ २८०८ ॥ त्यास आधीं सांगावें । हें गीताशास्त्र सद्भावें, । आणि जों स्वभक्ती नाहीं, तों न उपदेशावें, । कदापि हें शास्त्र. ॥ २८०९ ॥ एवंच भगवद्भक्ति नाहीं जोंवरी, । कदापि सांगों नये तोंचवरी, । तोच जरी सद्भक्त होय, तरी । कां न सांगावें हें शास्त्र? ॥ २८१० ॥ त्याकारणें म्हणे हें वचन, । कीं "नाभक्ताय कदाचन" । कदापि सांगों नको म्हणे पद्मलोचन, । अभक्तपण जों असे. ॥ २८११ ॥ पूर्वीं होता अभक्त, । तोची जालियावरिही भक्त, । 'कदाचन' शब्द संदेहयुक्त । होऊं नये तेथवां. ॥ २८१२ ॥ कदापिही न सांगावें, । हें अभक्तास बोलिलें देवें; । तरी आतां भगवद्भक्ति धरिली जरी भावें । तरी पूर्वीं अभक्त तो होता. ॥ २८१३ ॥ "कदाचन" म्हणिजे कोणे काळीं । न सांगावें म्हणूनी बोले वनमाळी, । यावरूनी भक्ति करितां, कोणे काळीं । सांगावी गीता तयातें. ॥ २८१४ ॥ देवालयामध्यें कदापी । येऊं नका देऊं पापी, । म्हणूनी आज्ञा, तथापी । तोंच आज्ञा, जों तो शुद्ध होय. ॥ २८१५ ॥ तोच शुद्ध जालियावरी, । देवालयांत येऊं द्यावा, परी । अशुद्ध काळीं शुद्ध होईलची याउपरी, । म्हणूनी कदापि येऊं न द्यावा. ॥ २८१६ ॥ या प्रकारें जो अभक्त, । तोही पुढें होईल भक्त, । म्हणूनी जोंवरी अभक्त, तोंवरी कदापिही नव्हे युक्त, । त्यास सांगणें ही गीता. ॥ २८१७ ॥ या भावें पद्मलोचन । बोलिला ऐसें वचन, । कीं "नाभक्ताय कदाचन" । आतां "न चाशुश्रूषवे वाच्यं" म्हणतसे. ॥ २८१८ ॥ शुश्रूषा

नसे ज्याला, । हें तुवां न सांगावें त्याला, । म्हणूनी देव बोले या बोला । अर्थ याचा दोंपरी. ॥ २८१९ ॥ शुश्रूषा, सेवा म्हणूनी वाखाणिती, । आणि सुश्रूषा, श्रवणाची इच्छाही म्हणती; । परंतु हे दोन्ही अर्थ लागती । अगत्य येथें. ॥ २८२० ॥ कीं श्रवणाचा असे आदर, । तो वक्तयाची सेवा करी सादर, । श्रवणीं ज्याला अनादर, । तो कां सादर सेवील वक्तयातें ? ॥ २८२१ ॥ आणि हें श्रवण करवावें तया, । कीं श्रवणीं आदर असे जया, । त्याचा आदर पहावया । सेवा पहावी तयाची. ॥ २८२२ ॥ आतां सेवाही करी, । आणि इच्छा इतर अंतरीं, । गीताश्रवणीं आदर बरा न धरी, । त्यास ही गीता सांगों नये. ॥ २८२३ ॥ कीं वक्ता प्रारब्धें धनवंत, । अथवा गीतार्थवक्ता विविधगुणवंत, । कार्यांतराकारणें अत्यंत । सेविती तया. ॥२८२४॥ गीतार्थ ज्यास बाणे, । तो थोर हे गीता जाणे, । कोणी सादर सेवितां म्हणे, । गीताश्रवणार्थ सेवितो हा मातें. ॥ २८२५ ॥ म्हणूनी इच्छूनी इतर कारण, । सेवितां, वक्ता आपण । त्यास करवी गीताश्रवण, । तरी गीतार्थ-सार्थकता नव्हे तेथें. ॥ २८२६ ॥ या कारणें श्रवणादर, । आणि सेवेसही सादर, । ऐसा नसेल त्याला दामोदर । अर्जुना म्हणे, हें तुवां न सांगावें. ॥ २८२७ ॥ द्विविधही शुश्रूषा । असेल ज्याला, त्याच पुरुषा । गीता सांगावी, या विशेषा । चकारें देव सुचवी. ॥ २८२८ ॥ "न चाशुश्रूषवे" म्हणोनी, । येथें या चकारेंकरूनी । अर्थ दुसराही सुचवूनी, । देव बोले. ॥ २८२९ ॥ आतां श्रवणादरही धरी, । आणि सेवाही सादर करी. । सर्व विषयीं बरा, परी । माझी असूया करी, तरी त्यासही न सांगावें. ॥ २८३०॥ असूया म्हणजे जो निर्दोष । त्यास लावणें दोष, । तो असूयायुक्त पुरुष, । आणि असूया ते क्रिया तयाची. ॥२८३१ ॥ तरी मज निर्दोषा दोष लावी, । त्यास हे गीता न सांगावी, । ते दोंरूपी दोंपरी वदावी, । ऐसें भगवंत सुचवी. ॥ २८३२ ॥ कीं एक रूप अवतारी ईश्वर, । दुसरें रूप त्याचेची विविध अवतार, । नसे दोषही द्विप्रकार, । दोहीं निर्दोषरूपीं ये रीती. ॥२८३३॥ कीं ईश्वर सर्व कर्ता, । ईश्वर सर्वभर्ता, । वेदीं, शास्त्रीं, लौकिकीं हे वार्ता । प्रसिद्ध सर्वत्र.. ॥ २८३४ ॥ यावरूनी दुःखितां । दुःख ईश्वर देतो ऐसें बोलतां, । सुखितांस तोची सुख देतो, ऐसें म्हणतां, । दोष ईश्वरीं लाविती. ॥ २८३५ ॥ कीं बरें केलें जया, । तो काय आप्त तया ? । आणि दुःख दिधलें ज्या प्राणियां, । ते काय वैरी तयाचे ? ॥ २८३६ ॥ हें वैषम्य

आणि निर्दयत्व । ईश्वरीं लाविती हीनत्व, । त्यांस हें गीतारहस्यतत्त्व । सांगों नये. ॥ २८३७ ॥ तो सुखदुःखदाता केवळ, । परंतु देतो कर्मानुरूप फळ । ऐसें म्हणतां, म्हणती खळ । कीं कर्मे तोची करवितो. ॥ २८३८ ॥ जरी कर्मे तोची करवी, । तरी कां न देई सर्वांस बुद्धि बरवी ? । कळा ऐसी कां हो ! फिरवी ? । कीं जन पावती नरकदुःखें. ॥ २८३९ ॥ आणि जो आपण पापें करवी, । त्यास तोची नरक नाना योनी भोगवी, । तेव्हां विषमत्वनिर्दयत्वपदवी । जो ऐसें करी तयातें. ॥ २८४० ॥ याचा परिहार भगवंत बोलिला पंचमाध्यायांत, । कीं ईश्वर नसे निर्मित । कर्तृत्व आणि कर्मे कोणाचीं. ॥ २८४१ ॥ "[1]न कर्तृत्वं न कर्माणि । लोकस्य सृजति प्रभुः" म्हणे चक्रपाणी, । हें तत्त्व सांगतांही, ज्यांची वाणी । तोची कर्ता म्हणती, ते असूयक. ॥ २८४२ ॥ दुसरी असूया ये रीती, । कीं अवताररूपें श्रीपती । सकामासही कथाप्रीती । लागो म्हणूनी गोपिकांशीं क्रीडला. ॥ २८४३ ॥ त्यास म्हणती, कामातुर । तरी परस्त्रियांशीं सादर । रमला आणि उखळीं बांधला दामोदर, । तो काय मुक्ति देईल भक्तांतें ? ॥ २८४४ ॥ जरासंधापुढें पळाला, । सामर्थ्य कैंचें तयाला ? । इत्यादि दोष निर्दोषाला । लाविती, त्यांस हें न सांगावें. ॥ २८४५ ॥ एवंच सेवा, श्रवणादर । दोनी दाविती सादर, । आणि दोष लाविती मज पामर, । त्यांसही नको सांगों भाव ऐसा. ॥ २८४६ ॥ कोणी भरावया उदर, । कोणी म्हणावया चतुर, । सेवा आणि श्रवणादर । दाखवितील गीता कळावी म्हणोनी. ॥ २८४७ ॥ तथापि ही परीक्षा पहावी, । कीं जो दोष मातें न लावी, । अथवा सांगतां निर्दोषपदवी । माझी धरी चित्तांत, ॥ २८४८ ॥ त्यास हे गीता सांगावी तुवां, । अन्यथा सांगों नये पांडवा ! । म्हणूनी भावार्थ दावी सर्वा सदैवां । देवाधिदेव. ॥ २८४९ ॥ कीं निर्दोष अवतारचरित । श्रोता समजे, तो मुक्त होतो निश्चित, । ऐसें चतुर्थी अच्युत । स्वयें बोलिला. ॥ २८५० ॥ "[2]जन्म कर्म च मे दिव्यं" या श्लोकेंकरूनी, । माझीं जन्मकर्मे दिव्यें अलौलिकें म्हणोनी, । विशद बोलिला, त्यावरूनी । कळलेंच निर्दोषत्व मोक्षाधिकारी श्रोतयांतें. ॥ २८५१ ॥ पंचमीं ईश्वराचें विषमत्व । आणि ईश्वराचें निर्दयत्व । उडे, ऐसें बोलिलें तत्त्व, । तेथें निर्दोषत्व श्रोते समजले. ॥ २८५२ ॥ ऐसें असोनी मागुतीं, । हें असूयकाप्रती । न सांगावें, म्हणे श्रीपती । याची भावें.

---

१. अ० ५ श्लो० १४. २. अ० ४ श्लो० ९.

॥ २८५३ ॥ कीं गीतार्थ ऐके, परी । अभक्ति आपुली अंतरीं, । तो हें निर्दोषत्व न धरी । मनीं आपुल्या. ॥ २८५४ ॥ एवं स्वभक्त अधिकारी । गीताश्रवणीं, ऐसें मुरारी । सुचवी, जो कैवारी । अनन्यभक्तांचा. ॥२८५५॥ यालागीं कमललोचन । म्हणे, "नाभक्ताय कदाचन" । गहन भावें हें वचन । आधींच वदला. ॥ २८५६ ॥ अतएव सांगतां अनधिकारी, । तद्विलक्षण तितकें अधिकारी । सुचवी भगवंत सुखकारी । भक्तजनांचा. ॥२८५७॥ म्हणूनी भक्ताप्रती गीतार्थ । जो सांगेल यथार्थ, । तो अत्यंत प्रिय कृतार्थ, । ऐसें सांगों पाहतो येथूनी. ॥ २८५८ ॥ कैसें गीतार्थाचें निरूपण । करावें, तें भगवंत आपण । बोलतो, आणि कोणाप्रती श्रवण । करवावें हें आधीं बोलतो या श्लोकीं. २८५९ ॥

> य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।
> भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

अगा ! हें गुह्य परम, । मथन करूनी सर्वही निगम, । काढिलें, कीं सर्वही मीच पुरुषोत्तम । गुह्य उत्तमोत्तम हें ऐसें. ॥ २८६० ॥ माझिया भक्तांचमाजी यातें । जो सांगेल, तो सर्वेश्वरातें । मातें पावेल, येविषयीं संशयातें । मानूं नको सर्वथा. ॥ २८६१ ॥ कीं जो असेल माझा भक्त, । तोची हें शास्त्र भक्तियुक्त, । जे माझे चरणीं अनुरक्त, । त्यांतेंची हें सांगेल. ॥ २८६२ ॥ परंतु जे रीतीकरूनी । हें परम गुह्य वाखाणुनी, । मज पावेल म्हणोनी । म्हणतो, ते रीति अर्जुना आईक. ॥ २८६३ ॥ कीं सर्वत्र या गीतेंत । भक्तीतेंची मी भगवंत । श्रेष्ठ करूनी अत्यंत । सर्वांपरीस, बोलिलों. ॥ २८६४ ॥ तैसीच रीति अवलंबुनी, । जे माझ्या ठायीं भक्तीतेंची थोर करूनी, । माझ्या अतिशयोक्तीकरूनी । जो सांगेल. ॥ २८६५ ॥ अवलंबूनी ऐसी रीती, । आणि सांगेल माझ्या भक्तांचप्रती, । भक्ति थोर ऐसी व्याख्या करील सुमती, । तो निःसंशय मातेंची पावेल. ॥ २८६६ ॥ सर्वाहुनी भक्तीचें श्रेष्ठपण, । म्हणूनी करितां निरूपण, । विना भगवद्भक्त कवण । इष्ट मानील त्या निरूपणातें? ॥ २८६७ ॥ निर्गुणोपासनातत्पर । त्यांस सर्वात्मभक्तीनें सर्वेश्वर । सगुणपणें भजावा सादर, । मान्यच नसे हे गोष्टी. ॥ २८६८ ॥ म्हणूनी जे अद्वयज्ञानयुक्त । सर्वात्मभक्ती करिती भक्त, । त्यांवांचूनी इतरांपाशीं अयुक्त । बोलणें परत्व सर्वाहुनी भक्तीचें. ॥ २८६९ ॥ जो निर्गुणोपासनाभिमानी, । तो हे गोष्टी सर्वथा

न मानी, । त्याच्या मतें जो ज्ञानी, । सगुणभक्ति नलगे तया. ॥ २८७० ॥ गीतेंत ज्ञाननिष्ठ भक्त जेथें, । ते विपरीत वाखाणिती तेथें, । किंबहुना या श्लोकीं येथें । झांकिला अबाधित अर्थ हा. ॥ २८७१ ॥ भक्ति सर्वांहूनीही समर्थ, । हा तिहीं मानावा जेव्हां अर्थ, । टीकाच त्यांची होते व्यर्थ, । कीं ज्ञानियास भक्ति नलगे, ऐसें मत तयांचें. ॥ २८७२ ॥ जे आत्मप्रीति तेची भक्ति त्यांची, । आत्मत्वें सगुण सर्वात्मयाची । ऐसी असती टीका तयांची, । तरी हा अर्थ ते मानिते. ॥ २८७३ ॥ कीं भक्ति थोर करूनी, । हे गीता वाखाणावी म्हणोनी, । म्हणे भगवत त्या अर्थातें आच्छादुनी, । बाधित अर्थ बोलती. ॥ २८७४ ॥ "**मद्भक्तेष्वभिधास्यति । भक्तिं मयि परां कृत्वा**" ये रीती । अन्वय दोहीं चरणाचा न बोलती । तिसरा चरण योजिती चतुर्थातें. ॥ २८७५ ॥ "**भक्तिं मयि परां कृत्वा**" हा चरण, । "**मामेवैष्यति**" म्हणूनी योजून, व्याकरण । करिती कीं भक्ति थोर माझे ठायीं करूनी, निपुण । मातेंची पावेल, तो भक्त. ॥ २८७६ ॥ जो हे परम गुह्य **गीता** । सांगेल माझ्या भक्तापासीं तत्त्वतां, । तो मग माझे ठायीं **पांडुसुता** ! । करूनी मोठे भक्तीतें, मातेंची पावेल. ॥ २८७७ ॥ **देव** म्हणतो ये रीती, । म्हणोनी एक निर्गुणाभिमानी वदती, । एक त्याहीपरीस दाविती । चातुर्य येथें. ॥ २८७८ ॥ कीं माझे ठायीं भक्ति आधीं करूनी, । मग हे **गीता** माझ्या भक्तापासीं सांगोनी, । त्याउपरी मातेची पावतो, म्हणोनी । म्हणती म्हणतो **श्रीकृष्ण**. ॥ २८७९ ॥ दोहीं परी **गीतार्थाचे** निरूपण । व्यर्थची होते, करिता ऐसे विवरण. । कीं हें प्रस्तुत प्रकरण । **गीतार्थ**निरूपणाचें. ॥ २८८० ॥ भक्तांपाशीं **गीतार्थ** । न सांगे, आणि **कृष्ण**भक्तीने कृतार्थ, । तो त्यातें पावेल कीं न पावेल, हे यथार्थ । सांगा म्हणतांच, उडतो अर्थ त्यांचा. ॥ २८८१ ॥ **गीतार्थ** सांगीतल्याविना । भक्तीनें भजतां जगज्जीवना, । न पावे म्हणतां, श्रवणनिष्ठां भक्तजनां । भगवत्प्राप्ति नाहीं म्हणावें. ॥ २८८२ ॥ तेव्हा ज्याणें **गीता** आयकावी, । त्याणें भक्त मेळवूनी ते सांगावी, । मग भगवद्भक्ति जेव्हां करावी, । भगवत्प्राप्ति तेव्हां तयातें. ॥ २८८३ ॥ एवच ऐसें बोलतां नव्हेसें जाले । हा बाध देखतांच मन भ्याले, । आतां बोलणे इकडे आलें, । कीं न सांगतांही **गीतार्थ** प्राप्ति भक्तीनें. ॥ २८८४ ॥ भक्तांत **गीतेचा** अर्थ । न सांगतांही, जो भक्तीनें कृतार्थ, । त्यासही भगवत्प्राप्ति हें यथार्थ, । तरी फळ

कोणतें गीतानिरूपणाचें ? ॥ २८८५ ॥ भगवत्प्राप्ति भक्तीकरूनी—। गीता-निरूपणाहीवांचुनी, । प्राप्ति भक्तीनेंची गीता ही सांगोनी, । तरी कय महिमा काय गीता निरूपणाचा ? ॥ २८८६ ॥ एवंच हा नव्हे या श्लोकाचा अर्थ, । मताभिमानेंकरूनी कल्पिला व्यर्थ, । अर्थ हाची एक समर्थ, । कीं भक्ति थोर करूनी सांगणें, हे रीति गीतानिरूपणाची. ॥ २८८७ ॥ अवलंबूनी भगवद्वाक्यातें, । न भितां इतर टीकापांडित्यातें, । श्रेष्ठ सर्वांत भक्ति, ऐसें माझ्या भक्ताते । गीता सांगे, तो मातेंची पावे हा अर्थ. ॥ २८८८ ॥ अर्थ हाची अबाधित, । तो अर्थ सर्वथा बाधित, । आतां आधीं भक्तीकरूनी, मग भक्तांत । गीता सांगतो, मातें पावे, एक म्हणती. ॥ २८८९ ॥ तोही अर्थ न घडे । बरा, विचार उडे, । फळ त्याही अर्थी न सापडे । गीतार्थाच्या निरूपणाचें. ॥ २८९० ॥ जे परा श्रेष्ठा भक्ति, तेची करी, । आणि गीता विष्णुभक्तापासीं न सांगे जरी, । त्यास भगवत्प्राप्ति व्हावी बरी, । ते काय गीता न सांगतां राहेल ? ॥ २८९१ ॥ राहेल म्हणता अनर्थ, । होईल म्हणता त्याची टीका व्यर्थ, । कीं भक्तात सांगणें गीतार्थ, । काय बोलिले फळ त्याचे ? ॥ २८९२ ॥ कीं परा भक्ति ज्याणे केली, । त्याम यावाचूनीही जे प्राप्ति बोलिली, । तेची त्या-तेंची या निरूपणेंही जाली, । विशेष कोण तो निरूपणाचा ? ॥ २८९३ ॥ भगवत्प्राप्ति ज्या भक्तीकरूनीं, । कृतार्थ ते भक्तीने होउनी, । पावणार गीता निरूपणावाचुनी । तेची प्राप्ति गीतानिरूपणें. ॥ २८९४ ॥ येथें निरुत्तर होती, । परि उगेच न राहती, । उत्तर नसोनी, मागुती । म्हणतील ऐसें. ॥ २८९५ ॥ की सांगेल भक्तांत गीता, । तो न भजे भक्तीनें अनंता, । तरी काय पावेल भगवंता ! । की न पावेल म्हणूनी पुसतील ? ॥ २८९६ ॥ या पुसण्यात ऐसी युक्ती, । की जरी प्राप्ति बोलता नये विनाभक्ती, । तरी जे आपली उक्ती, । सिद्ध तेची होणार. ॥ २८९७ ॥ कीं सांगोनीही गीता, । भक्ति करूनी मग, अच्युता । पावावे, तरी आम्ही बोलतो तेंची तत्वतां । का नव्हे सिद्ध. ॥ २८९८ ॥ यास उत्तर ये रीती, । कीं भक्तीविण अनायासें श्रीपती । दुर्लभ, परतु जो सुमती । ये रीती भक्तास गीतार्थ सांगेल, ॥ २८९९ ॥ त्यास गीतानिरूपणीं । जरी भक्ति काही होय उणी, । सर्वा-त्मभावें सगुणीं आणि निर्गुणीं । भक्ति न बैसे, ॥ २९०० ॥ तरी हे शंका कुतर्काश्रित, । बाध लाविला निश्चित, । आणि ऐसें नसतें, तरी भगवंत ।

फल गीतार्थनिरूपणाचें ऐसें न बोलतां. ॥ २९०१ ॥ प्राप्ति तेची गीतार्थ-निरूपणें । जे सर्वात्मभक्तीच्या दृढपणें, । कीं गीतार्थनिरूपणींच अभ्यासाही-विणें । होणार ज्ञानीं परिपाक आणि दृढ निष्ठा भक्तीची. ॥ २९०२ ॥ आत्मज्ञानावीण । मोक्ष बोलेल कवण ? । तथापि जों नव्हे ज्ञानाचें दृढपण, । तों पुनर्जन्म न चुके. ॥ २९०३ ॥ त्या ज्ञानाच्या दृढपणाकारणें । निर्गुणपरा अभ्यास मात्र करणें, । प्रत्यगात्मस्वरूप अंतःकरणें । पहावें अथवा सर्वभूतीं चित्स्वरूप. ॥ २९०४ ॥ न सोडितां तो अभ्यास, । भक्त भजती जगन्नि-वास, । प्राप्त त्याला विनाप्रयास, । आयास अधिकतर अव्यक्तोपासकां. ॥ २९०५ ॥ त्यांत भक्तांस भक्तीचे प्रकार । बोलिले, तदनुरूप भक्तीचे व्यापार । करितां, प्राप्ति प्रेमानुसार । अनायासें. ॥ २९०६ ॥ त्यांत एक आत्मवेत्ता भक्त ते प्रकार । न करी, आणि हे गीताच वारंवार । भगवंत बोलिला तदनुसार । सांगे, थोर करूनी सर्वात्मभक्तीतें. ॥ २९०७ ॥ सांगे भगवद्भक्तांप्रती, । तरी गीतार्थाच्या निरूपणेंची मती । पावे त्याची अनायासें स्थिती । सर्वात्मबोधीं सप्रेम. ॥ २९०८ ॥ जें भगवद्गीतानिरूपण, । तेंच भगवद्भक्तीचें दृढपण; । जरी भगवदुक्तिप्रकारें विवरण । करी सर्वोत्कर्षे भक्तीचें. ॥ २९०९ ॥ जें गीतार्थानिरूपण, । तेंची ज्ञान भक्तीचें दृढपण, या वेगळें सुलरें कारण । प्राप्तीस न दिसे या श्लोकीं. ॥ २९१० ॥ म्हणूनी बोलिला भगवंत, । कीं गीतार्थनिरूपणेंची निश्चित । मातें पावेल, ऐसें अत्यंत । फल गीतानिरूपणाचें बोलिलें. ॥ २९११ ॥ अरे ! वांझ व्यालीची वेदना । नेणे, आणि पुत्राचिया आलिंगना; । निर्गुणवा-दियांस कळेना । गीताव्याख्यान आणि प्राप्तिसुख. ॥ २९१२ ॥ भक्तीहुनी ज्यांची रसना । अधिक बोले निर्गुणोपासना, । त्यांस हा गीतार्थ अनुभव आकळेना, । काय जाळावें तयांचें पांडित्य? ॥ २९१३ ॥ निर्गुणोपासकांपरीस अत्यंत । भक्त मज युक्ततम, म्हणे, भगवंत, । येथें पांडित्यबळें बोलती विप-रीत, प्राप्ति गीतार्थनिरूपणें तयां कैंची? ॥ २९१४ ॥ जे भगवंतें थोर केले । सर्वांपरीस उच्च पदवीस नेले, । त्यांस उणेपणें जे बोलिले, । प्राप्ती कैंची तयां गीतानिरूपणें? ॥ २९१५ ॥ गीतानिरूपणाचें फळ । जरी कळतें निर्मळ, । तरी ते न बोलते ऐसें केवळ । कदापिही. ॥ २९१६ ॥ कीं गी-तार्थ भक्तांप्रती । सांगोनियांही, मागुती । न पावतां भगवत्प्राप्तीची स्थिती, । मग भक्ति करील प्राप्तीकारणें. ॥ २९१७ ॥ दुसरे निपुण त्याहुनी । म्हणती,

भक्ति आधीं करूनी, । मग गीतार्थ भक्तांस सांगोनी, । पावले भगवत्प्राप्तीतें. ॥ २९१८ ॥ तेव्हां पूर्वी जे भक्ति केली, । ते गीता न सांगतां वाया गेली, । अथवा वाट पाहत राहिली, । कीं गीतार्थ सांगतां नेईल भगवत्प्राप्तीतें ! ॥ २९१९ ॥ तेव्हां पूर्वकृत भक्तीही नव्हे समर्थ, । आणि गीतार्थ सांगणेंही जालें व्यर्थ, । कीं तत्पूर्वकृत भक्तीनें कृतार्थ । विशेष न दिसे गीतानिरूपणीं. ॥ २९२० ॥ आणि भगवत तरी ऐसें म्हणतो, । कीं गीता जो म [1]क्षिया भक्तांपासीं सांगतो, । तो त्या गीतानिरूपणें पावतो । मातेंची निःसंशय म्हणोनी. ॥ २९२१ ॥ गीतानिरूपणफळाचें प्रकरण, । प्राप्तीकारणें वदावें गीतानिरूपण, । तें उडतें कारणपण, । कारण भक्ति दोंहीपरी बोलतां. ॥ २९२२ ॥ तेव्हां जें बोलतो भगवंत, । त्यास यास विरुद्ध अत्यंत । वाक्यार्थ ऐसा मंत । मानिती कैसा ? ॥ २९२३ ॥ एवं अर्थ जो अबाधित, । तो हाची, कीं या श्लोकीं भगवत । गीतानिरूपणफळची अत्यंत । स्वप्राप्तीकारणें बोलतो. ॥ २९२४ ॥ तेव्हां जो तृतीय चरण, । '**भक्तिं मयि परां कृत्वा**' म्हणूनी म्हणतो नारायण, । या चरणाचें हेंच व्याख्यान, । कीं भक्ति माझी श्रेष्ठ करूनी । हे गीता जो सांगे, ॥ २९२५ ॥ तो मातेंची पावे निःसंशय, । जो माझ्या भक्तापासीं, ऐसा निर्णय । करूनी सांगे भक्तिमय । हें शास्त्र माझें. ॥ २९२६ ॥ आतां भावार्थ ये रीती, । कीं ज्याची अविद्यावृत मती, । त्यास या गीतार्थाची गती । काय कळे ! ॥ २९२७ ॥ आणि ज्याची गेली अविद्या, । प्राप्त जाली अनुभवब्रह्मविद्या, । तो पावलाच त्या आद्या । गीतार्थनिरूपणावांचूनीही. ॥ २९२८ ॥ आणि गीतार्थनिरूपणें देव । स्वप्राप्ति बोलतो स्वयमेव, । ज्ञानियांस तों देवाधिदेव । प्राप्तच असे. ॥ २९२९ ॥ नाहीं पावला अज्ञानी, । त्यास प्राप्ति बोलावी गीतानिरूपणेंकरूनी, । तरी तो अनधिकारी, ज्ञानावांचुनी । काय गीतार्थ सांगेल ? ॥ २९३० ॥ या विरोधाचा परिहार । तोची देवाधिदेव बोलणार, । प्राप्तीस उरी आणि सांगावया अधिकार, । ज्ञान भक्ति या दोहींकरूनी. ॥ २९३१ ॥ ऐसा काढावा अधिकारी, । म्हणूनी या श्लोकीं हरी । गीतानिरूपण आणि आपली प्राप्ति बोलतां बरी, । भाव ऐसा सुचवितो. ॥ २९३२ ॥ कीं आत्मज्ञानेंची प्राप्ति, परी । तें ज्ञान दृढ बिंबल्याउपरी; । तथापि आत्मसत्ता कळावी बरी । गुरुमुखें, मग बिंबणें प्रयत्नें शि-

---

१. अज्ञानानें वेष्टित झालेली.

व्याख्या. ॥ २९३३ ॥ तथापि तितकेंची कळणें पुरे, । म्हणुनी म्हणतां संसार न सरे, । कीं जों चित्त चित्स्वरूपीं न मुरे, । तोंवरी न चुके पुनर्जन्म. ॥ २९३४ ॥ जडावेगळें चित्स्वरूप । कळलें आणि जड नानारूप । त्यांत तरंगामध्यें अरूप । कळला जरी चित्समुद्रही. ॥ २९३५ ॥ आणि चित्त नव्हे चिन्मय । तें तों कळलें जरी अद्वय, । त्याला पुनर्जन्म, हा निर्णय । मागें जाला बहुतां स्थळीं. ॥ २९३६ ॥ एवं आधीं गुरूच्या मुखें कळावें, । मग तें प्रयत्नें बिंबावें, । तोच प्रातीस पावला ऐसें म्हणावें, । अन्यथा शब्दची तोंवरी. ॥ २९३७ ॥ तो प्रयत्नही दोंपरी, । त्यांत एक आत्मा कळलियावरी, । आतां सगुणभक्ती कां याउपरी? । म्हणुनी, टाकिती सगुणभक्तीतें. ॥ २९३८ ॥ आणि निर्गुणची उपासिती, । अभ्यासें चित्त चिन्मय करिती, । ते निर्गुणप्रार्थानेंची पावती, । परतु क्लेश अधिकतर तयांतें. ॥ २९३९ ॥ जे ज्ञान जालियावरी, । कांस सगुणाचीच धरिती बरी, । त्यांस तारितो सत्वर हरी । भवसागरीं अनायासें. ॥ २९४० ॥ हें द्वादशीं स्पष्ट बोलणें जालें, । प्रसंगें संक्षेपें येथें आलें, । कीं भक्तीनें ज्ञान बिंबलें । स्वल्पायासें भक्तांचे. ॥ २९४१ ॥ परंतु जों गुरुमुखें परात्पर । कळे, तोंवरी सगुण सर्वेश्वर । दोहीं पक्षांस होतां प्रियकर, । तरी गुरुरूपें भेटेल. ॥ २९४२ ॥ कीं सगुणप्रसादावीण । ज्ञान पावला कवण? । वेदीं वेदांतीं श्रवण । सर्वांस ऐसें. ॥ २९४३ ॥ परतु ते सगुणाची प्रीती, । नव्हतां अद्वैत सर्वात्मरीती, । साकार सगुण श्रीपती । भजती श्रवणकीर्तनें जिज्ञासु. ॥ २९४४ ॥ ज्ञान जालियावरी । सगुण सोडिला जिहीं हरी, । त्यांचा आदर निर्गुणावरी । बैसला अत्यंत. ॥ २९४५ ॥ निखळ चित्स्वरूप निर्गुण, । मायाभास विश्व त्रिगुण, । त्या भासास निर्गुणीं एकपण । पाहती, रज्जूस सर्पास जे रीती. ॥ २९४६ ॥ त्या स्वरूपींच अभ्यास । मागुतीं योजिती चित्तास, । न धारतां, पावती आयास । सगुणभक्तीतें टाकितां. ॥ २९४७ ॥ जे न सोडिती सुगुणास, । अद्वैतबोध कळतांच त्यांस । जग अवघें जगन्निवास, । मग सर्वात्मभक्ति ऐसी ते करिती. ॥ २९४८ ॥ ते भक्ति करितां आत्मत्वें, त्यांचें । ज्ञान अद्वैतत्वें बिंबतें साचें, । तेंच पावणें भगवंताचे । आणि प्रयास अति अल्प. ॥ २९४९ ॥ तैसा जो भक्त । जाला ज्ञानयुक्त, । जो पूर्वीं होतां अनुरक्त, । न जाणतां अद्वैत, एकाच सगुणरूपीं. ॥ २९५० ॥ त्यास जालें ज्ञान, । आतां सर्वही वासुदेव ऐसें ध्यान । करोनी, पावावें समाधान ।

त्याचें भगवत्प्राप्तीकरूनी. ॥ २९५१ ॥ हा प्राप्तीचा उपाय परी, । जों सर्वात्मभक्तीची असे उरी, । जे सर्वात्मभक्ति केलियावरी, । त्या ज्ञानियाचें ज्ञान अपरोक्ष बिंबणार. ॥ २९५२ ॥ कीं तत्व समजला, परी । ज्ञान भक्ति दोन्ही बिंबावीं तदुपरी, । ऐसिया समयांत जरी करी । भक्तापाशीं निरूपण गीतेचें. ॥ २९५३ ॥ तरी त्या गीतानिरूपणमात्रेंकरूनी, । ज्ञान सर्वात्मभक्तियोगें बिंबेल म्हणोनी, । भाव ऐसा अंतरीं धरूनी, । हें फळ बोले गीतानिरूपणाचें. ॥ २९५४ ॥ कीं आत्मज्ञान जालें, तें बिंबलें नसे, । आणि सगुणमूर्तिमात्रीं भक्ति दिसे, । तो गीतानिरूपणें पावतसे । दृढ सर्वात्मभक्तीतें. ॥ २९५५ ॥ सर्वात्मभक्तीचें दृढपण, । तेंच ज्ञानपरिपाकाचें लक्षण, । याचेंची नांव कमलेक्षण । निजप्राप्ति बोलतसे. ॥ २९५६ ॥ याही वेगळे जे परिपक्क ये रीती, । ते प्रीतिपात्र भगवंताचे असती, । परंतु जो वक्ता गीतेचा प्रस्तुतीं, । त्याचें आधीं अपक्कज्ञान, भक्तीही अपक्क. ॥ २९५७ ॥ ज्ञान अद्वैत तरी जालें, । परंतु नाहीं बिंबलें, । आणि सगुण नाहीं बाणलें । सर्वात्मभक्तीकरूनी, ॥ २९५८ ॥ तथापि गीतार्थ सांगावया । अधिकार जाला जया । प्राप्ति त्यास अगा ! धनंजया ! । गीता सांगतां, भाव ऐसा. ॥ २९५९ ॥ कीं प्राप्तीस उरी । नसती त्याला जरी, । मातें पावतो ऐसें म्हणेल हरी । हें घडेना. ॥ २९६० ॥ आणि ज्ञान अद्वैत । भक्तियुक्त नसे, तोंपर्यंत । गीतार्थ यथोक्त सांगेल नुसता पडित, । हें कदापि घडेना. ॥ २९६१ ॥ याल्लागीं गीतार्थ सांगेल, तो । मातेंची पावेल देव जेथें म्हणतो, । तेथें आधीं सुचवितो, । कीं तो ज्ञानी आणि भक्त. ॥ २९६२ ॥ नदीच्या पैल तीरा । पावतो म्हणतां, त्या नरा । पोहतां येतें, ऐसा बरा । दाविलाच भाव. ॥ २९६३ ॥ जो वक्ता गीतार्थाचा, । तो अद्वैतवेत्ताच साचा, । जो पांडित्यमात्रें बोलेल, त्याचा । हा बडिवार भगवंत बोलेना. ॥ २९६४ ॥ आतां अद्वैतवेत्ता जरी, । त्यास प्राप्तीस गोष्टी नलगे दुसरी, । आणि भगवंत तरी । म्हणतो तो मातें पावतो. ॥ २९६५ ॥ गीता सांगतां उरी । प्राप्तीस देखिली, तरी म्हणतो हरी । कीं गीता सांगे, तो मातें पावतो. ॥ २९६६ ॥ एवं अद्वैतवेत्ता तरी म्हणावा, । आणि भगवत्प्राप्ति नाहीं ऐसा अपक्कही गणावा, । तो या श्लोकीं बोलिला जाणावा । या प्राप्तीयोग्य वक्ता गीतेचा. ॥ २९६७ ॥ परंतु नव्हे आणि नुसतें अद्वैत जाणे, । भक्तीचें रहस्य नेणे, । त्या ज्ञानियास न म्हणे, । प्राप्ति हे गीतानिरूपणें-

करूनी. ॥ २९६८ ॥ कीं "**मद्भक्तेष्वभिधास्यति**" । म्हणूनी म्हणे **श्री**-पती, । जो हें रहस्य भक्तांप्रती । सांगे, तो मातेंची पावे, म्हणतसे. ॥२९६९॥ ज्यास भक्तीचा अभिलाष । भक्तांपासीं तोची पुरुष । सांगेल **गीतार्थपीयूष**,[1] एवं ज्ञानी आणि भक्त तो. ॥ २९७० ॥ परंतु नव्हे एक ज्ञानी, । नव्हे एक भक्त, म्हणोनी । **गीतार्थनिरूपणेंचीकरूनी** । मातें पावतो देव म्हणे. ॥ २९७१ ॥ जो स्पर्शोनी **गीतार्थ**, । तो **गीतार्थ** सांगतांच होतो कृतार्थ, । भगवत्प्राप्ति परमपुरुषार्थ । **गीतार्थ** सांगतांच वक्ता तो पावे. ॥ २९७२ ॥ सप्तमीं भक्त जो ज्ञानी, । तो थोर सर्वांहूनी । जो '**वासुदेवः सर्वमिति**' म्हणोनी, । तें वर्णिता वक्ताच **वासुदेव**. ॥ २९७३ ॥ ज्या चित्समुद्रें सर्वा जगास । प्रकाश, चराचर तरंगांस । तो आत्माच आपण जगन्निवास । **वासुदेव**, कीं वास सर्वांभूतीं आपला. ॥ २९७४ ॥ नवमीं आत्मरज्जूवरी । देखे विश्वसर्प जेव्हां, अर्जुनास हरी । '**मत्स्थानि सर्वभूतानि**' ऐसा उप-देश करी, ।आणि म्हणे '**न चाहं तेष्ववस्थितः**'[2]॥२९७५॥कीं मजमाजीं भूतें सकळ, । परी मी नसें त्या भूतीं केवळ, । रज्जूमध्यें जैसा व्याळ, । परी जो नाहींच, त्या व्याळीं रज्जू कैंचा ? ॥२९७६॥ या स्थळीं होतां निरूपण, । सर्वांभूतीं प्रकाशक आपण, । भूतांचें देखे मिथ्यापण, । तीं नाहींत, मीच तीं, ऐसें वक्ता अनुभवी. ॥ २९७७ ॥ तों "**नच मत्स्थानि भूतानि । पश्य मे योगमैश्वरं**"[3] म्हणोनी । निरूपण चालतां या वचनीं । वक्ताच होय तो योग ऐश्वर. ॥ २९७८ ॥ कीं नसोनी विश्व दिसे, । हे अघटित घटना **ईश्वराची** असे, । आपणास आपण कल्पूनी, भासे । स्वयें सगुण **सर्वेश्वर**. ॥ २९७९ ॥ त्या **ईश्वराचा** अनुभव । आपण जगदात्मा **माधव**, । तेंची आत्मत्व अभिनव, । जाणे गुरुमुखें वक्ता **गीतेचा**. ॥ २९८० ॥ परंतु नाहीं बिंबलें, ।तें **गीता**निरूपणीं ठसावलें, । 'पुनःपुन्हा निरूपितां बाणलें। सगुणपणींही अद्वैत. ॥ २९८१ ॥ कीं आत्मा चित्सागर, । तरंग त्याचे चराचर । नसोन दिसती हा योग ऐश्वर, । वक्ताच होतो सांगतां स्पर्शोनी अर्थातें. ॥ २९८२ ॥ एवंच जो स्वहिततत्पर, । तो ऐसाच अनुभवें सादर । **गीतार्थ** सांगतां निरंतर, । तोची अनुभव ठसावे प्रसादें **सर्वेश्वराच्या**.॥२९८३॥ पदोपदीं जे ऐसे अनुभव, । तें स्पर्शोनी सांगतां वैभव, । ज्ञान सर्वोत्तमभक्तीं बिंबेल, याचें अभिनव । न वाटे रसज्ञां निर्मत्सरां. ॥ २९८४ ॥ हें विश्व

---

१. अ० ७, श्लो० १९. २. अ० ३, श्लो० ४. ३. अ० ९, श्लो० ५.

**सर्वेश्वर**, । हें विश्व योग ऐश्वर, । ऐसें ठसावे, तोची पावला नर । षड्गुणा **सर्वेश्वरातें**. ॥ २९८५ ॥ "**श्रीभगवानुवाच**" म्हणोनी । **गीता**उपदेश होतो ज्या नांवेंकरूनी, । तो षड्गुणत्वें जगची, म्हणोनी । वक्ता या भावें निजप्राप्ति या श्लोकीं बोलतो. ॥ २९८६ ॥ या श्लोकीं '**मामेवैष्यत्यसंशयः**' या रीती । मातेंची पावतो, म्हणे जगदाकृती, । कीं षड्गुण माझे दिसती । विश्वरूपीं. ॥ २९८७ ॥ तें षड्गुणत्व मायाभुजंग, । आत्मा रज्जु त्या सबाह्य अंतरंग, । ऐसें अनुभवितो, तो भक्त मीच श्रीरंग, । **गीता**निरूपणें ये रीती मातें पावतो. ॥ २९८८ ॥ तो सर्वात्मभक्तीतें पावला, । तो आत्माच माझा जाला, । जैसा ज्ञानी भक्त सप्तमीं बोलिला, । "**ज्ञानी त्वात्मैव मे मतं**" म्हणोनी. ॥ २९८९ ॥ अगा ! सर्वांस सर्वांहुनी । प्रिय आत्माच आपला विशेषेंकरूनी, । मज तो अखंड स्फुरतो, त्यावांचुनी । दुसरें दिसेना. ॥ २९९० ॥ तैसाच **गीता**र्थाचा वक्ता, । कीं मजवेगळें कांहींच न दिसे त्या भक्ता, । मग तो जीवन्मुक्त मज नित्यमुक्ता । कीं आवडतो म्हणुनी मी किती सांगों ? ॥ २९९१ ॥ त्या **गीता**र्थवक्तयाची आवडी । सांगतां न पुरती युगांच्या कोडी, । तथापि त्याच्या प्रीतीची कांहीं एक थोडी । गोष्टी सांगतों, या भावें वदे या श्लोकें. ॥ २९९२ ॥

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥**

प्रगट करूनी भक्तीची थोरी, । न करितां यथोक्त अर्थाची चोरी, । जो हे **गीता** भक्तांपासीं सांगे बरी । त्याहूनी माझें प्रिय करणार कोणी असेना. ॥ २९९३ ॥ प्रिय अनेकांमध्यें प्रिय उत्तम, । तेंची प्रिय करील माझें, तो प्रियकृत्तम, । तैसा प्रियकृत्तम मी पुरुषोत्तम । त्या **गीता**र्थवक्तयातेंची मानितों. ॥ २९९४ ॥ त्याहूनी कोणीही एक नर । नसे अर्जुना ! माझा प्रियतर, । कीं जें मज अति प्रियतर, । तैसें **गीता**व्याख्यान जो करी. ॥ २९९५ ॥ म्हणसी आतां प्रस्तुत, । या **गीता**र्थवक्तयासारिखा प्रिय करणार अत्यंत । नसेल, परी पुढें कोणी होईल अद्भुत, । कीं ऐसा **गीता**वक्तयापरीस तो आवडे. ॥ २९९६ ॥ तरी भूतभविष्याचा जाणता, । सर्वज्ञ मी बोलतों, **पांडुसुता** ! । कीं भक्तिश्रेष्ठपणें जो **गीता**र्थवक्ता, । प्रियकर पुढेंही कोणी न होणार त्यापरीस. ॥ २९९७ ॥ अगा ! स्वहिततत्पर । जे या भूमीवरी असती नर, ।

---

१. अ० ७, श्लो० १८.

तेची मनुष्य, इतर वानर, खर; । त्यांची नसे या प्रसंगीं वार्ताही. ॥२९९८॥ परंतु त्या तैसियां मनुष्यांतही । आतां, पुढेंही, कोणी ऐसा होणार नाहीं, । कीं ऐशा गीतार्थवक्त्यासारिखें कांहीं । प्रिय माझें तो करी. ॥ २९९९ ॥ जो ऐसें माझें प्रिय उत्तम । करी, गीतार्थवक्ता प्रियकृत्तम, । मजही प्रिय दुसरा त्यासम । न दिसे, तेव्हां त्याहूनी अधिक प्रिय कैंचा? ॥ ३००० ॥ या भूमीवरी नर, । जे मनुष्य म्हणजे स्वहिततत्पर, । त्यांत त्यासारिखा कोणी नाहीं प्रियतर, । जो यथार्थ गीतार्थ वाखाणी. ॥ ३००१ ॥ प्रस्तुत आतां तैसा नाहीं प्रिय, । हें असो, पुढील बोलतों निश्चय, । कीं पुढेंही तैसा कोणी नव्हे हा निर्णय, । जैसा यथार्थ गीतार्थवक्ता प्रिय मला. ॥ ३००२ ॥ ज्या समयीं जो कोण ऐसा गीता । वाखाणी, तोच वर्तमानकाळ तत्त्वता, । भविष्य पुढील कळेल ऐसें पांडुसुता । सुचवी देव. ॥ ३००३ ॥ कीं उपदेशकाळींच वक्ता दुसरा । न दिसे तया सर्वेश्वरा, । एवं याउपरांतिक वदेल त्या नरा । या प्रीतीनें वर्णितो. ॥ ३००४ ॥ आणि जो हे भगवद्वाणी । यथार्थरूपें वाखाणी, । तो तोच, ज्या एकास चक्रपाणी । वर्णितो. ॥ ३००५ ॥ जो माझ्या पोटास येईल, । तो पुत्र मज प्रिय होईल, । ऐसें म्हणतां कवण पुत्र राहील? । जरी बहुत पुत्र जाले. ॥ ३००६ ॥ एवंच गीता यथाप्रकार । वाखाणितील टीकाकार, । आणि तेची जे सांगती यथाविचार, । ते सकळ एकएका वचनांत सुचविले. ॥ ३००७ ॥ आतां मनुष्यांमध्यें भूमीवरी । कोणी ऐसें माझें प्रिय करी, । ऐसा नसे, न होणारही, म्हणे[१] हरी । गहन भावें. ॥ ३००८ ॥ कीं मनुष्यदेहीं येच भूमीवरी । तपकरूनी पदवी बरवी करी, । तो देवत्व पावला, दुसरी । भूमि नसे फलप्रद. ॥ ३००९ ॥ सामग्री येथूनी न्यावी, । तेची देवदेहीं वेंचावी, । या भूमीवेगळी नवी पदवी । कर्मफल नसे अन्यत्र. ॥३०१०॥ 'मनुष्येषु' आणि 'भुवि' । या दों पदीं ऐसें सुचवी, । कीं येथेंची याच देहीं साध्य पदवी; । तेथें हे पदवी एकाच गीतार्थवक्त्यातें. ॥३०११॥ श्रेष्ठत्व भक्तीच यथार्थ । प्रगट करूनी, गीतार्थ । भक्तांस सांगे, त्याचा पुरुषार्थ । जो यां दों श्लोकीं बोलिला. ॥ ३०१२ ॥ तो अन्य लोकीं नसे, । देवादि जन्मींही न गवसे, । की तो वैकुंठीं भगवद्रूप वसे, । पाय मस्तकीं ठेवूनी देवांच्या. ॥ ३०१३ ॥ पुनर्जन्म नाहीं, म्हणोनी । न पावे देवादियोनी, । इत्यादि गूढ भावेंकरूनी । 'मनुष्येषु' आणि 'भुवि' म्हणे भगवंत.

१. 'म्हणतो' असा पाठ आढळतो.

॥ २०१४ ॥ आतां अर्थ न कळे जया, । पाठमात्रेंची तया । फळ मोठें होतें, धनंजया । म्हणूनी म्हणतो या श्लोकीं. ॥ २०१५ ॥

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।

ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

अगा! हा माझा तुझा संवाद, । जो धर्म्य, ज्यांत सगुणभक्तीचा अद्वयानंद, । सधर्म जो मी सगुण गोविंद, । तोच अद्वय सर्वही म्हणूनी. ॥ २०१६ ॥ तें राजविद्या राजगुह्यप्रकरण, । जेथें केवळ अद्वैत बोधाचें विवरण, । तेंही धर्म्य म्हणूनी नवमीं मी नारायण । बोलता जालों. ॥ २०१७ ॥ सागरतरंग धर्मासहित, । हेमअलंकार धर्मान्वित, । किरणजळाभास धर्मयुत, । जगदाकार, धर्मयुक्त चैतन्य तैसें. ॥ २०१८ ॥ ज्ञान ऐसें अनुभवावें । तें धर्म्य म्हणूनी बोलावें, । नसोनी जड जग, देखावें । तें अतर्क्य युक्तिचातुर्य ईश्वराचें. ॥ २०१९ ॥ युक्ति ईश्वराची ये रीती, । म्हणूनी हे चराचर आकृती । योग ऐश्वर, म्हणे मी श्रीपती, । तें धर्म्यज्ञान आधींच बोलिलों. ॥ २०२० ॥ कीं विवर्तासहित अधिष्ठान, । त्या ऐश्वर योगाचें ज्ञान, । जगदाकारें मी जगन्निधान । चित्स्वरूप सगुण योगची बोलिलों. ॥ २०२१ ॥ तैसेंची विश्वरूपसंदर्शनीं । "दिव्यं ददामि ते चक्षुः"[1] या अर्थेकरूनी । "पश्य मे योगमैश्वरं" म्हणोनी, । सगुण ऐश्वर योगची तुज दाविला. ॥ २०२२ ॥ जो ज्ञानदृष्टी योग ऐश्वर । नवमीं दाविता जालों मी ईश्वर, । तोची एकादशीं दाविला हा पसर, । दिव्यचक्षुही देउनी. ॥ २०२३ ॥ कीं ज्ञानदृष्टीकरूनी । विश्व अवघें योग ऐश्वर म्हणोनी । ओळखिलें, परंतु नयनीं । कोण आकार! कोठें! कैसा! ऐसें न देखिलें. ॥ २०२४ ॥ तें पहावयाची इच्छा मनीं । जतु उपजली, म्हणोनी । दिव्यदृष्टि तूतें देउनी, । यथाप्रकारें दाविलें विश्वरूप. ॥ २०२५ ॥ अगा! तें काय निर्गुण निर्धर्म! । तेंची विश्वरूप सगुण सधर्म, । जें सधर्म, जें सगुण, तेंची धर्म्य, । कीं मायाधर्मावेगळें न दिसे तें रूप. ॥ २०२६ ॥ तें धर्म्य विश्वरूप ईश्वराचें, । म्हणुनी योग ऐश्वर नांव त्याचें, । याळागीं दिव्यचक्षु देतां बोलिलों साचें, । कीं "पश्य मे योगमैश्वरम्." ॥ २०२७ ॥ तें विश्व नुसतें जडरूप, । दाविलें म्हणोनी ईश्वररूप, । तरी नवमीं जड विश्व चित्स्वरूप । दाविलें योग ऐश्वर. ॥ २०२८ ॥ "न च[2] मत्स्थानि भूतानि। पश्य मे योगमैश्वरं" म्हणोनी, । विश्व असोनी नाहीं

१. अ० ११ श्लो० ८. २. अ० ९ श्लो० ५.

ये रीतीकरूनी, । 'योग ऐश्वर'नांवेंची दाविलें. ॥३०२९॥ चित्सिंधु जेव्हां दिसे, । तेव्हां तरंग जड मिथ्या भासे, । अनुभवें ऐसाच गवसे । योग ऐश्वर. ॥३०३०॥ आतां म्हणसी योग ऐश्वर । ईश्वराचा युक्तिचातुर्य प्रकार, । तरी आर्चे चातुर्यची त्याचा आकार, । म्हणूनी योग ऐश्वर नांव विश्वरूपा ईश्वराचें. ॥ ३०३१ ॥ "दिव्यं ददामि ते चक्षुः" ऐसें बोलोनी, । "पश्य मे योगमैश्वरं" म्हणोनी । बोलिलों, आणि विश्वरूप माझें दावूनी, । पुरविले तुझे मनोरथ. ॥ ३०३२ ॥ एवंच माझा योग ऐश्वर, । रूप माझें मीच ईश्वर, । कल्पूनी आपणातें आपण सर्वेश्वर, । चराचररूपी मी जालों. ॥ ३०३३ ॥ तथापि निर्गुण निर्धर्मस्वरूप । न म्हणावें योग ऐश्वररूप, । परंतु रूपीं रूप नाहीं, आहे तें अरूप, । तो योगऐश्वर तुज अनुभवें दाविला. ॥ ३०३४ ॥ त्यास आधीं आरंभीं अर्जुना ! । हें सगुणज्ञान वाटावें तुझ्या मना, । म्हणूनी नवमीं बोलिलों प्रथम या वचना, । कीं राजगुह्य धर्म्य सांगेन तूतें म्हणोनी. ॥ ३०३५ ॥ जेथें मायागुणाचे धर्म, । तें अधिष्ठान धर्म्य बोलावे सधर्म, । अद्वैत अनुभवरूप आणि नुसतें नव्हे निर्धर्म, । तें ज्ञान धर्म्य बोलावें. ॥ ३०३६ ॥ तरी बहुतेक हे गीता । धर्म्यसंवादरूपची तत्त्वता, । द्वादशींही, पांडुसुता ! । हें धर्म्यामृत म्हणूनी बोलिलों. ॥ ३०३७ ॥ यालागीं हा धर्म्य संवाद, । जेथें अद्वैतबोधरूप मी सगुण गोविंद, । म्हणूनी येथें प्रतिपद । भक्ति थोर आणि भक्त थोर, ऐसें बोलिलों. ॥ ३०३८ ॥ अद्वैतबोधाविना मायागुण । न घडे, कीं ब्रह्मात्मत्वबोधस्फुरण । तेंही न घडे सत्वांशाविण, । तोही धर्म्यच अनुभव निर्गुणाचा. ॥ ३०३९ ॥ श्रुति "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या"[1] म्हणोनी । म्हणे, ब्रह्म दिसतें सूक्ष्म बुद्धीकरूनी, । "बुद्धिग्राह्यमतींद्रियं"[2] ऐसें गीतावचनीं । भगवद्वाक्य. ३०४० ॥ "यतो यतो निश्चरति । मनश्चंचलमस्थिरं" म्हणे श्रीपती, । "ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत्"[3] ये रीती । भगवद्वाक्य. ॥ ३०४१ ॥ स्थळस्थळीं वचनें । वेदीं, पुराणीं, कीं बुद्धीनें, मनें । तत्त्व ओळखावें, तरंगजीवनें । मरावें चित्सागरीं हेंही सधर्म्य. ३०४२ ॥ तोची आत्मा निर्गुण । विश्वाकारें देखतां सगुण, । निर्गुणेंची दिसती त्रिगुण, । हें धर्म्य ज्ञान तों अतिकष्ट. ॥ ३०४३ ॥ हाची बोध निर्गुणोपासकांही, । तथापि गौण हें धर्म्यज्ञान सगुण ऐसें कांहीं । मानूनियां, सगुण भक्ति करणें नाहीं, । म्हणूनी क्लेश अधिकतर तयांतें. ॥ ३०४४ ॥ आणि ज्ञानी भक्त । याच बोधातें [illegible]

---

१. अ० ९, श्लो० २. २. अ० ६, श्लो० २१. ३. अ० ६, श्लो० २६.

मानूनीं, अनुरक्त । सगुणपणी म्हणुनी, तें युक्त । गुह्यतम संमत मज त्याहुनी. ॥ २०४५ ॥ ऐसेंच अष्टादशी शेवटीं । तुज बोलिलों अगा ! किरीटी ! । कीं जे सर्वात्मभक्ती माझी मोटी, । ते जो ब्रह्मभूत ब्रह्म जाला तो पावतो. ॥ २०४६ ॥ "ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा" या श्लोकेंकरूनी । "मद्भक्तिं लभते परां" म्हणोनी, । ते भक्तिही ब्रह्मभूतायोग्य दावुनी, । बोलिलों, कीं "समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते परां." ॥ २०४७ ॥ पुन्हां त्याही भक्तीकरूनी । बोलिलों, मातें जाणतो, म्हणोनी । "भक्त्या मामभिजानाति" येथूनी । सगुण साक्षिरूप तो ब्रह्मभूत जाणतो. २०४८ ॥ ऐसें माझें सगुणत्व । ब्रह्मभूत जो अनुभवें पावला ब्रह्मत्व, । तोही तदुपरी योग्य होतो, जाणावया तत्त्व । साक्षीपण सगुणपणाचें माझिया. ॥ २०४९ ॥ "भक्त्या मामभिजानाति" । म्हणूनी जें बोलिलों तुजप्रती, । तो तें ब्रह्मरूप जाला, ये रीती । त्या मागिल्या श्लोकीं बोलिलों. ॥ २०५० ॥ जो ब्रह्म जाला योगी, । सगुणत्व माझें तयाहीलागीं, । मग कळतें, ऐसें प्रतिप्रसंगीं । मुख्यत्वें सगुणची बोलिलों. ॥ २०५१ ॥ म्हणोनी हा धर्म्यसंवाद । तुझा माझा, म्हणे गोविंद, । भाव ऐसा दाउनी, धर्म्यपद । बोलिला, तो भाव वर्णिला. ॥ २०५२ ॥ आतां म्हणतो गोविंद, । कीं तुझा माझा हा धर्म्य संवाद, । जो मुखेंकरूनी प्रतिपद । म्हणेलही अर्जुना, ॥ २०५३ ॥ त्यानेंही ज्ञानयज्ञेंकरूनी । मज यजिलेंची म्हणोनी । मी मानितों, याकरूनी । तोही ज्ञानयज्ञें यजी मातें, हा भाव. ॥ २०५४ ॥ कीं रत्नाची पेटी अर्पिली ज्याणें । ज्या पेटींत रत्नखचित अवघें लेणें, । तीं लेणीं लेवविलींच त्याणें, । नाहीं जरी लेवविलीं. ॥ २०५५ ॥ अगा ! गहूं आणि दुभतें । जो दे मिष्टान्नभोक्तयातें, । म्हणे काय काय जेवूं घातलें त्यातें । तरी पाकक्रिया तो नेणे. ॥ २०५६ ॥ अगा ! कामधेनू ज्यानें दिधली, । आणि ते देतां सहज धेनू साधारण मानिली, । तथापि ज्यासी दिधली, त्याची पुरविली । सकळ कामना तया दातयानें. ॥ २०५७ ॥ अगा ! पाणी म्हणूनी पाजिलें, । तथापि तें अमृत पाणी न जालें, । पितां पितां तें गोडची लागलें, । अमृत न कळोनीही पाजितां. ॥ २०५८ ॥ तैसा न कळोनीही गीतार्थ, । म्हणे पाठ वाची धरूनी भावार्थ, । तरी मी तों ऐसें मानितों यथार्थ, । कीं ज्ञानयज्ञें त्यानें मज यजिलें. ॥ २०५९ ॥ अगा ! हें तत्त्व सांगतों तुजला, । कीं जो ज्या रूपें मजला । कळत, न कळत, जरी भजला, । तरी मी त्या रूपें त्याला प्रकटतों. ॥ २०६० ॥ अर्थ न कळे,

---

१. अ० १८, श्लो०५४.

परी । माझी गीता म्हणे जरी, । मी हें गीतामृत तयावरी । वर्षेंच निश्चित अर्जुना! ॥ ३०६१ ॥ ज्यावरी गीतार्थ अमृतवृष्टी । होय, त्याला ज्ञानदृष्टी । मद्रूप जेव्हां दिसेल सृष्टी, । तेव्हां ज्ञानयज्ञ नव्हे तो काय? ॥ ३०६२ ॥ एवंच गीता म्हणायाचें फळ । ज्ञानयज्ञची निर्मळ, । तो मज देणेंची केवळ, । जो गीता म्हणेल त्या धन्यातें. ॥ ३०६३ ॥ म्हणूनी म्हणतां पाठमात्र । ज्ञानयज्ञेंची मज तो पवित्र। यजितो ऐसें मानितों, म्हणे कमलनेत्र । या भावें-करूनी. ॥ ३०६४ ॥ पेरितां उसाचीं पेरीं, । ता काय गूळ, शर्करा पेरी? । परी दूरदृष्टी पाहसी जरी, । पेरिलींच सर्वेही तीं त्याणें. ॥ ३०६५ ॥ कीं ते भूमि गूळ, शर्करा, । अमर्याद देते त्या नरा, । ते पदार्थ अगा! पांडुकुमारा!। कोठोनी आले? ॥ ३०६६ ॥ पेरितां उसाचीं पेरीं, । काय तीं गोड लागती जिभेवरी? । उंताडा पिकाचा आलियावरी, । गोडीच अवघी चोष्यपेयभक्ष्य-भोज्यांत. ॥ ३०६७ ॥ गीता म्हणतां तो नर । नेणे ज्ञानयज्ञाचे प्रकार.। परंतु तेंच फल देतों मी गीताकार,। म्हणूनी ऐसें आधींच मानितों. ॥३०६८॥ कीं ज्ञानयज्ञेंकरूनी । मज यजिले त्यानें, म्हणोनी । मी मानितों ऐसें हृदयीं धरूनी, । देव बोलिला हा श्लोक. ॥ ३०६९ ॥ आणि येथें म्हणे, माझी मती । अगा! अर्जुना! ये रीती । कीं हा महिमा म्हणणार नेणती, । तथापि मति माझी जाणते. ॥ ३०७० ॥ मति म्हणजे सत्त्ववृत्ति बुद्धी, । ज्या वृत्तीनें निश्चयाची सिद्धी, । ऐसी तत्त्वसंख्या शास्त्रीं प्रसिद्धीं, । एवंच मतिशब्दें निश्चय आपला सुचवी. ॥ ३०७१ ॥ ऐसा महिमा येथपर्यंत । गीतार्थनिरूपणाचा, पठनाचाही भगवंत । बोलिला, त्यांत अर्थवक्ता अत्यंत । प्रिय, बोलतां श्रोतेही, बोलिला. ॥ ३०७२ ॥ "मद्भक्तेष्वभिधास्यति" । म्हणूनी बोलिला श्रीपती, । कीं हे गीता माझ्या भक्तांप्रती । जो सांगेल, सर्वांहूनी प्रिय मला. ॥ ३०७३ ॥ सांगेल म्हणतां भक्तांप्रती; । तैसीच त्या श्रोतयांचीही प्रीती । आपणास म्हणोनी, यदुपती । "मद्भक्तेषु" म्हणोनी श्रोते अर्थाचेही बोलिले. ॥ ३०७४ ॥ माझिया लेंकुरातें । दूध पाजी तो आवडे मातें, । या न्यायें बोलिलें रमाकांतें । "य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति" या श्लोकीं. ॥ ३०७५ ॥ एवं गीतार्थ श्रवणपर । प्रसंगोपात्त बोलिलेच नर, । कीं वक्ता जैसा प्रियतर, । प्रिय तेही आपणातें. ॥ ३०७६ ॥ याद्वपरी जो अर्थावांचुनी । गीता म्हणेल, तोही ज्ञानयज्ञेंकरूनी । मातें यजितो, म्हणोनी । बोलिला देव. ॥३०७७॥ गीतार्थ न कळे जयाला, । परंतु भक्तीकरूनी वाचों

१. उतारा. २. अ० १८ श्लो० ६८.

लागला, । तोही अत्यंत प्रिय मजला, । "बहूनां जन्मनामंते" मागें निरूपिलें. ॥३०७८॥ आणीक अर्थावीण । उगेंची गीतेचें श्रवण । घडे, त्याचेंही फल आपण । बोलतों आतां या श्लोकीं. ॥ ३०७९ ॥

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।**

**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान् प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥**

अगा! उगीच हे गीता । आयके जरी होऊनी श्रोता, । तरी तोही पांडुसुता । शुभ लोकांतें पावतो. ॥ ३०८० ॥ ज्या शुभ लोकांतें सुमती। अगण्य पुण्य करणारची जाती, । त्या शुभ लोकांचप्रती । जातो जो उगीही गीता आयके. ॥ ३०८१ ॥ आतां असेल जरी पापयुक्त, । तरी होणार त्यापासूनी मुक्त, । पापापासूनी सुटल्याव्यतिरिक्त । कैंवी पावे शुभ लोकातें? ॥ ३०८२ ॥ श्रवणेंची जाय पाप, । पावे शुभ लोकांतें निष्पाप, । हा गीताश्रवणाचा प्रताप, । पापी परी जरी असे गुण एक, आणि दुर्गुण एक नसे. ॥३०८३॥ कीं असावा श्रद्धावंत, । आस्तिक्यबुद्धि, कीं गीता थोर अत्यंत, । जिचा वक्ता स्वयें भगवंत, । जो ईश्वर ईश्वराचा. ॥ ३०८४ ॥ श्रद्धा असावी यापरी, । आणि माझी असूया नसावी अंतरीं, । कीं ठेवणें दोष मज निर्दोषावरी, । असूया म्हणावें तें कर्म. ॥ ३०८५ ॥ ज्याला असेल ते असूया, । असूयु म्हणिजेतें तया, । ते असूया नसे जया, । त्यालाच फळेल गीता हे. ॥३०८६॥ ईश्वरत्वीं विषमत्व । आणि लागे निर्दयत्व, । ऐसा निश्चय जयाचा, त्यास योग्यत्व । नाहीं गीताश्रवणाचें. ॥ ३०८७ ॥ आणि अवताररूपीं नाना । लोकांसारिखी कर्मरचना, । तेथें दोष लावी जो अर्जुना! । त्यासही गीताश्रवण निष्फळ. ॥ ३०८८ ॥ याकारणें जो श्रद्धावंत । आणि जो असूयारहित, । तो श्रवणमात्रेंही निश्चित । निष्पाप होय, पावे शुभ लोकांतें. ॥ ३०८९ ॥ ऐसा गीतामहिमालेश । समाप्त जालिया उपदेश । बोलोनी, आतां हृषीकेश । बोलवितो अर्जुनातें. ॥ ३०९० ॥ कीं हा उपदेश बिंबला, । आणि जो निश्चय अर्जुनें केला, । तो त्यानें वदावा, म्हणूनियां बोला । बोलतसे या श्लोकीं. ॥ ३०९१ ॥

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**

**कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥**

अगा! पार्था! हें जें कांहीं । बोलिलों, तें आइकिलें कीं नाहीं? । ऐसें

---

१. अ० ७ श्लो० १९.

अर्जुनातें पुसतांही, । सकळ शंका मानायाचें देखिलें. ॥ ३०९२ ॥ कीं कानीं शब्द पडती, । परंतु बुद्धि ठायीं नसतां, उडती, । आणि आइकिलेंचि नाटती । ते शब्द. ॥ ३०९३ ॥ तैसेंही जो आइकतो, । तोही म्यां आइकिलेंची म्हणतो, । म्हणूनी देव मागुती पुसतो, । “एकाग्रेण चेतसा” म्हणोनी. ॥ ३०९४ ॥ अगा! एकाग्रबुद्धीकरूनी । हें आइकिलें कीं नाहीं? म्हणोनी । अर्जुना पुसतों, ऐसा स्ववचनीं । दाखवी भाव. ॥ ३०९५ ॥ आतां एकाग्रही असे बुद्धी, । आणि कळे अर्थाचीही समृद्धी, । तथापि नाहीं होत ते गोष्टीची सिद्धी, । ज्या गोष्टीकारणें तें श्रवण. ॥ ३०९६ ॥ भय उपजलें कांहीं चित्तीं, । त्याच्या परिहारार्थ शब्दप्रवृत्ती । आयके समजोनी, तरी निवृत्ती । त्या भयाची होईना. ॥ ३०९७ ॥ एकाग्रबुद्धीकरुनी । श्रवण बरवेंही घडोनी, । शंकानिवृत्ति न घडे, म्हणोनी । नव्हे सार्थकत्व निरूपणाचें, श्रवणाचें. ॥ ३०९८ ॥ तरीं आपलें गीतानिरूपण । आणि पार्थाचें श्रवण, । दोहींचेंही सार्थकपण । प्रगट व्हावें मुखें अर्जुनाच्या. ॥ ३०९९ ॥ याकारणें याउपरी । जे रीति अर्जुनाची वैखरी । हा अर्थ बोले, ऐसें हरी । उत्तरार्धी बोलतो. ॥ ३१०० ॥

श्लोकोत्तरार्धः—कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥

अगा! तुझें आत्मविषयीं अज्ञान, । ज्यास्तव अत्यंत गहन, । जो मोह नानात्वभान, । तो नाशला कीं न नाशला? ॥ ३१०१ ॥ कीं आधीं आत्मरज्जूचें अज्ञान, । मग नानाजडत्व सर्पभान, । ऐसें द्विविध अज्ञान नाशी ज्ञान, तें या गीतेंत उपदेशिलें. ॥ ३१०२ ॥ तरी तुझें अज्ञान गेलें कीं नाहीं, । हें आम्हांस न कळे कांहीं, । ऐसें लोकदृष्टी पुसतांही, । सर्वज्ञत्व सुचवी श्रीकृष्ण ॥ ३१०३ ॥ अगा! धनंजया! म्हणोनी, । या धनंजय नांवेंकरूनी । या श्लोकीं अर्जुनातें आळवूनी, । सुचवी ऐसें. ॥ ३१०४ ॥ कीं तुज ज्ञान जालें, । हे आम्हांस बरवें कळों आलें, । तरी ‘धनंजया!’ म्हणूनी आळविलें । अर्जुना तूंतें. ॥ ३१०५ ॥ कीं अद्वैत आत्मधन । जिंकिता जाला अर्जुन, । ऐसें समजोनी जगज्जीवन, । ‘धनंजय’ ऐसें म्हणतसे. ॥ ३१०६ ॥ सुचवूनी ये रीती, । ज्ञान जालें कीं नाहीं, पुसे मागुती, । यांतही सुचवी श्रीपती । अर्थ ऐसा. ॥ ३१०७ ॥ कीं धन जिंके तो धनंजय, । तरी तुज प्राप्त जालें अक्षय, । तथापि तुझ्या मुखें कळावें निश्चय । सर्वांस, म्हणूनी पुसतसें, हा भाव. ॥ ३१०८ ॥ ऐसें देवाचें वचन । परिसतां प्रेमें भरले लोचन, । कंठ दाटला, तथापि अर्जुन । सांभाळून बोलतो हा श्लोक. ॥ ३१०९ ॥

**अर्जुन उवाच—नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥**

अर्जुन म्हणे जी अच्युता ! । मोह माझा गेला पुरता, । स्मृति पावलों तत्त्वतां । प्रसादें तुझिया. ॥ ३११० ॥ गेला सकळ संदेह, । आहें होऊनी गतसंदेह, । तुझा प्रसाद होतां अज्ञानमोह । राहेल कैसा ! ॥ ३१११ ॥ करीन तुझें वचन, । करीन कौरवांचें कदन, । म्हणुनी म्हणे अर्जुन । याचा विशद अर्थ ये रीती. ॥ ३११२ ॥ प्रश्न, तुझें गेलें कीं नाहीं अज्ञान, । आणि मोह नानात्वजडभान, । त्यास आधीं बोलिला अर्जुन । मोह नाशला म्हणोनी. ॥ ३११३ ॥ आधीं आपण कवण । हे कळावी खूण, । मग जडतरंगास चित्सिंधुपण, । त्या चित्सिंधुयोगें कळतसे. ॥ ३११४ ॥ अवलंबूनी हा क्रम, । उपदेशक्रमें पुसे पुरुषोत्तम; । अर्जुन आधीं म्हणे, गेला मोहभ्रम । नानाजडत्व भेदाचा. ॥ ३११५ ॥ बोलोनी ऐसें प्रथम, । मग आठविला क्रम, । आणि म्हणे, कीं आत्मस्मृति परम । पावलों म्हणोनी. ॥ ३११६ ॥ कीं लाभ होय आत्मस्मृतीचा, । होतां विवेक जडचैतन्याचा, । मग सर्वात्मबोध साचा । अनुभवा येतो, हा क्रम. ॥ ३११७ ॥ परंतु लाभ मोठा वाटला, । जेव्हां मोह जडपणाचा तुटला, । पूर आनंदाचा लोटला । चराचर लहरियांसमवेत. ॥ ३११८ ॥ म्हणुनी आधीं मुखास आला, । जो सर्वात्मतेचा बोध जाला, । कीं सामग्री मिळाली तेव्हां जेविला, । तथापि लाभ मोठा जेवणाचा. ॥ ३११९ ॥ या भावेंकरूनी, । आधीं म्हणे मोह नाशला म्हणोनी, । मग बोलिला आठवूनी, । कीं स्मृति पावलों तुझ्या प्रसादें. ॥ ३१२० ॥ कीं जडतरंगीं स्फुरण । प्रथम ज्या चित्समुद्रें, तो आपण, । ऐसें होऊं लागलें स्मरण, । प्रथम जडनिषेधें कळतां चिदात्मा. ॥ ३१२१ ॥ या भावें म्हणे, स्मृती । पावलों जी ! जगत्पती ! । आतां करीन म्हणतो महामती, । आज्ञा तुझी अच्युता ! ॥ ३१२२ ॥ देवा ! आतां म्हणसी मला, । कीं अनुभव ऐसा जाला तुजला, । आतां काय करणार ? तरी तुझ्या बोला । मस्तकीं धरूनी वर्तेन. ॥ ३१२३ ॥ कीं प्रारब्धकर्माचा क्षय । भोगेंची करूनी, ऐसा निर्णय । जो तूं बोलिलासी, तो निश्चय । धरिला श्रीकृष्णा ! ॥ ३१२४ ॥ देवा ! बोलिलासी गोष्टी ऐसी, । कीं हें अहंकारें न मानिसी, । तरी तूं अर्जुना ! वायां जासी, । कीं स्वभावजनित कर्में तूं निबद्ध. ॥ ३१२५ ॥ एवं जेव्हां प्रारब्धची ये रीती, । आणि तूं आज्ञा करिसी जगत्पती !। आतां हें करितांच तुझी प्रीती । संपादणें उचित

मजला. ॥३१२६॥ या भावें म्हणे अर्जुन, । कीं देवा ! करीन तुझें वचन । ऐसें या संवादाचें निवेदन । धृतराष्ट्रास संजय करितसे. ॥ ३१२७ ॥ कृष्ण आणि धनंजय । संवाद यांचा संजय । आइकतां जो स्वानंदमय, । तो आतां स्व उक्ती येथूनी बोलतसे. ॥ ३१२८ ॥

संजय उवाच—इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥

संजय म्हणे, वासुदेव । जो सर्वांभूतीं वसे देव, । तो स्वयें श्रीकृष्ण देवाधिदेव । आणि पार्थ, संवाद या दोघांचा. ॥ ३१२९ ॥ तो पार्थ आपल्या हातें । साडेतीन हात, इतकेंची त्यातें । तूं जाणसी राया ! परंतु मातें । दिसतो आतां तोही वासुदेव. ॥ ३१३० ॥ या भावेंकरूनी । म्हणे, महात्मा म्हणोनी, । आत्मशब्दें बुद्धि सुचवूनी, । अनुभवें वासुदेव तोही म्हणतसे. ॥ ३१३१ ॥ कीं आत्मा सर्वगत, परी सर्वांस । न कळे तो कळला जंयास, । तो स्वबुद्धीनें स्वयें जगन्निवास, । ऐसें अनुभवें, देखतो. ॥ ३१३२॥ तो महात्मा म्हणावा, । त्याचीच बुद्धि मोठी, ऐसा गणावा, । तोची वासुदेव जाणावा, । जो सर्वभूतीं देखे आपुला वास. ॥ ३१३३ ॥ देह आत्मा सात विती, । जे बुद्धि ऐसें मानीत होती, । ते अनत ब्रह्मांडींची स्थिती । त्या आत्मयाची देखते. ॥ ३१३४ ॥ ज्याची बुद्धि ये रीती, । महात्मा तयातेंची म्हणती, या भावें धृतराष्ट्राप्रती । संजय म्हणे, कीं महात्मा पार्थ. ॥ ३१३५॥ कीं हा संवाद वासुदेवाचा । आणि जो महात्मा त्या पार्थाचा, । प्रश्नोत्तरीं दोघां ऐसियांची वाचा । जयांत. ॥ ३१३६ ॥ तो हा संवाद मी तयां-। पासूनी ऐकता जालों धृतराष्ट्रराया ! । जो स्मरतां, माझिया देहास या । रोमांच उठती. ॥ ३१३७ ॥ संवाद महा अद्भुत, । कीं सगुणरूपीं अद्वैत, । मिथ्या भासरूपेंही द्वैत । नुरे जेथें. ॥३१३८॥ कीं सर्वेही म्हणतां निर्गुण, । निर्गुण नव्हे, साकारपण, । तेव्हां तद्विलक्षण मृषा, हेंही सगुण, । अद्वैत अद्भुतत्वें वाटे. ॥ ३१३९ ॥ शिष्य अर्जुन, गुरु भगवंत, । संवाद त्यांचा अद्भुत, । जो अनुभव झांकला होता आजपर्यंत, । तो या प्रसंगें प्रगटला. ॥ ३१४० ॥ मजही माझा गुरुनाथ । व्यास करिता जाला सनाथ, । परी सगुण योग ऐश्वर हा जगन्नाथ । बोलतां, समजला मज राया ! ॥ ३१४१ ॥ तथापि बोलतों बोल साचा, । कीं हा प्रसाद श्रीव्यासाचा, । तरी हा योग ऐश्वर या जगन्निवासाचा । आइकता जालों, म्हणतसे या श्लोकीं. ॥ ३१४२ ॥

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यतमं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

श्रीगुरु व्यासाच्या प्रसादास्तव । हें गुह्य आइकता जालों वास्तव, । परंतु गुह्य वाटलें यास्तव, । कीं उपदेश व्यासमुखें हा नव्हता. ॥ ३१४३ ॥ मी शिष्य व्यासाचा, । दिधला ज्याणें ब्रह्मसाक्षात्कार साचा, । तथापि योग ऐश्वर जगन्निवासाचा, । हें जग ऐसेंची म्हणूनी मी नेणें. ॥ ३१४४ ॥ हें जगची जगदीश्वर । परम गुह्य हा योग ऐश्वर, । तो स्वयें बोलतां योगेश्वर । आइकता मी जालों तयापासुनी. ॥ ३१४५ ॥ म्हणतां व्यासप्रसादेंकरूनी । गुह्य आइकिलें म्हणोनी, । तें गुह्य काय? तरी योग आणि योगेश्वरापासूनी । म्हणतां बोले हा अर्थ. ॥ ३१४६ ॥ कीं याहूनी पूर्वी शिष्य व्यासाचा, । आणि अनुभवी संपूर्ण साचा, । त्याचीच बोले हे वाचा, । कीं गुह्य म्यां आयकिलें. ॥ ३१४७ ॥ ज्यास हें एकत्र ठायीं पडे, । तेंच त्यास अन्यत्रही सांपडे, । तेव्हां त्यास गुह्य म्हणणें न घडे । कदापिही. ॥ ३१४८ ॥ आणि ज्यास कळलें बहुत, । जो सर्वज्ञ स्वयें अत्यंत, । त्यासही कांहीं कळे अद्भुत, । तरी तें गुह्य त्यानें म्हणावें. ॥ ३१४९ ॥ अपरोक्षसाक्षात्कारेंकरूनी । संजय पक्क अनुभवी, ज्ञानी, । सर्वज्ञ, शिष्य व्यासाचा होउनी, । हें गुह्य अद्भुत आइकिलें म्हणतसे. ॥ ३१५० ॥ आत्मा अद्वैत कळतां, श्रुती । सकळ कळलें म्हणती, । व्यासशिष्य संजय महामती । सर्व जाणे. ॥ ३१५१ ॥ अनुभवबोध व्यासापासुनी । नसता, तरी व्यासशिष्य म्हणोनी । प्रसिद्धि नसती, कीं श्रीकृष्णवचनेंकरुनी । ज्ञानगुह्य कळलें त्याला म्हणावें. ॥३१५२॥ आणि पूर्वी त्यास जरी नसतें ज्ञान, । तरी व्यासाच्या वरें त्याचे कान । शब्दमात्र घेते, जैसें अनुभवावीण व्याख्यान । व्युत्पन्न आतां करिती गीतेचें. ॥ ३१५३ ॥ आतां व्यासापासूनी शास्त्र शिकला । आणि ज्ञान गीता उपदेशितां पावला, । तेव्हां गुरु श्रीकृष्णची बोलिला, । ज्ञानदाता तोची गुरु. ॥ ३१५४ ॥ एवंच संजय ज्ञानी, त्याला । गुह्य उपदेश हा वाटला, । कीं योग ऐश्वर नव्हता आइकिला । याहूनी पूर्वी गुरुमुखें. ॥ ३१५५ ॥ ऐसा हा योग ऐश्वर अनुभव, । जे ब्रह्मानुभवी त्यांसही अभिनव, । परंतु जया ज्ञानियास भक्तीचें वैभव, । त्यालाच अनुभव हा घडे. ॥ ३१५६ ॥ व्यासशिष्य अनुभवी, । त्यासही हे गोष्टी वाटली नवी, । म्हणोनी बोलतां सुचवी, । कीं हें गुह्य अद्भुत आइकिलें. ॥ ३१५७ ॥ आणि ज्या ईश्वराचा योग ऐश्वर, । हें

विश्व अवघें चराचर, । तोची आपण योगेश्वर । या योगानुभवातें बोलिला. ॥ ३१५८ ॥ त्याचपासूनी केवळ । आइकता जालों निवळ, । कीं मजमाजी भूतें सकळ, । परी त्या भूतांत मी नसें. ॥३१५९॥ तींही मजमाजी नसती, । कीं नसोनी मिथ्या दिसती, । पाहें अर्जुना! ये रीती । माझा योग ऐश्वर. ॥ ३१६० ॥ ऐसा योग ऐश्वर । स्वयें बोले योगेश्वर, । तो म्यां आइकिला सविस्तर । प्रसादें व्यासाच्या. ॥ ३१६१ ॥ कीं त्या प्रसादेंकरूनी । अपरोक्षानुभव होता, म्हणोनी । त्या स्वरूपीं भूतें दिसती नसोनी, । हा योग ऐश्वर म्हणतां मज कळला. ॥ ३१६२॥ नसोनी अपरोक्षसाक्षात्कार, । दोहीं सैन्यांत जो प्रकार । वर्तेल, तितका कळावा विचार । मज, म्हणूनी वर या गुरुवरें दिधला. ॥ ३१६३ ॥ तरी हा संवाद कळला बरा, । अन्यथा अर्जुनावांचून दुसरा । कोण जाणतो या गुह्या परात्परा । संवादातें ? ॥ ३१६४ ॥ संजय बोले ये रीती, । तों घडी घडी अंगीं रोमांच उठती, । म्हणूनी बोलतो धृतराष्ट्राप्रती । हा श्लोक. ॥ ३१६५ ॥

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

राया! या परम अद्भुतातें । आठआठवूनी संवादातें, । पुनःपुन्हा हर्ष वाटतो मातें, । शरीरीं उठती रोमांच. ॥ ३१६६ ॥ हा संवाद केशवाचा आणि अर्जुनाचा, । ज्यांत या दोघांचिया वाचा, । ज्यास अर्थ न कळे याचा, । त्यासही पुण्य याचिया श्रवणपठणें. ॥ ३१६७ ॥ ऐसा हा संवाद पुण्य, । पुण्य याच्या श्रवणें अगण्य, । न करितां तप, न सेवितां अरण्य, । पुण्य अगण्य साधारणासही. ॥ ३१६८ ॥ ज्यांस गीतार्थ अनुभव घडे । त्यांचें पुण्य आणि पापही उडे, । अनुभवावांचुनी अर्थ ठायीं पडे, तरी अगण्य साधन अनुभवाचें. ॥ ३१६९ ॥ या भावेंकरूनी । हा पुण्यसंवाद, म्हणोनी, । संजय सांगे, तों मनीं । पुनःपुन्हा आठवें विश्वरूप. ॥३१७०॥ हें गुह्य अनुभवें कळलें, । विश्वरूप डोळां देखिलें, । हें अद्भुतद्वय रेखिलें । हृदयीं संजयाच्या. ॥ ३१७१ ॥ त्यांत अनुभवें संवादाचें श्रवण, । सांगितलें अद्भुतपण, । आतां विश्वरूपही अद्भुत आपण । देखिलें, तें सांगतो या श्लोकीं. ॥ ३१७२ ॥

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।
विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥

राया ! तें श्रीहरीचें रूप, । अद्भुत जें विश्वरूप, । ज्या ज्या नाना रूपीं अरूप चित्स्वरूप । दाऊनी हरी हरी जडत्वातें. ॥ ३१७३ ॥ विश्वरूप चित्सिंधुलहरी । ऐसा अनुभवें हरी । जडभ्रमातें परिहरी, । त्या हरीचें तें रूप. ॥ ३१७४ ॥ दिव्यदृष्टि अर्जुन लाहे, । दिव्य चक्षूकरूनी विश्व पाहे । तो त्याहूनी पूर्वीं मज आहे, । वर माझिया गुरूचा. ॥ ३१७५ ॥ कीं सेनाद्वयांत जें व्हावें, । तें अवघें मज दिसावें, । ते जडभ्रांति हरूनी देवें । जैसें अर्जुनास तैसेंच मज दाविलें. ॥ ३१७६ ॥ हरुनी अवघें जडत्व, । जडीं नगीं दाविलें चित्सुवर्णत्व, । या अर्थीं हरीचें हरित्व । स्मरोनी संजय म्हणे, कीं रूप त्या हरीचें. ॥ ३१७७ ॥ दीपाचें नाम हरी, । तो तमा वाइटातेंची परिहरी, । हरि नाम हेमाचें असे जरी, । तें परिहरी अलंकाराचेंची मिथ्यात्व. ॥ ३१७८ ॥ जितकें वाईट तितकें हरी, । त्या हरीचें रूप तोची हरी. । दावितां आधीं; परिहरी । जडत्व, मग दाखवी विश्वरूप. ॥ ३१७९ ॥ नयनीं जडत्व भासे, । तों बुद्धीस चित्स्वरूप दिसे, । ऊंस काष्ठासारिखा दिसतसे, । परी रसनेस रस तो गोड. ॥ ३१८० ॥ तें हरीचें स्वरूप अद्भुत,। आठवुनी मी अत्यंत । हर्ष पावतों, आणि रोमांचित । देह पुनः पुन्हां होतसे. ॥ ३१८१ ॥ त्या रूपाचें मातें । राया! परम आश्चर्य वाटतें, । तें सांगतां कंठीं दाटतें । प्रेम तया श्रीहरीचें. ॥ ३१८२ ॥ ऐसे एका उणे सात शत । श्लोक जाले अद्भुत, । आतां श्लोक एक उर्वरित । संजयाचा. ॥ ३१८३ ॥ त्या श्लोकांचें निमित्त । ऐसें, कीं धृतराष्ट्राचें चित्त । शंकित ये रीति, कीं राज्यवित्त । धर्मन्यायें स्वपुत्रांचें. ॥ ३१८४ ॥ 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे' या श्लोकीं। व्यंगोक्तीनें बोलिला, कीं । पुत्र माझे[1] असतां या लोकीं, । राज्य न लाधती पांडव. ॥ ३१८५ ॥ 'धर्मक्षेत्रे' या श्लोकेंकरूनी । 'मामकाः पांडवाश्चैव' म्हणोनी । 'मामका एव पांडवाश्च' ऐसें व्यंग्य सुचवुनी, । व्यंग्योक्तीनें अन्याय पांडवांकडे लाविला. ॥ ३१८६॥ एवशब्द आणि चकार,। दोहींकडे दोनी प्रकार । लाविले, याचा विशद विचार । प्रथमाध्यायांत वर्णिला. ॥ ३१८७ ॥ कीं धर्मरूप में क्षेत्र, । ऐसें श्रीकुरुक्षेत्र, । तेथेंही न उघडती नेत्र । पांडवांचे. ॥३१८८॥ कीं पुत्र माझे 'मामका एव' । म्हणजे ज्यांचा पिता मीच स्वयमेव, । ते माझेच पोटींचे आणि पांडव, । 'पांडवाश्च' म्हणजे पांडुचेही पुत्र बोलावे. ॥ ३१८९ ॥ कीं ते पांडूपासूनी । नाहीं

१. अ० १ श्लो० १.

जाले म्हणोनी, । तथापि त्याच्या स्त्रियांचे पुत्र, यावरूनी । **पांडूचेहीं** पुत्र बोलावे. ॥ ३१९० ॥ एवंच **पांडुपुत्र** हे **पांडव**, । नव्हती हे **माझेच** हा भाव, । आणि धर्मक्षेत्रीं मिळाले सर्व । युद्धाकारणें. ॥ ३१९१ ॥ त्यांत माझ्या पुत्रांस उचित, । कीं ते स्वयें माझेच सुत, । परी **पांडव पांडूचे** नव्हती निश्चित, । तिहीं राज्याकारणें कां भांडावें? ॥ ३१९२ ॥ हें पूर्वीं नाहीं सुचलें. । स्वार्थीच चित्त प्रवेशलें, । परंतु धर्मक्षेत्रींही मनीं धरिलें । कीं भांडावेंची राज्यानिमित्त. ॥ ३१९३ ॥ हें धर्माचें क्षेत्र, । मन येथेंही तयांचें अपवित्र, । हें **सं**जया वाटनें विचित्र, । म्हणूनी व्यंग्योक्तीनें बोलिला. ॥ ३१९४ ॥ ते गोष्टी **सं**जयाच्या मनीं । खुपत रुतली होती, म्हणोनी । उत्तर त्या गोष्टीचें आठवूनी, । 'जिकडे **कृ**ष्ण तिकडे सर्व,' ऐसें म्हणतसे या श्लोकीं. ॥ ३१९५ ॥

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयोभूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम** ॥ ७८ ॥

राया! विश्व अवघें योग ऐश्वर, । त्या अघटितघटनाचातुर्याचा ईश्वर, । तें योग ऐश्वर रूपच ज्याचें, तो **यो**गेश्वर । श्री**कृ**ष्ण जिकडे; ॥ ३१९६ ॥ आणि **पृ**था **कुं**ती तिचा सुत, । परी विभूति त्या **यो**गेश्वराची अद्भुत, । धनुर्धर राजे मिळाले बहुत, । परंतु तो धरितो धनुर्धर **पार्थ** जिकडे; ॥ ३१९७ ॥ ऐसा **यो**गेश्वर योगशरीर, । आणि विभूति अद्भुत धनुर्धर प्रवीर, । हे दोघे जगदेकवीर । असतील जेथें; ॥ ३१९८ ॥ तेथेंच श्री असे हा निश्चय, । तेथेंची राजा! विजय, । तेथेंची सर्व भूति हा निर्णय । आणि तेथेंची शाश्वत नीतिही. ॥ ३१९९ ॥ जेथें स्वयें **श्री**पति, । तेथेंची **श्री**ची वसती; । विजय अवघे तेथेंची असती, । **श्री**पति जेथें **श्री**सह. ॥ ३२०० ॥ जेथें स्वयें **श्री**पती, । तेथेंची नाना विभवरूपें विभूती, । तेथेंची शाश्वती नीती, । अन्याय तिकडे ज्यांकडे तो नसे. ॥ ३२०१ ॥ ज्यांकडे स्वयें **श्री**-पती, । त्यांचकडे शाश्वती नीती, । जिकडे उगवे गभस्ती, । तिकडे विकाशती अंबुजें. ॥ ३२०२ ॥ श्री**कृष्ण** असेल जेथें, । सकळ नीति असतील तेथें, । ध्रुवा नीति म्हणतो येथें, । या भावें **सं**जय. ॥ ३२०३ ॥ **सं**जय ऐसें सुचवी, कीं । जिकडे **कृष्ण** तिकडे बोलिलों जितकीं; । विलक्षण त्यास तीं तितकीं । असती तेथेंची ज्याकडे तो असेना. ॥ ३२०४ ॥ एवंच अन्याय तुमचेच सकळ, । **पांडव** भगवद्भक्त केवळ, । तरी हा उपदेश जो जगन्मं-

मल, । तो त्यांच्या मुळें प्रगटला. ॥ ३२०५ ॥ तो भगवदुपदेश; । ज्या देशीं असेल,[1] धन्य तो देश, । तेथैंची तो हृषीकेश । योगेश्वर आणि धनुर्धर पार्थही. ॥ ३२०६ ॥ तोची पार्थ, जो करी गीतार्थाचें श्रवण, । आणि वक्ता तोची योगेश्वर श्रीकृष्ण. । ऐसें या श्लोकीं निपुण । संजय सुचवी. ॥३२०७॥ एवंच जेथें गीता, । श्रीकृष्ण अर्जुन तेथेंची तत्त्वता, । तेथें श्री, विजय, भूति, नीति, या अमृता । जे सेविती, तेची धन्य. ॥३२०८॥ ऐसे सातशत हे श्लोक, । तोच वाखाणिता जाला उत्तमश्लोक, । जे स्वहिततत्पर, परम पुण्यश्लोक, । तेच समजतील रस याचा. ॥ ३२०९ ॥ जे स्वहिततत्पर । अपेक्षिती तो परात्पर, तेच चतुर, निर्मत्सर । पावतील योग ऐश्वर अनुभवातें. ॥३२१०॥ काय बोलोनी बहुत, । सेवितां कळेल अमृत, । ज्यांस पाहिजे केवळ स्वहित, । तेच अधिकारी या टीकेचे. ॥ ३२११ ॥ ऐसी हे **यथार्थदीपिका** । संपूर्ण जाली टीका, । अर्पिली श्रीशेषपर्यंका, । श्रीवत्सांका योगेश्वरातें. ॥ ३२१२ ॥ सकळ त्याचीच करणी, । तो गीताकारची टीकाकार चक्रपाणी, । म्यां लेखकें लिहूनी अर्पिली त्याचे चरणीं, । हेंही सकळ तोची वामन म्हणे. ॥ ३२१३ ॥ चरणीं अर्पितां सादर, । टीका हृदयीं धरी योगेश्वर, । यांत भाव दावी सर्वेश्वर । कीं माझें हृदयच हें वर्णिलें. ॥ ३२१४ ॥

---

१. या अध्यायाच्या शेवटीं पुढील गद्यात्मक संस्कृत शेरा आहेः—

हरिः ॐ तत्सदिति श्रीसच्चिदानंदमुकुंदपादारविंदद्वंद्वचिन्मकरंदलब्धानंदमनोमधुपश्रीवामनपंडितविरचितयथार्थदीपिकानाम श्रीमद्भगवद्गीताटीकायां **मोक्षसंन्यासयोगो** नामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥ शुभं भूयात् ॥